परभृत साहित्य

# छोटी नली



लेखक

सुशील परभृत

प्रकाशक

कॉंटिनेंटल बुकसर्व्हिस, पुणें २

उघडा करितां होईल—
    दूषक-खळ-दृष्टि-मक्षिका-पात।
रसिकांसि शोधितों मी—
    तों चषकावरि असो तुझा हात॥

पंत.

# आमचीं पुस्तकें

चंद्रा आणि इतर गोष्टी
छोटी नली
वत्सला आणि इतर गोष्टी
उल्हास कथा
धूम्रतरंग
सुधारणा
राखेंतले निखारे
मंद ज्योति
सुरसुरी
आनिर्बंध जीवन
वणवा
चित्रा

चांदण्यांतील सावल्या
कलावंताच्या सहवासां
नवा प्रातःकाल
स्वाती
नाद निनाद
आहुती
संगम
ताई अन् भाऊ
जीवन संग्राम
श्रावणांतल्या विजा
समता
न्याय वैद्यक

कॉंटिनेंटल बुकसर्व्हिस, पुणें २

# भूमिका

**फोडिलें भांडार । धन्याचा हा माल ।**
**मी तों हमाल । भारवाही ॥**

कांहीं वर्षांपूर्वी दुय्यम विद्यालयांत शिक्षकाचें काम करीत असतां, विद्यार्थ्यांच्या हातांत निःसंकोचपणें देतां येईल अशा कादंबरी वाङ्मयाचा तोटकेपणा लक्षांत येऊन, ओटीपासून स्वयंपाकगृहापर्यंत अनिर्बंध-संचारी असें कादंबरी लेखन करावें अशी कल्पना प्रस्तुत लेखकाच्या मनांत उत्पन्न झाली. पण आत्मसंशोधनास प्रत्यक्ष सुरवात झाल्यानंतर, अशा प्रकारच्या अव्वल दर्जाच्या देशी किंवा विदेशी ललित कृतींचें वाचन जरी झालें असलें तरी, या लेखनास आवश्यक असणाऱ्या विद्वत्ता, प्रतिभा, रचना-कौशल्य, सूक्ष्म निरीक्षण, मानवी स्वभावाचें सम्यक्ज्ञान, विशाल अनुभव, सहृदयपणा, भाषाप्रभुत्व वगैरे गुणांचा अभाव प्रामुख्यानें नजरेस येऊन स्वतःची एतद्विषयक नालायकी पटल्यानंतर, नामवंत पाश्चात्य लेखकांच्या अभिजात कृतींचा अनुवाद तरी करावा आणि मनोरंजन व श्रेष्ठ ललित-कृतींचा परिचय असें दुहेरी कार्य साधावें असा विचार मनांत घोळूं लागला. पण दरवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या ललित कृतींतील डवरलेला भाषेचा मोहक फुलोरा पाहिला कीं स्वतःच्या शब्दसृष्टीच्या दारिद्र्यानें मन फार संकोचून ही अनुवादाची कल्पनाही मनांतून पार घरंगळून जाई. पण कांहीं विलक्षण दैवी आपत्तीमुळें एकांतवासांत दिवस कंठण्याची पाळी येऊन मनःक्षोभ इतका तीव्र झाला कीं, विचारांना कोठेंतरी गुंतवणें आवश्यक झालें; आणि पाश्चात्य ललित कृतींच्या सुटसुटीत अनुवादाची जुनी कल्पना परत जोर करूं लागून, तिनें डिकन्सच्या हाताचा आधार घेऊन सुरवातीचें पहिलें पाऊल तर टाकाला लावलें. कुडाला तुंबड्या लावण्याचा हा उद्योग कांहीं आप्त स्वकीयांच्या

नजरेस येऊन, ‘ सर्वः कांतं आत्मीयं पश्यति ’ या न्यायानें त्यांनीं प्रस्तुतचा प्रथम प्रयत्न हा प्रकाशनार्ह आहे असें ठरविलें. झालें.—लेखकही हुरळला आणि डिकन्सच्या कृतीचा हा अनुवाद खाकोटीस मारून शारदा मंदीराच्या विस्तीर्ण प्राकारांत आज त्यानें पाऊल तर टाकलें आहे. ‘ छोट्या नली ’ ची भूमिका ही या प्रकारची आहे. अशा रीतीनें प्रस्तुत अनुवाद हा जरी मध्यम विद्यालयीन प्रौढ विद्यार्थ्यांसाठीं केलेला असला तरी, आंग्ल भाषेशीं परिचय नसलेल्या रसिक वाचकासही तो केवळ ‘ शुष्कं काष्ठं ’ वाटूं नये असें वाटतें.

शेवटीं पुस्तक प्रकाशित करावयाचें ठरल्यानंतर, प्रकाशनाची सर्व जबाबदारी आपल्या आंगावर घेऊन व ती पूर्ण आपुलकीनें अत्यंत थोड्या मुदतींत पार पाडून ‘ छोटी नली ’ इतक्या आकर्षक स्वरूपांत रसिकांच्या हातांत दिल्याबद्दल माझे प्रकाशक मित्र रा. गो. रा. पाटणकर यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

सुशिल परभृत

कार्तिक वद्य ११ शके १८६४. ]

# १

सायंकाळीं जेवण झाल्यानंतर अगदीं मनमुराद भटकण्याची माझी खोड. उन्हाळ्याच्या दिवसांत तर मी अगदीं भल्या पहांटे उठायचा. आणि मग भ्रमंतीला जी सुरवात व्हायची ती दुपार टळून जाईपर्यंत. कित्येक वेळां तर दुपारची शिदोरी कांखेत मारून मी सबंध दिवस बाहेर भटकलों आहे. त्या भटकण्याला ना ताळ ना तंत्र. माझ्या त्या भ्रमंतींतून शेतें, माळरानें, नद्या डोंगर, सुंदरशा आंबराई, ओसाडींतले प्रदेश सुद्धां सुटले नाहींत. गांवच्या भोंवतालची सबंध पंचक्रोशी मी अशा तऱ्हेनें पायांखाली घातली होती. पण शहरांत राहण्यास आलों कीं मात्र माझ्या या भ्रमंतीला जरा खळ पडे. येथें मात्र सायंकाळ होऊन काळोख पडण्यास सुरवात झाल्याशिवाय मी बाहेर पडत नसे. तरीही त्या शांत वेळीं आकाशांतील ताऱ्यांच्या मंद शांत उजेडांत किंवा रस्त्यावरील दिव्यांच्या स्वच्छ प्रकाशांत स्वच्छंदानें फिरण्यांत मला मोठी मौज वाटे.

असाच एका रात्रीं बाहेर पडलों होतों. शुक्लपक्षांतील ती रात्र होती. सुंदर चांदणें पडलें होतें. वाराही मोठा मजेशीर वाहात होता. रस्त्यावरील गर्दी हळुंहळूं विरळ होत चालली होती नी दिवसभराचा गजबजाट कमी होत चालला होता. भोंवतालच्या या शांत वातावरणांत मी भरल्यापोटीं माझी आवडती काठी बरोबर घेऊन पाय नेतील तिकडे संथपणें जात होतों. अशा वेळीं एकादा सुंदरसा विचार संगतीला घेऊन मन मानेल तितकें हिंडणें यांतच माझा सगळा आनंद सामावलेला असल्यानें थोड्याच वेळांत मी सभोंवतालच्या सर्व गजबजाटाला अगदीं पूर्णपणें विसरून गेलों. किती वेळ असा गेला कोण जाणें. पण इतक्यांत कोणी तरी माझ्याजवळ येऊन मंद मधुर आवाजांत मला कांहीं तरी विचारलें. मागें वळून पाहतों, तों एक लहान छोकरी माझ्या अगदीं जवळ उभी असून दूरचा एक रस्ता कुठें आहे, म्हणून मला विचारते आहे,

असें पाहिलें. छोकरी वयानें लहान पण दिसण्यांत मोठी गोड होती. ती विचारीत असलेला रस्ता तेथून बराच दूर आणि शहराच्या अगदीं दुसऱ्या टोंकाला होता. 'फार लांब आहे तो रस्ता, बाळ,' मी म्हणालों.

'मला माहीत आहे दादा,' ती हळूच म्हणाली. 'फार लांब आहे तो. तिकडूनच आलें मी आतां.'

'एकटीच?' मी आश्चर्यानें विचारलें.

'हो. एकटीच आलें. त्यांत काय मोठेंसें. पण आतां मात्र वाट सांपडत नसल्यानें जरा भीति वाटते आहे.'

'पण मलाच कशी तूं वाट विचारलीस? मी तुला भलताच रस्ता दाखविला तर.'

'नाहींच मुळीं तुम्ही तसं करणार,' ती ठसक्यानें म्हणाली. 'तुम्ही किती म्हातारे आहांत; आणि म्हातारीं माणसं लहान मुलांना फसवीत नाहींतच मुळीं.'

तिच्या या बालसुलभ, भोळ्या, पण ठसकेबाज बोलण्याची मला मोठी मौज वाटली. आणि 'बरं, बरं, चल तर; मीच तुला तिकडे नेतों,' असें म्हणून मी तिचें बोट धरलें. तीहि पण, जणूं काय मी तिचा अगदीं जानी दोस्त आहे अशा भावनेनें माझ्याबरोबर चालूं लागली. माझी चाल जरी मंद असली तरी तिला जरा जलदच पाऊल उचलावें लागत होतें. पण चालण्याची ऐट मात्र अशी कीं जणूं काय तीच माझा हात धरून मला वाट दाखवीत होती. मला मोठी गंमत वाटली. मी विचारलें, 'इतक्या लांब तुला एकटीला कोणी पाठवलं बाळ?' माझा प्रश्न तिला आवडला नाहींसं दिसलं. ती लगेच म्हणाली, 'फार चांगले आहेत माझे आजोबा.' 'आणि कसल्या ग कामाला आली होतीस इतक्या लांब?' 'अं हं! तें नाहीं सांगायचं!' ती ठांसून म्हणाली. एक क्षणभरच तिनें आपले डोळे माझ्या-वर रोखले आणि माझ्या मनांतील विचार ओळखूनच ती पुढें म्हणाली, 'कांहीं भलत्या कामाला नव्हतें गेलें कांहीं. पण खरं सांगूं, मलाच माहीत नाहीं तें.'

तिनें हें अशा कांहीं मोकळ्या आणि निर्व्याज वृत्तीनें सांगितलें कीं, ती सांगत असलेलें सर्व कांहीं अगदीं निर्भेळ सत्यच असलें पाहिजे असंच कोणाच्याही मनाला पटल्यावांचून राहिलं नसतं. चालतां चालतां तिच्या

माझ्या मधील परकेपणा अधीकाधिक कमी होऊं लागला, आणि तिच्या बोलण्यांतील मोकळी आनंदी वृत्ती जास्तच प्रकट होऊं लागली. पण तिनें आपल्या घराबद्दल अगदींच मूक वृत्ती स्वीकारली आणि आम्हीं चालत असलेला रस्ता तिला पूर्ण अपरिचित असल्यानें, ' हा कुठला रस्ता काढला तुम्हीं, जास्त जवळचा आहे वाटतं आपल्याला, ' एवढेंच फक्त बोलली ती.

माझं मन मात्र निराळ्याच विचारांत गर्क झालं. तिच्या या इतक्या दूर आणि तेंही रात्रीं व एकट्यानें येण्याचीं कारणं एकापुढें एक माझ्या डोक्यांत येऊं लागलीं. पण त्यांतील एकही मला समाधानकारक न वाटल्यानें मी तीं सर्व धुडकाऊन लावलीं. पण तें कांहीं जरी असलं तरी, इतक्या लांब, रात्रीच्या वेळीं या कोंवळ्या पोरीला एकटी पाठविण्याचा मूर्खपणा करण्या-बद्दल त्या आजोबाची खरपूस हजेरी घ्यावी असं मला वाटल्यावांचून राहिलं नाहीं. पण घराच्या जवळचा परिचित रस्ता दिसल्या बरोबर कदाचित् ही छोकरी माझी रजा घेऊन तशी संधी मला घेऊं देणार नाहीं, असाही विचार माझ्या मनांत आला आणि म्हणून जवळचे पण परिचित रस्ते सोडून वेड्या-वांकड्या आडवळणांनीं मी चालण्यास सुरवात केली. पण थोड्याच वेळांत आम्हीं तिच्या घराशीं आलों वाटतं. कारण चटकन तिनें माझं बोट सोडलं; आणि आनंदानें टाळ्या पिटीत ती पुढें धांवत सुटली आणि एकदोन मिनि-टातच एका घरापुढें थांबून दाराच्या फळीवर तिनें थाप मारली.

दारावर दोनतीन वेळां थाप मारल्यावर आंतून कोणी तरी येत असल्याची चाहूल लागली आणि दरवाजाच्या कांचेतून अस्पष्ट उजेड दिसूं लागला. दिवा धरणारी व्यक्ती वाटेंत पसरलेल्या सामानांतून हळुहळू वाट काढीत पुढें येत होती. दिवा आतां कांचेसमोर आल्यानें त्याच्या उजेडांत दिवा धरणारी व्यक्ती आणि घरांतील सामान मला नीट रीतीनें न्याहाळतां आलीं. दिवा धरणारे गृहस्थ अतीशय वृद्ध दिसत होते. डोक्यावरील केस पूर्ण रुपेरी होते. वार्धक्यानें त्यांच्या शरीरावर जरी चांगलाच अंमल गाजविला असला, तरी त्या छोकरींत दिसत असलेला खानदानी नाजूकपणा त्यांच्या सडपातळ शरीरयष्टींत स्पष्ट दिसत होता. दोघांचेही काळेभोर सतेज डोळे अगदीं निःसंशय एकच भाव बोलत होते. या पलीकडे मात्र काळजीनें खंगलेल्या व वार्धक्यानें सुरकुतलेल्या त्या चेहऱ्यांत साम्य शोधणें कठीण होतें. ज्या बाजूनें

त्या वृद्धाची मूर्ती येत होती तिकडे दृष्टी फेंकली असतां आंत इतस्ततः पसरलेल्या हरतऱ्हेच्या सामानावरून तें जरेपुराणावाल्याचें दुकान असावें असें वाटत होतें. कारण त्या ठिकाणीं नक्षीची व मिन्याची भांडीं, पितळी, लांकडी, तांब्याच्या विकृताकृती अनेक मूर्ती, हस्तीदंती सामान, साफसूफ केलेले जुने पुराणे कपडे, टिनचे डबे, चिनी मातीचीं भांडीं, लोखंडी सामान वगैरे अनेक चित्रविचित्र लोकविलक्षण वस्तूंची एकच गल्लत उडाली होती. जणूं काय त्या सर्व पुराण्या वस्तूंना आपल्या गतवैभवाची स्मृती होऊन प्रेक्षकांची दृष्टी चुकविण्यासाठींच त्या अशा एकमेकांच्या आड लपण्यास पहात होत्या.

इतक्यांत कडी काढल्याचा आवाज होऊन दार उघडलें गेले व ते वृद्ध गृहस्थ बाहेर आले. पण त्या छोट्या मुलीच्याच जवळ उभे असलेल्या माझ्याकडे त्यांची दृष्टी जातांच ते जरा चकित झालेले दिसले. ते मला आपादमस्तक न्याहाळीत असतांनाच माझी ती बालमैत्रीण माझी व तिची कशी गांठ पडली तें सांगत होती. तिचें बोलणें संपतांच मोठ्या प्रेमानें व हळुवारपणें तिच्या डोक्यावर थापटीत त्यांनीं म्हटलें, ' पण नली, अशी कशी तूं वाट चुकलीस ? तूं जर हरवली असतीस तर तुझ्या या म्हाताऱ्या आजोबाचं काय झालं असतं बाळ ? ' ' अंहं, आजोबा, मी परत आलें असतेंच मुळीं. अगदीं नक्की ! ' ती धीरानें म्हणाली.

म्हाताऱ्याच्या चेहऱ्यावर आनंद झळकला; आणि मोठ्या प्रेमानें आपल्या नातीला कुरवाळीत त्यानें मोठ्या अगत्यानें मला आंत येण्यास सांगितलें. दाराची कडी लावून तो पुढें चालूं लागतांच मी त्याच्या मागून जाऊं लागलों. दुकानाच्या त्या जागेला लागूनच दुसरी एक छोटी खोली होती. तिच्या एकंदर स्वरूपावरून ती त्यांची बैठकीची खोली असावीसें दिसत होतें. खोलीचे दारापलीकडे एका लहानशा जागेंत एक सुंदरशी छोटी पलंगडी, वर गादी उशा नीट व्यवस्थेशीर ठेवलेली अशी दिसत होती. आंत जातांच एक मेणबत्ती पेटवून व तोंडानें एक गाणें गुणगुणत नाचत बागडतच नली त्या पलंगडीकडे गेली, आणि ' आलेंच हं,' असें म्हणून तिनें दार लावून घेतलें.

जवळचीच एक पुराणी खुर्ची माझ्यासाठीं त्या म्हातारेबुवानीं पुढें ओढली आणि म्हटलें, 'फार तसदी घेतली आपण. आपला कसा मी उतराई होऊं ?' ' आपल्या नातीची ज़रा अधीक काळजी घेऊन, ' मी म्हणालों.

'अधीक काळजी,' ते एकदम आवेशानें म्हणाले, 'माझ्या नलीची अधीक काळजी ! कसं सांगूं तुम्हांला किती जीव कीं प्राण मला आहे ती ?'

त्यांचा तो आवेश आणि अंतःकरण पिळवटल्यामुळें येणारा कापरा आवाज पाहून एक क्षणभर तरी मला काय बोलावें तेंच सुचेना. 'पण जरा अधीक काळजी...' कांहींतरी बोलायचें म्हणून मी बोलूं लागलों.

'नलीची अधीक काळजी,' मला मध्येंच थांबवून ते पुढें बोलूं लागले, काय सांगावं. 'नली, माझी छोटी नली !!' इतक्या आर्ततेनें त्यांनीं हे शेवटले शब्द उच्चारले कीं अंतःकरणांतील वात्सल्य त्याहून अधिक उत्कटतेनें व्यक्त करणें केवळ अशक्य होतें. त्यांच्या त्या आवेगास अधीक वाट मिळावी म्हणून मी जरा स्तब्ध बसलों. पण हातावर टेकलेलें आपलें भारावलेलें मस्तक एकदोनदां क्षीणपणें हलविण्याव्यतिरिक्त त्यांनीं कांहींच हालचाल केली नाहीं.

वृद्धाच्या त्या करुण मूर्तीकडे निश्चलपणें मी पहात असतानांच झोंपण्याच्या खोलीचें दार उघडून नलीची अल्लड मूर्ती बाहेर आली. आपले काळेभोर लांब केस पाठीवर तिनें मोकळे सोडले असल्यानें तिच्या प्रत्येक हालचालीबरोबर त्यांचीही हालचाल अत्यंत मोहकपणें होत होती. तोंड स्वच्छ धुवून तिनें वस्त्र पालट केला असल्यानें तिच्या सर्व शरीरावर एक प्रकारचा विलक्षण गोडवा आला होता. 'हें काय आजोबा, पाहुण्यांना चहाबिही नाहीं का कांहीं द्यायचा ?' आंत आल्याबरोबर आमच्या शांततेचा भंग करीत तिनें विचारलें. नी मी नकार दर्शविण्याच्या आधींच अतीशय चपळाईनें चहाचे पेले आमच्यापुढें तिनें आणून ठविले. 'हं घ्या महाराज. रात्रीं झोंपण्यापूर्वीचा आमचा हा रोजचाच कार्यक्रम आहे. माझ्याबरोबर ही पोरगीही आतां चागलीच चहाबाज बनली आहे.' आपल्या नातीच्या सांन्निध्यानें म्हातारेबुवांची कळी आतां चांगलीच उमलली होती. 'कांहीं तरीच आजोबा तुमचं,' असं म्हणत नलीनेंही मान वेळावली. माझें चहापान चालू असतां आजोबांची दृष्टी माझें आपाद मस्तक नीट निरीक्षण करीत असल्याचें मला दिसलें. घरांत त्या दोघांशिवाय कोणीच न दिसल्यानें मला जरा आश्चर्य वाटून मी तसें म्हणतांच, 'आमच्या नलीपेक्षां चांगलं काम दुसरं तरी कोण करणार आहे. माझा जीवनाधारच मुळीं ती आहे,' आजोबांनीं मोठ्या अभिमानानें म्हटलें. आणि तिच्या मुक्त केसांवरून मोठया हळुवारपणें हात फिरविला.

त्या मोकळ्या वातावरणांत आमचें चहापान व गप्पापुराण चालू असतांच कोणीतरी पुढील दार ठोठावलें. मी चमकून तिकडे पाहतांच नलीनें टाळ्या पिटण्यास आणि मोठ्यानें हंसण्यास सुरवात केली, आणि म्हटलें, 'ओहो! केवढ्यांदा दचकलांत तुम्हीं. अहो, आमचा किशा आहे तो. तिच्या या बालिश वृत्तीनें उल्हसित होऊन मीहि मोकळेपणानें तिच्या हंसण्यास साथ दिली. 'अशीच हंसते हो ही त्या किशाला, नेहमीं,' असें कांहीं पुटपुटत हातांत दिवा घेऊन आजोबा दार उघडण्यास गेले, आणि थोड्याच वेळांत एक बावळटशी मूर्ती त्यांच्या मागोमाग आंत येतांना दिसली.

पंधरा सोळा वर्षांचा छोकरा होता तो. हाडपेरानें मजबूत, रुंद जिवणीचा, गालांचीं हाडें वर आलेला, पण नाकाच्या शेंड्यानें पलटी खाल्ल्यानें एकाद्या बुलडॉगसारखा दिसत होता तो. खोलींत नलीच्या जवळ एक परका गृहस्थ बसलेला पाहतांच किशाची स्वारी दारांतच थबकून उभी राहिली. त्याची ती 'न ययौ न तस्थौ' अशा पवित्र्यांत उभी असलेली खेडवळ मूर्ती, टोपीच्या बाहेर कुतूहलानें डोकावणाऱ्या झिपऱ्या, आश्चर्यानें रुंदावलेले डोळे आणि ओंठाबाहेर आलेला जिभेचा शेंडा या सर्वांचा असा कांहीं गंमतीदार मिलाफ झाला होता कीं तो पाहून गंभीर प्रकृतीच्या माणसाचा चेहराही सुरकुतल्याशिवाय राहिला नसता.

'फार लांब आहे नाहीं रे घर तें?' आजोबांनीं त्याला विचारलें.

'हो लांबच तर काय. एक मैलभर तरी असेलच,' किशा म्हणाला.

'पण सांपडलं तरी काय रे लौकर? का शोधायला लागलं फार?'

'अं? तसं कांहीं विशेष नाहीं म्हणा. पण त्रास पडलाच जरा,' किशानें उत्तर केलें,

'मग, कांहीं पोटपूजा हवीच असेल म्हणा.'

'तर!' किशा म्हणाला, 'कावळे तर केव्हांपासूनच कोकलताहेत.'

उत्तर देतांना जीभ बाहेर काढण्याची व मान एका बाजूला कलती करण्याची त्याला मोठी खोड दिसली. जणूं काय मान वांकडी केल्याशिवाय घशांतून शब्दच बाहेर पडण्यास नाखूष असत. त्याच्या त्या अंगविक्षेपानेंच नलीला किशा म्हणजे एक गंमत वाटत असावी.

किशानें हातांत पोह्यांचा वाडगा घेऊन पोह्यांचे बोकांडे मारण्यास सुरवात

केल्यानंतर आजोबा माझ्याकडे वळले आणि जणूं काय आतांच मी त्यांच्याशीं बोलत होतों अशा तऱ्हेनें त्यांनीं संभाषणाचा धागा परत उचलला. नलीकडे अतिशय प्रेमानें पहात त्यांनीं एक सुस्कारा टाकला. 'तुम्हांला नाहीं समजायचं तें. नाहींतर तुम्हीं असे बोलतां ना! केवळ दुसरा प्राणच आहे माझा तो.'

'पण एवढं नका लावून घेऊं माझं बोलणं आजोबा,' मी म्हणालों. 'वरवर पाहूनच नुसतं बोललों मी तें.'

'खरं आहे. खरं आहे,' ते म्हणाले. 'नली इकडे ये बाळ जरा.' आजोबांची हांक ऐकतांच झटकन नली त्यांच्याजवळ गेली आणि मोठ्या प्रेमानें तिनें म्हाताऱ्याच्या गळ्याला मिठी मारली. तिचें तोंड जरा दूर धरून ते म्हणाले, 'नली, आहे का ग माझं प्रेम तुझ्यावर? अगदीं खरं सांग हं. आहे का ग?' उत्तरादाखल नली आजोबांना अधिकच घट्ट बिलगली. शून्य दृष्टीनें कुठेंतरी पहात पहात म्हाताऱ्याचे हात तिला कुरवाळीत होते!

कुठें तरी बाराचे ठोके पडले. प्रेमाच्या त्या विशुद्ध साम्राज्यांतून मी परत भानावर आलों, आणि बाजूला ठेवलेली कोट टोपी मी उचलली.

नलीच्या आजोबांचें तिकडे लक्ष जातांच त्यांनीं मला एक क्षणभर थांबण्यास सांगितलें व किशाकडे वळून ते म्हणाले, 'काय रे अजून नाहीं का झालं तुझं? चल आटप; आणि पळ घरीं लवकर. पण सकाळीं यायला उशीर नको हं करूं. जा आतां. नली, त्याला जरा दिवा दाखव बाळ.' किशानें घाईघाईनें आपलें खाणें संपविलें आणि त्यानें आपल्या वृद्ध मालकाला रामराम केला. त्याला आणि नलीला गेलेलीं पाहून ते वृद्ध गृहस्थ माझेकडे पाहून म्हणाले, 'आपल्या आजच्या उपकाराबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहे, आपले उपकार मानल्यावांचून आपल्याला जाऊं देणं कृतघ्नपणाचं झालं असतं. आणि नलीला पण तें आवडलं नसतं. पण माझ्या लाडक्या नलीची मी हेळसांड करतों, तिची योग्य काळजी घेत नाहीं अशी मात्र मेहेरबानी करून आपली कल्पना करून घेऊं नका.'

त्यांच्या शेवटल्या शब्दांतील आर्द्रता मला जाणवल्यावांचून राहिली नाहीं. पण अधिक कांहीं न बोलतां त्यांना नमस्कार करून मी दाराकडे वळलों. ते वृद्धही मला पोंचविण्यासाठींच कीं काय दारापर्यंत चार पावलें आले. छोट्या

नलीची स्वारी हातांत एक लोंकरीचा गळपट्टा व काठी घेऊन दाराशीं उभी होती. ' माझी नाहीं बाळ ती काठी. मी घेतली आपली. आजोबा कुठें बाहेर जायचे आहेत ? ' मी म्हटलें.

' हो ना. म्हणूनच तर त्यांचा गळपट्टा पण आणला आहे. गळ्याला त्यांच्या वारा नाहीं का लागेल ? ' ती हंसून म्हणाली.

' आणि, तूं मग घरांत एकटीच ? ' मी आश्चर्यानें उद्गारलों.

' हो ना. नेहमींच असतें मी एकटी. मला नाहीं बा भीति वाटत. ' मीं चकित होऊन त्या बालमूर्तीकडे आणि त्या वृद्धाकडे आळीपाळीनें पाहात राहिलों. एकटी ! त्या भयाण जागेंत सबंध रात्र एकटी ! पण त्या वृद्धानें जणुं काय आपण त्या गांवचेच नाहीं अशा तऱ्हेनें दाराकडे आपलीं पावलें वळवलीं. दाराबाहेर पडतांच ' बरं बाळ, जाऊं मी ? दार नीट लाव हं आणि गुपचूप नीज. जागत बसूं नको हं आतां. ' धांवरे राम राया ' म्हण, आणि गुडुप नीज. सकाळीं लौकरच येईन मी. '

' बरं बरं आजोबा, अगदीं लौकर उघडीन दार तुम्हांला. बरं, पाहुणे काका, नमस्कार. ओळख ठेवा हं नलीची. मी नाहीं विसरणार तुम्हांला, ' असें मोठ्या लाडिकपणें म्हणत तिनें दार लावलें. कडी नीट लावल्याची खात्री करून घेतल्यानंतर नलीचे आजोबा मागें वळले, आणि आम्हीं दोघेही मग हळुहळू चालूं लागलों. कांहीं पावलें गेल्यानंतर ते म्हणाले, ' माफ करा हं, आपले रस्ते भिन्न आहेत. मी जरा इकडून जातों हं. नमस्कार. ' आणि मी कांहीं उत्तर देण्याची वाटही न पाहतां डावीकडे वळून झपाट्यानें ते निघूनही गेले.

# २

आणि त्यानंतर रोज वृद्धाची आणि त्या गोड पोरीची मला आठवण होई. पण त्यांच्या घरीं जावें कीं न जावें याचा कांहीं केल्या निश्चय माझ्या मनाचा होईना. त्या पोरीनें मला चांगलेंच वेड लावलें होतें, आणि म्हातान्याच्या त्या निशाचर वृत्तीचेंही मला मोठें गूढ पडलें होतें हें कांहीं खोटें नाहीं. पण जावं कसं ? अखेर एक दिवस अगदीं न राहवल्यामुळें, तिसरे प्रहरीं मी तिकडे जायला निघालों.

घराबाहेर तर पडलों आणि थोड्याच वेळांत त्या जरेपुराणेवाल्याच्या दुकानाशींही येऊन पोंचलों. पण आंत जावं कीं नाहीं या प्रश्नानें उचल खाल्ली. कारण आपलं जाणं अनाहूत तर खरंच, पण तितकंच तें अप्रिय झालं तर ? या प्रश्नाचं उत्तर कांहीं केल्या मिळेना; आणि नलीबद्दलचा माझा अकारण ओढा तर एकाद्या ओढाळ गुराप्रमाणें मला त्या दाराकडे खेंचीत होता. मनाच्या अशा अनिश्चित स्थितींत त्या दुकानावरून मी चार पांच फेऱ्या मारल्या. सुदैवानें, दुकानाचें दार मात्र बंद असल्यानें माझी ही चक्रंभ्रमती आंतून कोणी पाहिली नाहीं. अखेर नलीच्या प्रेमाचा जय झाला. आणि मी दुकानाचें दार ढकललें.

नलीचे आजोबा कोणाशीं तरी अगदीं तार स्वरानें बोलत होते. मला पाहतांच ते घाईघाईनें माझ्याकडे आले आणि त्यांनीं हास्यमुद्रेनें माझें स्वागत केलें. पण त्यांच्या आवाजांतील कांपरेपणा माझ्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं.

‘ अगदीं ऐन वेळेवर आलांत तुम्हीं, ’ ते आतांपर्यंत बोलत असलेल्या व्यक्तीकडे बोट दाखवून म्हणाले; ‘ हें कारटं एखादे दिवशीं माझा खून सुद्धां करील. अजूनपर्यंत कसा थांबला आहे कोण जाणे. ’

तो दुसरा, खुर्चीवर आपला एक पाय ठेऊन त्या म्हाताऱ्याकडे मोठ्या

तिरस्कारानें आणि खुनशीपणानें पाहात होता. वीस बावीस वर्षांचा असावा तो; प्रकृतीनें सुदृढ, आणि दिसण्यांत रेंखीव होता. पण चेहऱ्यावरील वट मात्र अशी कीं, पाहतांक्षणीं कोणाचाही ग्रह प्रतिकूल व्हावा. पोषाकाचा रंगढंगही त्याच्या उर्मट प्रवृत्तीला साजेसाच होता.

' न्याय बिय मी कांहीं जाणत नाहीं, ' तो म्हणाला, ' हा इथें मी उभा आहे आणि माझी लहर लागेल तिथपर्यंत मी अस्सा राहीन. पण माझं ऐकायचं असेल तर मुकाट्यानें मला नलीला भेटूं द्या. '

' तुला आणि नलीला ? ' म्हाताऱ्यानें तीव्र स्वरांत विचारलें.

' हो, हो ! नलीला ! त्यांत आश्चर्य काय वाटलं तुम्हांला. मला माझ्या बहिणीचीही भेट घेऊं देत नाहीं काय तुम्ही ? ' त्यानें उत्तर केलें. ' तिला कोंडून ठेऊन छळ मांडला आहे नुसता तुम्हीं तिचा. चला आटपा लौकर. बाहेर वाट पाहतो आहे माझा दोस्त. उगाच वेळ मोडाल तर, मला त्यालाही आंत बोलवावा लागेल. '

' इतकें बोलून तो दाराबाहेर पडलाही आणि दूर पहात कोणातरी अदृश्य व्यक्तीला येण्यासाठीं जोराजोरानें खुणाऊं लागला. त्याच्या त्या हातवाऱ्यां-वरून आणि अतीशय अधीऱ्या चेहऱ्यावरून ती अदृश्य व्यक्ती आंत येण्याला नाखूष असावी, असें दिसत होतें. शेवटीं एकदां रस्त्याच्या दुसऱ्या कडेनें जणूंकाय सहजच आलों असें दाखवीत, एक गृहस्थ दाराशीं आले. ते आले ते जणूं काय अगदीं नाखुशीनेंच. कपाळाला त्यांनीं सत्राशें साठ आठ्या घातल्या होत्या; आणि ' नको रे मी कशाला, ' अशा आविर्भावानें नलीच्या भावाकडे पहात ते मान हालवीत होते. पण त्यांच्या या नाटकानें कोणीही फसलें नसतें; निदान मी तरी. ' हं बसा तिथें, धोंडोपंत, ' त्याला एका खुर्चीकडे ढकलीत नलीचा भाऊ म्हणाला. ' बसा, बसा. ' ' पण त्या म्हाताऱ्याला आवडेल का ? ' पंत पुटपुटले. पण, ' तूं बस रे ' असें त्यांच्या दोस्तानें परत फर्मावल्यानंतर पंत स्थानापन्न झाले. त्यांच्या अंगावरील कपड्यांच्या जीर्णावस्थेवरून त्या कपड्यांचा मालक सुस्थितींत नसावा असेंच दिसत होतें. डोक्यावरील टोपी मळकी, घामाची पुटें चढलेलीं, जुन्या बाजारांत घेतलेला आणि स्वतःचा मूळचा रंग व मालक सांगण्यास असमर्थ असलेला कोट, वरच्या खिशांतील चार दोन

आण्यांचें फौंटन पेन, त्यावरून डोकावणारा भडक रंगाचा जपानी रुमाल, बोटांतील खोट्या खड्याची अंगठी आणि हातांतील एटबाज छोटी छडी हीं सर्व पंतांविषयीं प्रतिकूल मत करण्यास पुरेशीं होतीं. खुर्चीच्या मागील दोन पायांवर रेलून वर पटईकडे पहात रेंकत रेंकत पंतानीं, ' उकाडा फार होतोय बुवा ' वगैरे हवापाण्याविषयीं मामुली चारदोन वाक्यें उच्चारून मौन स्वीकारलें. नलीचे आजोबाही छातीवर स्वस्तिकाकार हात धरून, शून्य नजरेनें अगतिक झाल्यासारखे, पंतांकडे आणि आपल्या नातवाकडे आळीपाळीनें पहात स्वस्थ बसले.

पण ही स्तब्धता फार वेळ टिकली नाहीं. कारण फारच महत्त्वाचा असा मुद्दा सुचल्याचा आविर्भाव करून धोंडोपंत आपल्या दोस्ताला म्हणाले, ' पण कायरे विजय, म्हातारा वळतो आहे का कांहीं ? ' ' त्याच्याशीं काय तुला करायचं ? ' त्यांचा दोस्त खेंकसला.

' तसं नव्हेरे. तरी पण वळतो आहे का ? ' पंत पुन्हा म्हणाले.

' तो नाहीं त्याचा बाप वळेल. सांगतो कुणाला, ' विजय उद्गारला, , आणि नाहीं वळला तर मला काय त्याची पर्वा. '

' अं हं ! असं नको म्हणूं विजय. बरं नाहीं तें. आप्तांचा आप्तपणा गमावणं बरं नाहीं, ' पंत म्हणाले. ' स्नेह्यांच्या प्रेमाची मखमली शाल अंगावर जोंपर्यंत मिरवतां येत नसेल तोंपर्यंत आप्तांच्या नात्याची फाटकी वाकळ अंगाभोंवतीं गुरफटून, समाधानाचे निःश्वास टाकीत तिचं कोडकौतुक केलंच पाहिजे. आजची स्थिती काय आहे ? एके बाजूला हा हौशी सुखवस्तू म्हातारा—गैरसमज नको करून घेऊं, हौशी म्हटलं म्हणून—आणि दुसरे बाजूला तुम्ही—त्यांचे उधळे नातू. म्हातारेबुवा म्हणतात, " हें पहा विजय, अजूनपर्यंत मीं तुला वाढवला सवरला; नीट पोट भरतां येईल असं शिक्षणही दिलं तुला; पण इतरांप्रमाणें तूंही सरळ वाट सोडून बाजूला उधळलास; आतां तुला माझ्याकडून एक दमडीही मिळणार नाहीं. " तर आतां प्रश्न असा कीं हें चालायचं कसं ? त्यापेक्षां जर या म्हातारेबुवांनीं जरा हात सैल सोडला आणि कांहीं दामाजी तुला दिले, तर दोघांनाही बरं, नाहीं का ? '

' कां छळतोस मला असा एकसारखा, ' म्हातारा एकदम आपल्या नात-

बाकडे वळून म्हणाला. ' कशाला आणतोस असले हे रंगराव माझ्याकडे ? किती वेळ सांगूं तुला जीव तोडून कीं माझ्याजवळ एक दिडकीही नाहीं आणि मीच कसा तरी दिवस काढतों आहें ? '

' आणि किती वेळां मीहि सांगूं तुम्हांला कीं, मला अधीक माहिती आहे म्हणून, ' नातवानें अगदीं थंडपणें उत्तर केलें.

' तुझा तूं हा रस्ता पकडला आहेस, तर जा आतां त्या रस्त्यानें. मला आणि नलीला करूं दे जगण्यासाठीं धडपड, ' आजोबा म्हणाले.

' मोठी होणार नली आतां. आणि तुमच्याच तालमींत तयार झालेली ती. आपल्या भावाला विसरूनही जायची असा मधून मधून नाहीं आलों तर. ' कुत्सित स्वरांत विजय म्हणाला.

' हो हो. नीट काळजी घे हो. तुलाच तिची गरज पडायची, ' म्हातारा एकदम आवेशानें म्हणाला. ' कारण ती मिरवेल घोडागाडींत आणि तुम्हीं दिवटे असायचेत गटारं हुंगीत. '

' तुमचे पैसे मिळाल्यावरच ना; बसेल कीं ' नातवानें टोला हाणला. ' आणि या म्हाताऱ्याजवळ पैसे नाहींत हो पंत ! बघाकी. हाः हाः हाः ! '

खोलीचें दार उघडलें आणि नली व तिच्या मागोमाग एक ठेंगू, क्रूर मुद्रेचा माणूस 'आंत आला. माणूस ठेंगू तर खराच पण उंचीच्या मानानें त्याचें डोकें व जबडा भारीच मोठा होता. त्याचे डोळे मोठे अस्थिर, कावेबाज आणि एकाद्या लफंग्यासारखे दिसत होते. चेहरा केंसाळ व ओंगळ होता. अंगावरील पोषाखही मळका, जुनाट कसा तरी चढवलेला दिसत होता. आंत आल्याबरोबर विजयकडेच त्याची प्रथम दृष्टी जातांच त्याला नीट न्याहाळून तो म्हणाला, ' नातूच ना तुमचा हा आजोबा ? हो शंकाच नको. '

' नसताच तर बरं झालं असतं. '

पण म्हाताऱ्याच्या बोलण्याकडे लक्ष न देतां पंतांकडे बोट दाखवून तो पुढें म्हणाला, आणि हे कोण ? '

' त्यांचेच एक आगांतुक जातभाई, ' म्हाताऱ्यानें उत्तर दिलें, आणि त्यानें परत विचारण्याची वाट न पाहतां माझ्याकडे बोट करून त्यांनीं म्हटलें, ' आणि या गृहस्थानीं मागें नलीला रात्रीं घरीं आणून पोंचविण्याची मेहेरबानी केली होती. तुमच्याच घरून येतांना त्या दिवशीं वाट चुकली होती ती.'

हा वेळपर्यंत नली आपल्या भावाजवळ हळूहळू बोलत उभी होती. आजोबा नातवांत जरी नसला तरी त्या बहीणभावंडांत तरी प्रेमाचा चांगला ओलावा दिसत होता.

'मग काय नली,' विजय मोठ्यानें म्हणाला, 'मी अगदीं वाईट आहें म्हणून आजोबांनीं तुला सांगितलं आहे कीं नाहीं ?'

'मुळींच नाहीं,' नली जोरानें म्हणाली. 'कधीं नाहीं असं मला त्यांनीं शिकवलं !'

'मग काय प्रेम करायला शिकवलं असेल नाहीं ?' विजय कुत्सितपणानें म्हणाला.

'दोन्हीही नाहीं. कांहींच बोलत नाहींत ते,' नली म्हणाली. 'पण मला मात्र तूं फार आवडतोस हं दादा.'

'अगदीं खरंच का ग नली ?'

'कसं रे सांगूं तुला ? अगदीं खरंच आवडतोस,' नली अतिशय आवेशानं म्हणाली. 'पण दादा, तूं असा कां रे आजोबांना त्रास देतोस ? नकोना असं करूं. मग किनइ मला तूं जास्तच आवडशील.'

'अस्सं !' तिला दूर ढकलून अजूनपर्यंत प्रेमानें तिच्याकडे पहात असलेला विजय म्हणाला, 'झालं, संपली पाठ केलेली नक्कल !'

भयचकित मुद्रेनें दूर जात असलेल्या तिच्या मूर्तीकडे पहात तो कांहींवेळ स्तब्ध उभा होता. खोलींत जाऊन तिनें दार लावलेलें पाहतांच त्या नवागत ठेंगू गृहस्थाकडे पहात तो म्हणाला, 'हें पहा,'—

'कोण ? मला सांगतां कांहीं'? तो ठेंगू म्हणाला. 'कोरडे माझं नांव. सोपं आहे लक्षांत ठेवायला. भैरवनाथ कोरडे.'

'बरं तर, भैरवनाथ,' विजय पुढें म्हणाला, 'तुमची आणि आमच्या या आजोबांची चांगली ओळख आहे. आणि त्यांच्या कांहीं खाजगी गोष्टींचीही तुम्हांला माहिती आहे. नाहीं का ?'

'आहे थोडीशी,' भैरवनाथ रुक्षपणें म्हणाला.

'मग तुमच्या देखतच मी त्यांना स्पष्टपणें सांगतों कीं, त्यांना आवडो किंवा न आवडो, नलीला जोंपर्यंत त्यांनीं आपलेजवळ ठेवली आहे तोंपर्यंत, मी हा येणारच; आणि तोही लागेल तितके वेळां; आणि मी जर यायला

नको असेन तर त्यानीं प्रथम नलीला आपल्यापासून दूर केली पाहिजे. समजलं ? चल धोंडोपंत.'

दाराकडे चाललेल्या आपल्या दोस्ताला पाहून धोंडोपंत म्हणाला, ' थांब जरा विजय. अहो भैरवनाथ.'

' काय म्हणणं आहे आपलं ? ' भैरवनाथ तिकडे वळून म्हणाला.

' आपणा सर्वांची रजा घेण्यापूर्वी एक दोन शब्द बोलण्याची मी परवानगी घेतों. माफ करा हं मला त्याबद्दल, ' धोंडोपंत म्हणाला.

' हं बोला महाराज, ' त्याला जरा थांबलेला पाहून भैरवनाथ म्हणाला.

'माझी अशी समजूत होती,' पंतांनीं आपलें बोलणें चालू करून म्हटलें, 'कीं म्हातारेबुवांचें आपल्या नातवावर, थोडें कां होईना, पण प्रेम आहे. आणि म्हणून आपलें काम काय सहज होईल असे मांडे खातच आम्ही येथें आलों. पण आतां मला वाटतं एकच उपाय फक्त आमच्या हातांत उरला आहे. सांगू का कोणता तो ?' असें म्हणून त्याच्या उत्तराची वाटही न पाहतां पंतांनीं भैरवनाथाच्या खांद्यावर आपला हात ठेऊन, त्याच्या कानाशीं तोंड नेत जरा हळू पण सर्वांना ऐकूं जाईल इतक्या स्पष्टपणें म्हटलें, ' एकच उपाय, आणि तो म्हणजे चिमटा लावण्याचा.'

' चिमटा ? ' भैरवनाथ उद्गारला.

' चिमटा, चांगला सणसणीत, ' आपल्या खिशाकडे बोट करीत पंत म्हणाले; आणि भैरवनाथानें ' समजलं समजलं ' अशी मुद्रा दाखवतांच ते दाराबाहेर झटकले.

' आस हं हे ! वाहवारे आस !' वेडीवांकडीं तोंडें करीत आणि खांदे हलवीत भैरवनाथ म्हणाला. ' देवाची खैर आहे मोठी. मी नाहीं आतबीस जाणत कुणी. आणि तुम्ही तरी कशाला त्यांची एवढी पत्रास करतां ? अगदींच शेळपट आणि भोळसट आहां तुम्ही; छे. फारीच. लिबलिबीत.'

' मग काय करायचं तरी काय, तें तरी सांगतां ? ' म्हातारा तावातावानें म्हणाला, ' चेष्टा करणं फार सोपं आहे.'

' सांगू, मी सांगू काय केलं असतं तें ? असं म्हणून भैरवनाथानें अशा कांहीं भेसूर रीतीनें हाताच्या मुठी घट्ट आवळून डोळे फिरविले कीं, भीतीनें म्हाताऱ्याचें आंग शहारल्यावाचून राहिलें नाहीं.

जरावेळ थांबून आणि खिशावर हात ठेवून तो म्हणाला, 'मीच आलों आज

घेऊन. जरा जडच आहे तें. आणि नलीला आणतांही नसतं आलं. पण आतां तिला संवय करून ठेवलीच पाहिजे म्हणा. कारण तुमच्या मागून मग तीच.'

' हं ! काय असेल परमेश्वराची मर्जी ती खरी. माझ्या मागें तरी माझ्या बाळीला सुख लागूं दे, ' असं म्हणून म्हाताऱ्यानें एक दीर्घ सुस्कारा सोडला. आपल्या जागेवरून तो उठला आणि आपल्या संत्रस्त मस्तकावर हात फिरवून भैरवनाथाजवळील पैसे घेतले.

आपल्या जागेवरून उठून मधल्या खोलींतील तिजोरींत पैसे ठेऊन तिला कुलूप लावीपर्यंत भैरवनाथाची त्याच्यावर बारीक नजर होती; आणि म्हातारा परत खोलींत येतांच इकडच्या तिकडच्या कांहीं गोष्टी बोलून त्यानें ही मग आमची रजा घेतली.

हा सर्व वेळपर्यंत मी दोन तीन वेळां तिथून उठून निघून जाण्याचा प्रयत्न केला होता. पण प्रत्येक वेळीं नलीच्या आजोबानीं मला हात धरून खालीं बसविलें होतें. तिथें अधीकवेळ थांबण्यासाठीं मला म्हणजे मोठा आग्रहच पाहिजे होता असं नव्हे. कारण माझ्या पहिल्या भेटीच्या वेळीं उत्पन्न झालेलें माझें कुतूहल कमी तर नाहींच पण हजारपटीनें वाढलें मात्र होतें. थोड्याच वेळांत शिवणकामाची आपली छोटी पेटी घेऊन नलीनेंही आपल्या आजोबांजवळ आसन ठोकलें. तिच्या आंत येण्याबरोबर खोलींत एक प्रकारचें नवीनच वातावरण खेळूं लागलें. फुलदाणींत ठेवलेलीं ती ताजीं टवटवीत फुलें, त्यांचा हवेंत दरवळणारा मंद मधुर वास, पोपटाच्या पिंजऱ्यावरील हिरवीगार पानें, आणि आंत त्याचा ' नलुतार, नलुताई ' करीत चाललेला नाच, या सर्वांनीं जणूं काय त्या जुन्यापुराण्या अडगळींत नलीच्या भोंवती रसरशीत जीवनाचा एक अभेद्य कोटच निर्माण केला होता. तिच्या त्या हंसऱ्या, मोहक आणि डौलदार चेहऱ्याकडून, आजोबांच्या त्या काळजीनें खंगलेल्या जीर्ण शरीराकडे दृष्टी वळणें स्वाभाविक खरेंच पण आनंददायक मात्र नव्हत. दिवसेंदिवस क्षीण होत जाणारें हें पिकलें पान गळून गेल्यानंतर या सुकुमार कळीची कोण काळजी घेणार ? जगाच्या सुसाट धांवणाऱ्या वादळी व्यवहारांत या लटलटणाऱ्या पण वत्सल हातानंतर, कोणाचा कणखर पण प्रेमळ हात ती जागा घेईल ? माझें मन विचारीत होतें.

माझ्या मनांतील या विचारांना उत्तर म्हणूनच कीं काय, म्हाताऱ्यानें आपला हात नलीच्या अंगावरून मोठ्या प्रेमानें फिरवला. ' माझ्या करतां

कांहीं नाहीं, पण तुला मात्र जर सुखाचे दिवस मिळतील तर माझे डोळे सुखानें मिटतील. शिव प्रभू ! शिव प्रभू !' त्यांची दृष्टी जणूं शून्यांत परार्धें हुडकीत भविष्यांत स्थिरावत होती.

नलीनें उत्तरादाखल आपल्या आजोबांकडे स्निग्ध दृष्टीनें पाहून मंद हास्य मात्र केलें.

'आतांपर्यंतच्या गेलेल्या तुझ्या आयुष्याचा विचार केला,' म्हातारा पुढें बोलूं लागला, 'तर भारी हालांत तुला मी वाढवली असंच मला वाटतं. भारी भारी हाल झाले पोरी तुझे.'

'बघा हं आजोबा, लागलेत पुन्हां तुम्हीं बोलायला तसं. शप्पथ आहे माझी पुन्हां बोलाल तर !' त्याच्याकडे स्निग्ध दृष्टीनें पण लटक्या रागानें पहात नली म्हणाली.

'थांब पोरी, मला जरा बोलूं दे;' हातानें जणूं काय तिचें निवारण करीत म्हातारा परत बोलूं लागला. 'हालांत दिवस काढलेस खरे, पण माझी पोर मोठी भाग्याची होईल, आणि अगदीं गाडीघोड्यांतून मिरवेल खास. अगदीं आशेनें डोळे लावून बसलों आहें, मी त्या दिवसाकडे नली. पण— पण, जर काहीं माझं मधेंच बरं वाईट झालं तर, कशी झगडणार तूं बाळ या दुष्ट जगाशीं ? कांहींच नाहीं ग बाळ तुझी तयारी केली मी. पिंजऱ्यांतल्या त्या मुक्या जीवाप्रमाणेंच लोकांच्या दयेची भीक तुला मागावी लागेल आणि या विचारानें किं नाहीं मस्तकाच्या अगदीं चिंधड्या उडण्याची वेळ येते माझ्या !......कोण तें ? किशा आलाय मला वाटतं. जा बाळ बघ.'

नली उठून दाराकडे वळली पण मधेंच मागें वाळून आपल्या आजोबांना तिनें घट्ट मिठी मारली, आणि मग डोळ्यांत बंडाळी करणाऱ्या आपल्या अश्रूंना मागें झटकून तिनें दाराकडे धांव मारली.

तिच्या त्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात म्हातारा म्हणाला, 'हें पहा, परवांच्या तुमच्या त्या उद्गारानें मला बेचैन करून सोडलं आहे आज चार दिवस. जें कांहीं केलं आत्तांपर्यंत तें या पोरीच्या कल्याणासाठींच. पण यांत जर का चुकलों असेन तर आता ती चूक दुरुस्त करणं अशक्य आहे. तरीही अजून आशा सोडली नाहीं मी. मला खास वाटतं आहे कीं माझ्या मागें या पोरीला लोकांच्या दयेवर जगावं लागणार नाहीं. जें काय मागें ठेवीन तें भरपूर होईल तिला अगदीं. पण आलीच ती. निःशंक असा आपण त्या बाबतींत. अधीक नाहीं मी कांहीं सांगूं शकत !'

म्हाताऱ्याच्या बोलण्यांतील आवेग, आवाजांतील कातरता, थरथरणारा हात, डोळयांतील तीव्रता आणि लहान बालकाची अधीरी वृत्ती हीं सर्व पाहून मी स्तिमितच झालों. तरीही म्हाताऱ्याच्या स्वभावाचें गूढ मला कांहीं उलगडेना. सबंध आयुष्यभर पैसा पैसा करून तडफडणाऱ्या आणि दारिद्र्याच्या भीतीनें नेहमीं गांजलेल्या एकाद्या चिक्कण मामाच्या वर्गांतील तर ही स्वारी नसेलना, अशीही शंका माझ्या मनाला चाटून गेली. पण आपल्या नातीवरचें त्याचं प्रेम ? तें तर मुळींच हिणकस दिसत नव्हतं. मग...?

पण नली किशाची दुक्कल आंत आली आणि माझ्या विचारांना कलाटणी मिळाली.

किशाची स्वारी आली ती अगदीं निमूटपणें मान खालीं घालून पाटी घेऊन आपल्या छोट्या धनिणीजवळ बसली, आणि मग त्यांच्या शाळेला सुरवात झाली. त्या दोघांच्या हंसण्या खिदळण्यावरून त्यांचा नेहमींचाच कार्यक्रम दिसला तो. नलीचा तो प्रौढ विद्यार्थी मारे अगदीं गंभीर चेहरा करून कागदावरील आपला धडा गिरवीत होता. जीभ या गालांतून त्या गालांत अशी सारखी भ्रमंती करीत होती तर डोकें अगदीं पुष्टिपत्राला भेटायला येत होतें. अक्षरांच्या वाकड्या तिकड्या अनभ्यस्त वळणाशीं झगडण्यासाठींच जणूं काय तो महावीर अस्तन्या मागें सारून वीरासन घालून बसला होता ! हाताचीं बोटें शाईनें बरबटलेलीं आणि आसपासच्या जागेवर रंगपंचमीची शोभा पसरलेली. त्याचे ते विचित्र हातवारे आणि तो करीत असलेले अक्षरांचे खून पाहून त्याच्या छोट्या मास्तरणीची अगदीं हंसून हंसून मुरकुंडी वळत होती. मध्येंच स्वतःच्या मूर्खपणाचें कौतुक वाटून किशाही मोकळ्या वृत्तीनें आपल्या हास्याचे फवारे उडवून देई. गुरु शिष्यांची ती जोडी पाहून आमचीही मोठी करमणूक होत होती. इतक्यांत सायंकाळही झाली आणि माझ्याप्रमाणेंच रात्रीं बाहेर पडण्याच्या आपल्या दैनिक कार्यक्रमाच्या आठवणीनें म्हातारेबुवाही उठले.

प्रिय वाचक, आतांपर्यंत मी आपली सोबत करून कथानकांतील प्रमुख व्यक्तींची आपल्याला ओळख करून दिली. अर्थात् स्वतःच्या सुखदुःखांची कहाणी माझ्यापेक्षां तींच प्रत्यक्ष सांगणें अधीक योग्य असल्यानें मी आतां मध्यें न येतां बाजूला सरणें बरें नाहीं का ?

---

# ३

बंदराच्या एके बाजूला भैरवनाथची जागा होती. एक जुनाट मोडकळीस आलेलें घर होतें तें. पुढल्याच बाजूला भैरवनाथाची बसण्याची जागा होती. मातींतच चार खांब पुरून एक फळयांचा माचा तयार केला होता, आणि त्यावरच एक गादी व तक्क्या टाकला होता. आजुबाजूला कांहीं लांकडाचे ओंडके, तेल लावलेल्या फळया, फाटकीं अवजारें, एक दोन गंजलेले नांगर, कांहीं तेलाचीं पिंपें, चार दोन वल्हीं इतस्ततः सरमिसळ पडलीं होतीं. अर्धवट कुजलेल्या खाऱ्या चिखलाची घाण आणि तेलाच्या पिंपांचा येणारा ओशट वास यांच्या तऱ्हेवाईक मिश्रणानें कोणाचेंही डोकें उठून गेलें असतें. त्या ओंगळ उग्र वासावरून आणि जागेच्या एकंदर बुरसटपणावरून भैरवनाथाचा धंदा मोठा चलतीचा नसावा असें दिसत होतें. खाडीवरील होडी मक्तेदार व गलबतांचा लहानसा व्यापारी असा त्याचा जोड धंदा होता. गिऱ्हाइकांचीही फारशी येजा असावी असें दिसत नव्हतें. एक चौदा पंधरा वर्षांचा पोरगेला गडी मात्र नेहमीं खाडीवर ओहटीच्या वेळीं चिखलात दगड फेकीत किंवा भरतीच्या वेळीं तोंडानें शीळ घालीत बंदराकडे येणाऱ्या जाणाऱ्या जहाजांकडे पहात तेथें उभा असलेला अथवा वाळूच्या ढिगाऱ्या वरून उलटासुलटा कोलांटया मारीत असलेला दिसायचा.

आतांही भरतीची वेळ होती. आकाश स्वच्छ असल्यानें खाडीचें पाणी चांदीच्या रसाप्रमाणें चमकत होतें. आंत बाहेर येणाऱ्या जहाजांची एकच गर्दी उडाली होती. कांहींचीं वाऱ्यानें फुगलेलीं डौलदार पांढरीं शुभ्र अवजारें प्रवासाच्या पहिल्या उन्मादांत, तर कांहींचीं अर्धवट गुंडाळल्यामुळें फड-फडणारीं आणि प्रवास संपल्याचा आनंद दाखवीत हेलकावणारीं शिडें मोठीं गमतीदार दिसत होतीं. खलाशांच्या 'दमान, घोसच्या' आरोळया आणि नांगरांच्या साखळदंडांचा खळखळाट, मासळीच्या गलबतांभोंवतीं हिंडणाऱ्या

पक्षांचा चिंवचिवाट आणि बंदरावर जमा झालेल्या कोळणींचा आणि पोरांचा कलकलाट, या सर्वांची एक मोठी चमत्कारिक गल्लत उडाली होती. जणूं काय आतांपर्यंत निद्रिस्त असलेला खाडीवरील वास्तुपुरुष जागा होऊन आतांपर्यंतच्या शांततेचा सूडच घेत होता ! कांठाला आलेल्या जहाजां-वरील सामान आतां उतरून घेण्यास सुरवात झाल्यानें हमालांची आणि गाड्यांची य जा वाढूं लागली.

रोजची वेळ झाल्यानें भैरवनाथाची स्वारीही मोठ्या मजेंत हलतडुलत आपल्या झोपडीकडे येत होती. भोंवतालच्या त्या गजबजाटाकडे त्याचें मुळींच लक्ष नव्हतें; कारण रोजच्याच परिचयाचा होता त्याच्या तो. झोंपडीजवळ येऊन त्यानें आपली कोट टोपी माच्यावरील बैठकीवर टाकली. आणि खंडू कुठें न दिसल्यानें त्यानें इकडे तिकडे पाहण्यास सुरवात केली. तों खंडोबांची स्वारी, माशाच्या एका तुकड्यासाठीं एकमेकांवर तुटून पडणाऱ्या दोन लठ्ठ कुत्र्यांच्या झोंबीकडे मोठ्या तन्मयतेनें पहात असलेली त्याला दिसतांच त्याला हांक मारण्यास त्यानें सुरवात केली. पण कुत्र्यांच्या आरडाओरडींत माल-काचा आवाज खंडोबांच्या कर्णपुटांत न शिरल्यामुळें भैरवनाथ शिव्या देतच तिथें आला, आणि हातांतील काठीचा एक सणसणीत टोला त्यानें खंडोबांच्या ढुंगणावर लगावला. स्वतःवरील या आकस्मिक हल्ल्यानें चकित होऊन तो मागें वळून पाहतो तों त्याचा कान चांगला पिरगळला जाऊन, 'गधड्या, हांक ऐकूं नाहीं आली, कान फुटले होय,' असे कांहींसे शब्द आणि वर एक वानगी दाखल थप्पड त्याला मिळाली. आपल्या मालकावांचून इतका प्रेमळ हात दुसऱ्या कोणाचा असणार तें समजून 'नाय शेट, नाय शेट, येतच होतों मी तिकडे; सोडा, सोडा, कान शाप तुटला बघा तो,' असें ओरडत त्यानें आपला कान सोडवून घेतला आणि अं अं असें करीत व हातानें कान चोळीत त्यानें झोपडीकडे धांव मारली.

'चल जा, त्या पकटीवर जाऊन उभा रहा आणि नीट कर वसुली,' त्याच्या पाठोपाठ आंत आलेला भैरवनाथ म्हणाला. 'परत तर असा मला सांपड, कीं पार तंगडीच मोडून टाकतों बघ.' इतकें बोलून त्यानें गादीवर पाय पसरले व थोड्याच वेळांत त्याच्या तालबद्ध घोरण्यास सुरवात झाली.

त्याला झोंपून पंधराएक मिनिटें झालीं असतील नसतील तों खंडू आंत

डोकावला. त्याच्या त्या तेवढ्या चाहुलीनें भैरवनाथ जागा झाला आणि ' कशाला आलास मरायला आंत, ' म्हणून त्याच्यावर कडाडला.

' काय नाय, काय नाय. पन् भाहेर आलया क्नोन्, ' खंडू पुटपुटला.

' पण कोण आलं आहे ? '

' मना नाय ठावा शेट.'

' मग गधड्या विचार कीं; नुसताच काय मुंडी हलवतोस बैलोबासारखी, ' शेट बोलले.

पण शेटचा पवित्रा पाहून खंडूनें मागें पाय घेतला आणि आपल्या मागील व्यक्तीलाच त्यानें आंत पाठविलें.

' कोण तें, नली ! ' भैरवनाथ ओरडला.

त्याचे तें ओरडणें, झोपेनें लाल झालेले डोळे आणि अस्ताव्यस्त पोषाक पाहून भेदरलेली व आत पाऊल टाकावें न टाकावें या विचारांत पडलेली नली म्हणाली, ' हो मीच ती. तुमच्याचकडे आलें होतें. '

' ये ये आंत ये ', नीट बसत भैरवनाथ म्हणाला. ' ये बस इकडे. काय निरोप आणला आहेस आज, नली ! '

नलीनें त्याच्या हातांत एक पत्र दिलें. भैरवनाथ तें पत्र उघडून आंतील मजकुरावरून आपली दृष्टी फिरवूं लागला. नली तेथेंच उभी राहून पत्र वाचीत असतांना त्याच्या चेहऱ्यावर होणारे फेरबदल पहात होती. पत्र वाचून आंतील मजकुरावरून तो जरा गोंधळांत पडल्यासारखा दिसला. पण लगेच नलीकडे वळून मोठ्यानें म्हणाला, ' ए पोरी, वाचलं आहेस का तूं हें पत्र ? '

' मी ? नाहीं बा, ' त्याच्या आवाजानें एकदम दचकून ती म्हणाली.

' अगदीं नक्की, एक अक्षरही ठाऊक नाहीं यांतलं तुला ? '

' एक अक्षर सुद्धां नाहीं, शेटजी. '

' बरं ! ' तिच्या निष्कपट चेहऱ्याकडे पाहून तो म्हणाला. ' असेल तसं. पण आश्चर्य आहे. खरंसुद्धां नाहीं वाटत. आमची भेट झाल्याला पुरता दिवससुद्धां झाला नाहीं आणि एवढ्यांत सगळे गेले कसे ? मोठं गूढ आहे बुवा ! ' ' खरंच मोठं गूढ आहे बुवा ' असें परत आपल्याशींच पुटपुटत, आणि तें गूढ उकलण्यासाठींच जणूं काय त्यानें आपलें डोकें खाजविण्यास,

व बोटाचीं नखें कुरतुडण्यास सुरवात केली. मधेंच त्याच्या क्रूर चेहऱ्यावर किंचित् हास्य चमकलें व मुद्रा जरा समाधानी दिसूं लागली. भविष्यकाळच्या कांहीं सुखद विचारांतच तो जसा कांहीं रमला होता.

' हें बघ नली, आपल्याला आतां माझ्या घरीं जायचं आहे. आमच्या हिची तुझ्यावर फार माया आहे. पण माझ्याहून कमीच म्हणा, ' भैरवनाथ म्हणाला. हें तो बोलत असतांना त्याची दृष्टी नलीवर मोठ्या आशाळभूत-पणानें खिळली होती.

' पण मला नाहीं येतां येणार ', नली वर पाहून म्हणाली. ' उत्तर घेऊन मला तसंच परत बोलावलं आहे—आजोबानीं.'

' पण तें तुला मिळालं आहे कुठें आणि मिळणार आहे तरी कुठें घरीं आल्याशिवाय. म्हणजे मग तुझा निरोप पुरा करायला तुला माझ्याबरोबर आलं पाहिजे कीं नको ? चला आपण जाऊंच. ती काठी घे पाहूं इकडे. ' असें म्हणून त्यानें डोक्यावर टोपी चढवली आणि तो खंडूला पाहण्यासाठीं पकटीकडे वळला. तिकडे पाहतो तों खंडू आपल्याच वयाच्या एका पोरा-बरोबर मोठ्यामोठ्यानें ओरडत मारामारींत गर्क झालेला दिसला. दोघेही एकमेकाला बडवीत, ओरबाडीत वाळूंत धडपडत होते. शेपट्या पिंजारलेले जणूं कांहीं दोन लठ्ठ बोकेचसे दिसत होते ते.

' अगबाई किशा ! ' कळवळून नली ओरडली. ' आमचा किशा आहे हो तो. माझ्याच बरोबर आला आहे तो. सोडवा हो शेटजी तुम्हीं त्याला ! '

' थांब जरा, सोडवतोंच हं दोघांना, ' असें म्हणून तो झटकन आपल्या मकाणांत जाऊन आपली छडी घेऊन बाहेर आला. ' सोडवतों हो या हराम-जाद्यांना, ' तो परत ओरडला आणि तिकडे वळला. पण त्या दोघा गामा-गुंगांना कसलीच दखल नव्हती; अगदीं पूर्णपणें तल्लीन झाले होते ते आपल्या मुष्टियुद्धांत. त्यामुळें त्यांचेकडे धांवत येणाऱ्या भैरवनाथाची, तो जवळ येऊन त्यांच्या पाठींत चांगले दोन दोन रट्टे घालीपर्यंत त्यांना चाहूल लागली नाहीं. पण अंगावर एकदम पाण्याचा मारा झाल्याबरोबर तुरबुर-लेल्या बोकोबांची जशी पांगापांग होते, अगदीं तश्शीच अवस्था त्या दोन पठ्ठयांची झाली; आणि अनपेक्षित दिशेकडून मिळालेल्या या सणसणीत तडाक्यामुळें एकमेकांना दूर ढकलून ते उभे राहिले.

'कांहीं हरकत नाहीं,' मान हालवीत व आपलें डोकें चोळीत खंडू म्हणाला. 'पुन्हां नाय तुम्हांला कोनी श्या दिल्या तरी आपुन त्याला हटकनार. सोंग म्हनाला तुम्हांला लो शेट, ठावं हाय ?'

'मग त्यानें कां आमच्या नलूताईना माकड म्हणावें ? माकडासारखी आहे काय ती ?' किशानें जोरानें आपली बाजू मांडली. 'आणखी म्हणाला काय कीं नलुताई आणि तिचे आजोबा तुमचे लाळघोटे आहेत. तुमचे काय चाकर आहेत काय ते ?'

'गधडा आहे तो शुद्ध,' भैरवनाथ म्हणाला, 'आणि तूं ही पण' असें आपल्या मुद्रेनें दाखवीत तो मिस्किलपणें हांसला. 'हें घे चहाला तुला किशा. ए भुता, बघतोस काय असा मारक्या म्हशीसारखा. दार लाव तें आणि आण किल्ली इकडे.'

त्यानें दिलेली किल्ली खिशांत टाकून भैरवनाथ नली किशाला घेऊन घराच्या दिशेला वळला. त्याची पाठ वळतांच त्याला वांकुल्या दाखवीत व पाठीवरील प्रसादाची आठवण होतांच अर्वाच्य शिव्या देत खंड्यानेंही आपल्या घरचा रस्ता सुधारला............

यजमानांची धिंडका तीन चार तास तरी आतां येणार नसल्यामुळें आपलें दुपारचें काम आवरून भैरवनाथाच्या भामाबाई वामकुक्षी करीत पडल्या होत्या. जरा डोळा लागतो न लागतो तोंच यजमानांचा पदरव लागून त्या जाग्या झाल्या.

'भामे, ही नली तावडे,' भैरवनाथ म्हणाला. 'झटपट कांहीं खायला कर. दमली असेल ती. मीहि एक पत्र लिहून येतोंच.'

यजमानांच्या त्या अपरिचित लाडिक आवाजानें पुढें काय वाढलें आहे याची कल्पना न होऊन भामाबाईनी यजमानांच्या चेहऱ्याकडे भयचकित नजरेनें पहात, त्यांच्या खुणेप्रमाणें त्यांच्या मागोमाग त्या दुसऱ्या खोलींत जाऊन खालीं पहात उभ्या राहिल्या.

'हें पहा, नीट ऐक मी काय सांगतों तें. पाहूं नकोस अशी वेंधळ्यासारखी,' भैरवनाथ खालच्या आवाजांत म्हणाला. 'त्या पोरीच्या जरा पोटांत शिरून तिच्या आजोबांची चांगली बारकाईनें चौकशी कर. करतात काय काय, रहातात कसे, तिला काय काय सांगतात वगैरे सगळं नीट विचार. जरूर आहे मला त्याची फार. ऐकूं आलं ना ?'

'होय, आलं.'

'जा तर. आतां काय राहिलं ?'

'पण मला नाहीं जमायचं गडे. भारी आवडते मला ती छोकरी. तिला कशी फसवूं मी ?' भामाबाई घाबरत म्हणाल्या.

'तें कांहीं नाहीं. तुला केलंच पाहिजे तें,' तिच्या हाताला हिसका देत भैरवनाथ म्हणाला, 'बाजूच्या खोलींतून ऐकतों आहे मी. जर का पाघळायला लागलीस तर दार वाजवीन मी. पण याद राखून ठेव तशी पाळी आली तर. जा निघ!' ती बाहेर गेल्यावर त्यानें खोलीचें दार जरा आड ढकललें आणि त्याच्यामागें एखाद्या शिकारी कुत्र्यासारखा कान लावून तो ऐकत बसला.

भामाबाईही नलीजवळ येऊन आतां कशी सुरुवात करावी या विवंचनेंत जरा बसल्या. पण दाराची जरा करकर झाल्याबरोबर आपलं सगळं धैर्य एकवटून त्या म्हणाल्या. 'किती वेळां आली होतीस तूं आमच्याकडे ?'

'खूप खूप वेळां,' मोकळेपणानें नली म्हणाली.

'आणि तुझ्या आजोबांना कांहींच त्याचं वाटत नाहीं ?'

'वाटतं तर, ते आपल्याशींच सुसकारा सोडून स्वस्थ बसतात. काय दार करकरतं आहे तें.'

'असंच करकरतं तें,' भेदरटपणें तिकडे पहात भामाबाई म्हणाल्या, 'पण काय ग तुझे आजोबा असेच का गरीब होते अगदीं ?'

'छे छे !' नली एकदम म्हणाली. किती सुखांत होतों आम्हीं, आणि आजोबाही कसे आनंदांत असत. पण अलीकडे मोठा प्रसंग आला आहे आमच्यावर. किती खिन्न असतात हल्लीं ते.'

'बदलतील हो ते पुन्हां, नली. अगदीं पहिल्यासारखे होतील.'

'तुमच्या तोंडांत साखर पडो भामाबाई. गहिंवरलेल्या आवाजांत नली म्हणाली, 'पण अलीकडे पुष्कळ दिवस ते...दार हलतय मला वाटतं तें.'

'वाऱ्यानें असेल हो. पण पुष्कळ दिवस काय—?'

'खिन्न आणि विचारमग्न दिसतात. रात्रीं जेवणानंतर आम्हीं कसा हांसत खेळत वेळ घालवीत असूं. मी मग त्यांच्याजवळ वाचीत बसायची. आणि मी थांबल्यानंतर माझ्या आईच्या नी बाबांच्या कित्ती कित्ती गोष्टी सांगायचे ते. अगदीं थेट मीच, अशी दिसे म्हणे माझी आई.' बोलतांना तिच्या डोळयां-

तून आसवं गळूं लागलीं. ' उगी उगी, माझी बाळ ती! तुला रडतांना पाहिली कीं नाहीं, कीं माझ्या पोटांत कसं भडभडून येतं. ' भामाबाई म्हणाल्या.

' नेहमीं नाहीं असं होत कांहीं, ' आपले डोळे पुसून हंसत नली म्हणाली. ' पण आज अगदीं राहवेना. मोकळं करावंसं वाटलं मन तुमच्याजवळ. पण म्हणजे कांहीं आजोबा माझ्याजवळ नीट वागत नाहीं असं नाहीं. उलट मला वाटतं ते जास्तच वेडे होत चालले आहेत. अजून सांगितलं नाहीं तुम्हांला मी, पण मोठा बदल झाला आहे एक त्यांच्यांत. त्यांना झोंप कशी ती नाहींच. दिवसा खुर्चीत काय जरा डोळा लागेल तो. कारण रोज रात्रीं ते बहुतेक बाहेरच असतात. '

' काय म्हणतेस काय नली ? '

' जरा हळू भामाबाई, ' त्यांना डोळ्यांनें दाबीत नली म्हणाली. घरीं येतात तेव्हां बहुतेक उजाडलेलं असतं. आज तर सूर्य उगवायचीच वेळ झाली होती. नलीला परत एकदां जुन्या आठवणींनीं भडभडून आलें आणि भामाबाईंना पण काय बोलावें तें सुचेना. इतक्यांत भैरवनाथ आंत आला आणि तिच्याकडे दृष्टी जातांच सहानुभूतीचा मोठा आव आणून म्हणाला, ' अरे अरे ! पोरगी फारच थकून गेलेली दिसते. आणि त्या दोघां हुप्यांच्या मारामारीनेंही ती भेदरून गेली असेल फार. थांब हं बाळ जरा. दमबीम टाक चहा वगैरे घे, म्हणजे जरा बरं वाटेल. काय हो, झालं कीं नाहीं तुमचं ? '

' नको नको शेटजी. मी जातें आतां, बराच उशीर झाला आहे, ' घाई घाईनें आपले डोळे पुशीत नली म्हणाली.

' काय, जातेस ? जाणार म्हणतेस मग काय ! ही घे चिठी, ' भैरवनाथ म्हणाला. ' उद्यां किंवा परवां भेटेन म्हणूनच लिहिलं आहे त्यांत. त्यांना म्हणावं आज कांहीं तुमची कामगिरी नाहीं करतां यायची मला. '

भामाबाईंना ' जातें हं ' म्हणून सांगून नलीही मग बाहेर पडली.

# ४

दोन तीन दिवस झाले वर लिहिलेल्या प्रसंगाला. नलीचे आजोबा थोडे अस्वस्थ होते त्या दिवशीं. आंगही जरा मोडून आल्यानें ते कांहीं आज बाहेर जाणार नव्हते. त्या कल्पनेनें नलीला थोडा उल्हास वाटला. पण आजोबांच्या खंगलेल्या चेहऱ्याकडे दृष्टी जातांच तिचा उल्हास मावळला.

'दोन दिवस झाले नाहीं,' ते म्हणाले. 'मग अजून कसं त्याचं उत्तर नाहीं कांहीं. तुला काय म्हणाला होता तो नली ?'

'दोन दिवसांनीं; असंच म्हणाले होते ते आजोबा.'

'परत सांग मला बाळ. माझं डोकं कीं नाहीं गिरगिरतं आहे. त्यामुळें आठवण रहात नाहीं कांहीं,' ते क्षीण आवाजांत म्हणाले. 'दोन दिवसांनीं भेटेन, एवढंच ? चिठींतपण तेवढंच होतं ?'

'हो, तेवढंच आजोबा, आणखी नाहीं कांहीं,' नली म्हणाली. 'उद्यां जाऊं का परत त्यांच्याकडे ? लौकर परत येईन मी जेवणाच्या आधीं.'

म्हाताऱ्यानें आपली मान हालविली आणि एक निश्वास टाकून नातीला आपल्याजवळ घेतलें. 'त्यांत कांहीं अर्थ नाहीं बाळ. पण त्यानें जर मला या घटकेला सोडलन् तर मात्र मी बुडालों, ठार बुडालों, आणि तुझाही सत्यानाश केला नली. भिकारी झालों आपण ! भिकारी !!'

'मग झालों म्हणून,' धिटाईनें नली म्हणाली, 'तरीही सुखी होऊं आपण.'

'सुखी ? भिकारी आणि सुखी ? कसं समजायचं तुला बाळ !'

'आजोबा,' आत्मविश्वासाच्या आवेशानें ती म्हणाली, 'खुळी नाहीं मी आजोबा, तसं म्हणायला. पण तसं जरी असलं तरी आजचं हें जिणं जगण्या-पेक्षां, आकाशाच्या छत्राखालीं शेतबांधावर भाकरीतुकडा मिळवून आपण नक्की अधीक सुखी होऊं, आजोबा.'

' म्हणतेस काय नली, ' म्हणून त्यांनीं केलेल्या अडथळयास न जुमानतां ती आवेगानं पुढें म्हणाली,—' पण आजचं हें जिणं नको. सांगाना आजोबा मला काय झालं तें ? तुम्हीं जर भिकारी झालां असाल तर मीहि आहे कीं तुमच्याबरोबर काठी धरायला. पण असे हे मला कांहीं न सांगतां सवरतां तुम्हांला खिन्न बसलेले पाहिले कीं नाहीं आजोबा, कीं माझं अंतःकरण अगदीं दुभंग होऊन जातं. चला, उद्यां चला या भिकार जागेंतून. मग दारोदार हिंडायला लागलं तरी बेहेत्तर ! '

तिला हें शहाणपण आलं तरी कोठून या विचारानें म्हातारा तिच्या त्या निश्चयी पण प्रसन्न चेहऱ्याकडे क्षणमात्रच दिपल्यासारखा पाहूं लागला. समाधानाचें मधुर हास्यही त्याच्या त्या क्षीण, सुरकुतलेल्या चेहऱ्यावर जरा वेळ बागडलें. पण दुसऱ्याच क्षणीं भविष्यकाळचें भीषण चित्र डोळयांपुढें मूर्तिमंत उभें राहिल्यामुळें हतबल होऊन, हातानें तोंड झांकून विषण्णपणें त्यानें उशीवर डोकें टेंकलें.

म्हाताऱ्याची ती विकल स्थिती पाहून त्याच्या डोक्यावर हात ठेवून नली म्हणाली, ' असा काय धीर सोडतां आजोबा. मला नाहीं वाटत त्याचं कांहीं. सहज पोट भरेल आपलं. खेड्यापाड्यांतील मोकळया हवेंत हिंडूं आपण, काय मिळेल तें खाऊं नि रानपांखरांच्या संगतींत, दाट सावलींत निजूं झाडांच्या. पैशाचा विचार सुद्धां करूं नका तुम्हीं किंवा जुन्या आठवणी काढून असे खिन्न होऊं नका. देवाला काळजी आहे आपली. तुम्हींच म्हणतांना तो फार मायाळू आहे म्हणून. पुन्हां पाऊल सुद्धां नाहीं टाकणार आपण असल्या घरांत. मजा वाटेल मला मोठी बघा त्या हिरव्यागार कुरणांतून आणि शेतांतून हिंडायला. चालून चालून थकलों कीं एकाद्या झाडाखालीं करूं आपलं घर. तुम्हीं तिथें स्वस्थपणें पडा आणि मी आणीन कांहीं भाकर तुकडा मिळवून. मला नाहीं लाज वाटणार आजोबा ! '

आजोबा नातीचा हा हृदय हालवणारा संवाद चालला असतां भैरवनाथ हळूच आंत येऊन त्या देखाव्यानें जरा चकित होऊनच एका घडवंचीवर बसून त्या विलक्षण जोडीकडे कांहीं आवाज न करतां स्तब्धपणें पहात— होता. ते दोनही दुःखी जीव आपल्याच जगांत अगदीं मग्न असल्यानें कोणाचेंच लक्ष त्याच्याकडे गेलें नाहीं. त्याच्याकडे लक्ष जातांच नलीनें

' अगबाई शेटजी ! ' असा अस्फुट उद्गार काढला आणि ती त्याच्याकडे स्तिमितपणेंच पहात राहिली. तिच्या ओरडण्यानें दचकून आजोबानींही वर पाहिलें आणि आपण स्वप्नांत तर नाहींना अशा मुद्रेनें भैरवनाथाकडे त्यांनीं दृष्टी लावली.

'कोण भैरवनाथ ? आंत कसे आलांत तुम्हीं ?' त्यानीं जरा वेळानें विचारलें.

'चांगला राजरस्त्यानें ' दाराकडे बोट दाखवीतच जरा कुऱ्यानें तो म्हणाला. ' एखाद्या भोकाबिकांतून आलोसं वाटलं का काय तुम्हांला ? इतका कांहीं खत्रूड नाहीं मी ! खाजगी बोलायचं आहे मला कांहीं तुमच्याशीं. फक्त तुमच्याशींच, नलीसुद्धां असतां नाहीं कामा इथें. '

नलीनें आपल्या आजोबांकडे पाहिलें आणि त्यांच्या चेहऱ्यावरील भाव ओळखून ती खोलीबाहेर पडली.

' आः, काय गोड पोरगी आहे ! गाल कसे अगदीं खरवसासारखे गुलगुलीत आहेत, नाहीं ? ' तिच्याकडे अधाशासारखा पहात भैरवनाथ म्हणाला, ' गोड, फारच गोड ! '

त्याचे हे लघाळ शब्द कानांवर पडतांच नलीनें त्याच्याकडे तिरस्कारानें पाहिलें मात्र. म्हातारा अस्वस्थपणें खोलींत फेऱ्या मारीत होता, आणि नली दूर गेलीसें पाहून भैरवनाथाच्या समोर एकदम उभे राहून त्यानीं त्याला विचारलें, ' एकदांच सांगून टाका शेटजी, पैसे आणलेत कीं नाहीं ? '

' नाहीं, ' भैरवनाथ शांतपणें म्हणाला.

' संपलं तर मग सारं ! ' म्हाताऱ्यानें खोलीबाहेर दृष्टी टाकून सुसकारत म्हटलें.

' हें पहा म्हातारेबुवा, आतां लपंडाव नको. समजलं गुपित तुमचं सगळं मला. आतां लप्पं छप्पं करण्यांत कांहीं अर्थ नाहीं; ' कठोरपणानें त्याच्याकडे पहात भैरवनाथ म्हणाला. ' आजपर्यंत दिलेले सगळे पैसे, अगदीं पैनपै, सांगू कुठें गेले ते ? जुगारांत ! तुमच्या त्या रात्रींच्या भटकंतींत; जुगाराच्या अड्यांत ! आणि हाच तुमचा माझ्या जिवावर लखपती होण्याचा रस्ता नाहीं का ? म्हणे माझी सोन्याची खाण आहे ती. अरे वारे खाण !

' अरे हो. सोन्याची खाण नाहीं तर काय ? ' म्हाताऱ्यानें त्याच्याकडे तीव्र दृष्टीनें पहात उत्तर केलें. ' अजूनही आहेच ती. मी मरेपर्यंत तरी. '

'आणि हा जुगारी माझ्या डोळ्यांत धूळ टाकीत होता आजपर्यंत!' तिरस्कारानें त्याच्याकडे पाहून भैरवनाथ म्हणाला.

'कोण जुगारी? मी?' म्हातारा आवेशानें कडाडला. 'तो सर्वसाक्षी परमेश्वरच माझा साक्षीदार आहे. स्वतःच्या सुखाच्या आशेनें नाहीं पैसे लावले मी. त्या पोरक्या पोरीसाठीं जीव तळमळत होता माझा. पण देवाची मर्जी. नाहीं त्याला दया आली. कोणीही त्या पोरक्या पोरीसाठीं केलं असतं हें.'

म्हाताऱ्याच्या त्या आवेशानें जरा मवाळून पण कुत्सितपणें भैरवनाथानें विचारलें, 'आणि केव्हांपासून धंदा सुरू केलांत तुम्हीं हा आजोबा?'

'केव्हां?' दुसरे केव्हां असणार? मीं तर असा हा थकत चाललों. पैसा तर जवळ विशेष नाहीं. आयुष्याचे दिवसही संपत चालले. पोरीच्या काळजीनें कांहीं सुचेना, आणि मग विचार आला हा डोक्यांत?'

'आपल्या दिवट्या नातवाला एकाद्या जहाजावर अडकवा म्हणून मला सांगायला आलांत, तेव्हांच ना?' भैरवनाथानें विचारलें.

'अं हं तेव्हां नाहीं, पण त्यानंतर लौकरच. किती दिवस माझा निश्चय होत नव्हता. पण शेवटीं सुरवात केली...कांहीं सुखानें नाहीं...अगदीं नाइलाजानेंच.'

'माझ्याकडे आलांत कर्ज मागायला, तें स्वतःचं डबोलं सगळं खड्डयांत घातल्यावरच ना? काय थापा मारल्या मला पैसे मिळवण्याच्या. बापरे! आणि इकडे तर जास्तच डुबत चाललां होतांत. शेवटीं तर हा सगळा जुना बाजारच गहाण टाकलात. पण एकदां तरी हाताला यश आलं का?'

'अं हं, कधींच नाहीं,' म्हाताऱ्यानें निराशेनें म्हटलें. 'एकदां पडलेला खड्डा कधींच भरून आला नाहीं.'

'माझी आपली कल्पना होती कीं, सरावानें मनुष्याला केव्हांतरी लग्गा मिळतो; निदान तो जास्त डुबत तरी नाहीं. मला आपलं वाटलं हो.' भैरवनाथ हेटाळणीनें म्हणाला.

'खरं आहे तें. मला अजूनही आशा आहे वर यायची,' भोळ्या आशेनें म्हातारा म्हणाला. 'पुरी पुरी खात्री आहे मला. माझं मनच सांगतं आहे. देता का थोडी रक्कम,...देता का भैरवनाथ?'

भैरवनाथानें आपली मान हलविली.

'हें पहा भैरवनाथ. आजची वेळ संभाळा.' म्हाताऱ्यानें आपल्या खिशांतील कांहीं कागद त्याच्यापुढें करून म्हटलें, 'हे पहा आकडे; आज यश मिळालंच पाहिजे. करा थोडी सवड रकमेची. कांहीं फार नाहीं मागत. फक्त वीसच द्या. करा मेहेरबानी एवढी.'

'मागच्या वेळेला किती सत्तर दिले होते नाहीं? सगळे एका रात्रींत उडाले ते?'

'होय हो. फारच वाईट दिवस तो. पण आतां पुन्हां नाहीं मागणार. त्या पोरक्या पोरीकडे तरी पहाहो! आणि तिच्याकरतां घाला मला एवढी भिक्षा, भैरवनाथ!' म्हातारा अतीशय अजीजीनें म्हणाला.

'वेळ नाहीं मला आतां. दुसरीकडे जायचं आहे मला. नाहीं तर घेतला असता आपल्या संगतीचा लाभ आणखी थोडा वेळ. त्या पोरीच्या हातचा गोड गोड चहाही मिळाला असता आम्हांला.' नलीच्या खोलीकडे पहात शांतपणें तो उत्तरला.

'घालाच एवढी भिक्षा भैरवनाथ! शेवटची, अगदीं शेवटची. पुन्हां नाहीं त्रास देणार तुम्हांला!' म्हाताऱ्यानें परत गयावया करीत म्हटलें.

'नाइलाज आहे माझा, आजोबा. माझ्या जिवावर येतं आहे नाहीं म्हणायचं;' भैरवनाथानें साळसूदपणें म्हटलें. 'तुमचा जुना लौकिक, तुमची काटकसरीची राहणी हीं पाहून नुसत्या परमेश्वरीवर सुद्धां रक्कम दिली असती. पण तुमचा हा चोरटा जुगार!....छे! शक्य नाहीं तें.'

'कुणी, कुणी सांगितलं तुम्हांला हें?' म्हातारा एकदम ओरडला.

'कोण वाटतो तुम्हांला असेलसं?' भैरवनाथानें विचारलें.

'किशा असेल तो. दुसरा कोण? म्हातारा बोलला. 'किशाच! तुम्हीं बनवला असेल त्याला, आणि पाळत ठेवायला लावलीत त्याला माझ्यावर. खरं कीं नाहीं? तोच असला पाहिजे. दुसरा नाहीं कोणी?'

'मी? मला हो काय गरज? पण शंका तरी कशी आली हो तुम्हांला किशाची? पण त्याचंच काम हें. गरीब बिचारा!' मिस्किलपणें भैरवनाथ म्हणाला; आणि 'मला शिमग्याचें सोंग म्हणतोस काय पोरट्या, अं!' असें पुटपुटत सूडाच्या आनंदांतच त्यानें बाहेर पाऊल टाकलें.

## ५

आणि त्यानंतर मग भैरवनाथचे येण्याजाण्यावर कोणीतरी बारीक पाळत ठेवली होती. आजही तो समोरच्या घराच्या कमानीच्या आड आपल्या जागेवर उभा होता. दिवे लागून गेले होते. रस्त्यावरील वर्दळ बहुतेक कमी झाली होती. फक्त कांहीं गंडेरीवाले आणि कडक चंपीवाले आपल्या कर्कश आवाजांत ओरडत हिंडतांना दिसत होते. पाळत करणारी व्यक्ती आपले कान टवकारून समोरच्या घराकडे शिकारी कुत्र्याच्या नजरेनें पहात बसली होती. एकदां घेतलेला आपला पवित्रा तिळमात्रही न हालवतां कितीवेळ तरी ती निश्चल उभी होती. शेजारच्या घड्याळांत अकराचे ठोके पडले. तरीही कांहीं हालचाल न दिसल्यानें निराश होऊन, आपल्याशींच कांहींतरी पुटपुटत, किशानें—हो किशाच होता आपला तो—आपली जागा सोडली. मागें पुढें पहात, दबकत दबकत कांहीं पाउलें गेल्यानंतर त्यानें झपाट्यानें पाऊल उचललें. रस्त्याचें वळण मागें टाकल्यानंतर आपली गती वाढवून शेवटीं त्यानें धूम ठोकली.

आपला वेग तिळमात्रही कमी न करतां किंवा वाटेंत जरा श्वास घ्यायलाही न थांबतां, आडवळणांनीं अनेक गल्ल्या बोळांतून आपला रस्ता काढीत मुळींच मागें न पाहतां तो आपला रस्ता काढीत होता. शेवटीं एका जुन्या वाड्याच्या अंगणापाशीं येतांच त्यानें आपला वेग कमी केला आणि चौकाच्या आंतील एका खिडकींतील दिव्याच्या दिशेनें तो आंत शिरला आणि त्यानें धाडकन दार उघडलें.

'अगबाई, केवढ्यानें दचकलें मी! कोण तें? किशा, तूं का?' त्याची आई ओरडली. 'धापा किती टाकतो आहेस. बस तरी जरा खालीं.'

'अग हो! मीच तो आई, धनीसाहेब आज नाहीं गेले बाहेर. आणि नली पण दिसली नाहीं खिडकीशीं कुठें. कित्तीवेळ तरी मी बसलों होतों,'

खालीं बसत किशा म्हणाला. खिन्नपणें त्यानें आपले कपडे काढले व तो मोरीवर हातपाय धुण्यास गेला.

रात्र बरीच झाली होती. तरी जनाबाईचें दळण अद्याप चालूच होतें. सर्व दिवसभर बाहेर दळणकांडण करून रात्रीं स्वयंपाकपाणी उरकल्यानंतर वाड्यांतील दळण ती रात्रीं करी. आजही तिचें तें काम चालू होतें. धाकटें मूल जवळच एका फाटक्या गोधडीवर झोंपलें होतें. चारपांच वर्षांचा दुसरा चांगला गुबगुबीत छोकरा आपली फाटकी कानटोपी डोक्याला घट्ट बसवून आणि आंगाभोंवती लुगड्याची चौघडी घेऊन टक्क डोळे करून आईकडे पहात होता. आईच्या अगोदर न झोंपण्याचाच निश्चय केला होता जणुं त्यानें. एवढेंच छोटें कुटुंब होतें तें. गरीब पण समाधानी नी नेहमीं हंसतमुख असायचीं तीं. आणि आंगापिंडानेंही मजबूत.

‘ वा वा ! काय सुंदर झुणका बनला आहे आज, ’ झुणका भाकरीचा भलामोठा बोकांदा तोंडात कोंबीत किशा उद्गारला. पाय धुतल्यावर चुली-पुढील केव्हांचीच करून ठेवलेली झुणका भाकर पुढें घेऊन त्यानें खाण्यास सुरवात केली होती. ‘ काय गोडी आहे आई तुझ्या हातांत. आणि पोरांची माया तरी काय तुला ! मी नाहीं बा अशी आई पाहिली कुठें. ’

‘ तुझं आपलं कांहींतरीच किशा, ’ हळु हंसून जानकीबाई म्हणाली. ‘सगळ्याच असतात हो आया अशा. पुराणीक बोवा नाहींका सांगतात ते कीं, आईची माया कांहीं कुणाला यायची नाहीं म्हणून.’

‘ ऊंः ! त्यांना काय नुसतं बोलायला होतं. तुझ्यासारखं कांहीं दिवस काम करून पहा म्हणावं मरमर. आणि मग सांगा. आदळआपट करून वस् करून आंगावर नाहीं आल्या तर मला सांगा. ’

‘ पण धनी आज बाहेर नाहीं गेले म्हणून म्हणालास नाहीं कां तूं ? ’ जनाबाईनें विचारलें.

‘ होय ग. फुकट गेला माझा पहारा सगळा.’

‘ अरे फुकट कसा वेड्या. चांगलंच नाहींका झालं तें ? नलूताईना झोंप तरी सुखाची मिळेल.’ पण म्हाताऱ्याला जाववतं तरी कसं बाहेर मी म्हणत्यें, एकटीलाच टाकून तिला.

‘ अग वा ग आई ! ’ किशा म्हणाला. ‘ त्यांना कांहीं वाटत का नसेल.

कित्ती माया आहे त्यांची नलूताईवर. प्राण सुद्धां काढून देतील ते आपला त्यांच्यासाठीं. मला माहीत आहे चांगलं.'

'मग कशाला रे जातात ते बाहेर असे. तुला पण नाहीं कांहीं दाद लागूं देत.' जनाबाई म्हणाली.

'कोण जाणे बा. पण थांब आई! आवाज कसला झाला तो?' आईचा हात धरून किशा म्हणाला.

'अरे वाड्यांतलं असेल कोणी तरी.'

'अंहं! इकडेच येताहेत झपाट्यानें कुणी तरी.' उभा राहात व बाहेर कान देत किशा म्हणाला. 'मी आल्यावर तर नाहीं बाहेर गेले ते; आणि कांहीं कमजास्ती झालं का काय!'

बाहेरील पावलें अधीक जवळ आलीं. दार एकदम ढकललें गेलें आणि केंस विसकटलेले, पांढरी फिकट पडलेली अशी धांपा टाकीतच नली आंत आली. 'कोण, नलूताई!' तीं मायलेंकरें आश्चर्यानें एकदमच ओरडलीं.

'थांबायला वेळ नाहीं मला. पण आजोबा एकदम फिट येऊन खालीं पडले आहेत...'

'निघालोंच हा डॉक्टरकडे,' घाइघाईनें आपली फाटकी टोपी घेत किशा म्हणाला. 'आत्तां आलों पहा पांच मिनिटांत.'

'नको, नको. डॉक्टर आले आहेत तिथें. पण...तूं नको येऊं आमच्या-कडे परत.'

'काय?' किशा ओरडला.

'मला नको विचारूं. पण आमच्याकडे आतां नको येऊं कधीं.' आश्चर्यानें आ करून तिच्याकडे पहात आणि बोलण्याचा निष्फळ प्रयत्न करीत अस-लेल्या किशाकडे पहात नली म्हणाली. 'तुला शिव्या देताहेत ते सारखे. काय झालं आहे कोण जाणें.'

'काय केलं मी असं!' किशा गुदमरल्या स्वरांत ओरडला.

'तूं सत्यानाश केलास त्यांचा, असं म्हणताहेत ते.' भरल्या डोळ्यांनीं त्याच्याकडे पहात नली म्हणाली. 'शिव्या देत तुझ्या नांवानें ओरडताहेत ते. डॉक्टर म्हणतात तूं त्यांच्या नजरेस पडलास तर संतापानें त्यांचा प्राणच जाईल. म्हणून आलें धावत तुला सांगायला. त्यांच्या दृष्टीस सुद्धां नको पडूं

तूं. किशा ! किशा ! कायरे केलंस तूं हें. कित्ती कित्ती विश्वास होता माझा तुझ्यावर. माझा दोस्तसुद्धां नाहीं रे दुसरा कुणी !'

दुर्दैवी किशा, आपल्या छोट्या धनिणीकडे डोळे विस्फारून पहात होता. डोळे अधीकच मोठे करीत डोकें अगदीं सुंद झाल्याप्रमाणें एखाद्या दगडी पुतळ्यासारखा स्तब्ध उभा होता तो.

'त्याचा पगार आणला आहे मी आजपर्यंतचा; आणि ही थोडीशी बक्षिसी. फारच चांगला आहे जनाबाई तो! जातें हं.' आणि बरोबर आणलेले पैसे खालीं ठेऊन इकडे तिकडे न पाहतां आपला हुंदका जणुं आवरीतच बाहेरील काळोखांत ती दिसेनाशी झाली.

वरील प्रसंगाला आठदहा दिवस लोटल्यानंतर नलीच्या आजोबांना चांगला उतार पडला. अंगांतील ताकद वाढायला लागल्यानंतर मेंदूचा भ्रमिष्टपणाही कमी होऊं लागून मनाचे व्यवहार आस्ते आस्ते सुरू होऊं लागले. दिवसभर बहुतेक स्वस्थ पडूनच रहात ते. उदासपणाची लाटही मधून मधून येई. पण तिचें स्वरूप आतां तीव्र राहिलें नव्हतें. एकाद्या लहान मुलासारखेच जरा वागत ते. खोलींतील भिंतीवर पडलेला एकादा रुपेरी कवडसा सुद्धां त्यांच्या मनाला खुलवायला पुरेसा होई. 'किती कंटाळवाणा दिवस आहे ग नली ' अशी तक्रारही त्यांची आतां ऐकूं येत नाहींशी झाली. जणूं काय काळ वेळ, सुख दुःख, थकवा या सर्वांच्या पलीकडेच जाऊन पोंचले होते ते. असहाय्य झाली होती अगदीं त्यांची स्थिती.

असेच बसले होते ते एक दिवस आपल्या खाटेवर. नली जवळच त्यांना ओठंगून बसली होती. इतक्यांत बाहेरील दार वाजून कोणी 'मी येऊं का ' म्हणून विचारलें. 'या कीं, ' तो भैरवनाथच असेल असें समजून–आणि त्याला कोण आपण मजाव करणार असेंच जणूं दाखवीत, म्हाताऱ्यानें रुक्ष स्वरांत म्हटलें.

'फार आनंद वाटला हं मला, तुमची तब्बेत सुधारलेली पाहून. ठीक आहे ना आतां ? ' समोरील खुर्चीवर बसत भैरवनाथ म्हणाला.

'ठीक आहे कीं, ' म्हाताऱ्यानें क्षीण स्वरांत म्हटलें.

'मला कांहीं तशी घाई नाहीं. पण पुढचा व्यवहार एकदां पाहिला म्हणजे बरा, मला वाटतं. नाहीं का ? ' भैरवनाथानें विचारलें.

' अलबत. सोडूं लौकरच जागा आम्ही. '

' हो, म्हणजे बरं. या सगळ्याची विक्री केली आहे मी. कांहीं फार नाहीं किंमत आली. पण बरी आहे झालं. अं—आज मंगळवार नाहींका. मग कधीं हलवूं सामान ? म्हणजे तशी कांहीं घाई नाहीं—संध्याकाळीं हलवूं या का ? ' भैरवनाथानें विचारलें.

' शुक्रवार सकाळ जरा सोईचा होईल. ' म्हाताऱ्यानें उत्तर केलें.

' चालेल, चालेल. तसंच मग. शुक्रवारीं सकाळीं. पण शुक्रवार म्हणजे शुक्रवार हं. त्यांत लटपट नाहीं. '

' बरं आहे. तयारी आहे आमची. ' म्हातारा म्हणाला.

त्याच्या आवाजांतील तो रुक्षपणा व निरुत्साह पाहून भैरवनाथ जरा बुचकळयांत पडला. पण म्हाताऱ्यानें परत एकदां ' नाहीं विसरणार मी शुक्रवार ' असें म्हटल्यानंतर त्याला तेथें थांबण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें. म्हणून म्हाताऱ्याला जयजय करून व प्रकृतीला नीट जपा हं म्हणून सांगत तो बाहेर पडला.

गुरुवार उजाडला पण म्हाताऱ्यांत कांहींच फरक दिसत नव्हता. संध्याकाळच्या सुमारास मात्र नली आणि तो शांतपणें बसलीं असतां त्यांच्यांत जरा अस्वस्थपणा दिसूं लागला. त्यांच्या अंतरंगांत अतिशय खळबळ उडाली होती, आणि डोळयांत गर्दी करणाऱ्या अश्रूंना ते मोठ्या शिकस्तीनें आवरून धरीत होते, असें नलीला अनेकवेळां वाटलें. पण शेवटीं मनाचा आवेग अनावर होऊन त्यांच्या डोळ्यांतून घळघळ पाणी वाहूं लागलें. ' माफ कर हं मला नली. ' ते एकदम तिच्याकडे पाहून म्हणाले.

' कसली माफी ? ' तिनें चमकून विचारलें. ' कसली करायची माफी आजोबा, तुम्हांला ? '

' सगळ्या कांहीं झाल्या गेल्याबद्दल. भ्रमिष्टासारख्या केलेल्या या सगळ्या खेळखंडोबाबद्दल नली, ' ते म्हणाले.

' असं नका बोलूं आजोबा कांहीं, ' नली म्हणाली. ' माझी शप्पथ आहे तुम्हांला अगदीं. दुसरं काहीं तरी बोलूंया ना आपण. '

' बरं, बरं ! तुला आठवतं आहे काग, मागें एकदां आपण काय

बोलत होतों तें ? खूप खूप दिवस झाले मला वाटतं. कां महिने झाले ग ? ' ते परत म्हणाले.

' मला नाहीं समजलं, तुम्हीं काय म्हणतां आजोबा तें. ' नली गोंधळून बोलली.

' हं आत्तां आठवलं, हा इथें असा बसल्यावर आठवलं मला नली; आणि धीरही आला आहे मला आतां. ' ते म्हणाले.

' कसला आजोबा ? कसला धीर नी काय आठवलं तुम्हांला ? '

' अग, तें नाहीं का आपण भिकारी झालों असं मी बोललों त्या दिवशीं ? हं ! हं ! हळू. अगदीं हळू ! थांबायचं नाहीं इथें आपल्याला आतां एक दिवस सुद्धा. अगदीं दूर जाऊं या इथून. '

एक क्षण दोन क्षणच गोंधळली नली जरा. पण लगेच स्वतःला सांवरून ' हो हो आजोबा चला, ' असें ती मोठ्या उत्साहानें म्हणाली. ' चला इथून आणि पुन्हां कध्धीं यायचं नाहीं इथें. विसरून जायचं पार सगळं मागलं. '

' खरंच पोरी, जाऊं या हिंडत हिंडत. रानावनांतून, हिरव्यागार कुरणांतून, नदी ओढ्यांच्या काठा काठानें रमत गमत, देवावर सगळा भार टाकून खुशाल जाऊं या आपण. आपलं नाहीं कमी पडूं देणार कांहीं तो दीन दयाळ; तूं आणि मी अगदीं दोघंच. मागचं सगळं हें विसरून जाऊं या आपण. अजूनही दिसतील बरे दिवस कदाचित्. ' ते परत म्हणाले.

' अगदीं नक्कीच आजोबा, ' ती उल्हासानें म्हणाली. ' इथें नाहीं आतां सुख लागायचं आपल्याला. '

' बरोबर बोललीस पोरी. नाहीं सुख लागायचं इथें ! ' तिच्या उत्साहानें म्हाताराही उत्तेजित होऊन म्हणाला. ' उद्यां सकाळीं, अगदीं पहांटे कुणालाही न सांगतां जाऊं या आपण. एवढा सुद्धां पत्ता नाहीं लागतां कामा कोणाला. '

भविष्य काळच्या सुखद विचारानें नलीचें अंतःकरण जोरानें उडूं लागलें. तहान भुकेची किंवा संकटाची पुसट छाया सुद्धां दिसेना तिला कुठें. जिकडे पहावें तिकडे निळें भोर आकाश, हिरवीगार कुरणें, झुळझुळणारे वन झरे, रंगीबेरंगी फुलांचे ताटवे आणि या सर्वांवर पसरलेला रसरशीत सूर्यप्रकाश, ' असं एकच–जगाचं विशाल, रम्य, चित्र ' तिच्या डोळ्यांसमोर नाचत होतं.

## छोटी नली

…… म्हाताऱ्याला कांहीं वेळ शांत झोंप लागली होती. पण नलीची मात्र तयारी करण्यांत धांवपळ उडाली होती. आपले आणि आपल्या आजोबांचे कपडे काढून तिनें त्यांचीं नीट गांठोडीं बांधलीं. त्यांची हातांत धरायची भक्कम काठी बाहेर काढली. पण या सर्व परिचित वस्तू परत आपल्याला दिसणार नाहींत म्हणूनच जणूं काय ती या खोलींतून त्या खोलींत अशी किती वेळा तरी त्यांच्याकडे आतुरतेनें पहात त्यांचा जड अंतःकरणानें शेवटचा निरोप घेत होती.

थोडयाच वेळांत पूर्वेकडे तांबडें फुटून हळुहळू दिशा उजळूं लागल्या. आकाशांतील तारका आतां मंद दिसूं लागल्या होत्या. तिकडे दृष्टी जातांच तिनें आपलें मन आवरलें. म्हातारा अगदीं शांत झोंपला होता. त्याची झोंप मोडण्याचें तिच्याही जिवावर आलें. पण आतां चांगलें दिसण्याच्या बेतांत आलें आणि पक्षांचा किलबिलाट जोरांत सुरू झाला. जरा वेळानें रस्त्यावरील सकाळची रहदारी सुरू होईल या जाणीवेनें तिनें शेवटीं त्यांना उठवलें. आणि म्हाताराही बाहेरील उजेडाकडे दृष्टी जातांच झटकन तयार झाला.

त्यानीं आपली काठी हातांत घेऊन देवाचें स्मरण करीत घरांतील सर्व चिरपरिचित वस्तुजातावरून आपली भारावलेली, अश्रुक्लिन्न दृष्टी फिरवून वास्तुदेवतेचा जड अंतःकरणानें निरोप घेतांच, नलीनें त्यांचा हात धरून सावधगिरीनें जिना उतरण्यास सुरवात केली. पायांचा तिळमात्रहि आवाज होत नव्हता. मध्येंच एकादी पायरी जरा करकरतांच ती दचकून थांबून ऐकूं लागे. म्हातारा मधेंच कांहीं विसरलेला जिन्नस आणायला मागें जातांच गेलेला एकदोन मिनिटांचाच वेळ, तिला कितीतरी लांबलचक वाटला.

शेवटीं एकदां बाहेरील दाराजवळ येऊन पोंचली तीं. तिथेंच झोंपलेल्या भैरवनाथाचें मोठमोठ्यानें चाललेलें घोरणें त्यांना तोफेच्या गडगडाटासारखेंच वाटलें. मुळींच आवाज न करतां, जीव अगदीं मुठींत धरून तीं दोघेंही दार उघडून एकदांची बाहेर पडलीं, आणि रस्त्यावर जरा स्तब्ध उभें राहून त्यांनीं नीट कानोसा घेतला.

‘ कुठें जायचं आजोबा. कुठल्या रस्त्यानें ? ’ नलीनें दबलेल्या आवाजांत विचारलें.

म्हाताऱ्यानें एकदां तिच्याकडे, एकदां रस्त्याकडे, परत तिच्याकडे असें

असहायपणें पहात आपली मान हलविली. नलीला आतां स्पष्टपणें कळलं कीं तिलाच वाट दाखवायची आणि पुढें होण्याची कामगिरी आतां करायची होती. क्षणमात्रच तिच्या मनाचा गोंधळ उडाला. पण लगेच अंगांत जणुं काय संचार झाल्याप्रमाणें, तिनें आजोबांचा हात धरला आणि हळुहळू पण आत्मविश्वासानें वाट चालण्यास सुरवात केली.

सगळं शहर सकाळच्या साखर झोंपेंत निमग्न असतां हे दोन दुबळे जीव, तिकडे पाठ करून कोण जाणे कोठें, जगाच्या पाठीवर फिरायला बाहेर पडले होते !

---



*

# ६

भैरवनाथाचा आपल्या डोळयावर विश्वासच बसेना. कुठेंच चाहूल लागेना त्याला नलीची व त्या म्हाताऱ्याची. आपल्या हातावर खरंच तुरी दिली कीं काय त्या दोघांनीं. त्या विचारानें त्याला आश्चर्य तर खरंच पण अस्वस्थही वाटलें. कांहीं महत्त्वाच्या वस्तूही नाहींशा झाल्याचें त्याच्या तीव्र दृष्टींतून सुटलें नव्हतें. पण त्या भ्रमिष्ट म्हाताऱ्यानें नलीचें मन वळवून आपला बेत कसा पार पाडला असेल, याचेंच त्याला राहूंन राहून आश्चर्य वाटत होतें. म्हाताऱ्याची एकादी गुप्त गंगाजळी तर नव्हती? निसटली आपल्या तडाक्यांतून ती. या शेवटच्या कल्पनेनें त्याला स्वतःचा अतिशय रागही आला.

त्याचा हा आत्मनिंदेचा कार्यक्रम लांबलाही असता कदाचित्. पण सामान नेण्यासाठीं त्यानें बोलावलेल्या गाड्या बाहेर येऊन पोंचल्या आणि सामान उचलून तें गाड्यांत भरण्याची गड्यांची धांवपळ सुरूही झाली. कोणत्याही गलक्यांत मागें न राहण्याच्या स्वभावानें तोही आपल्या जागेवरून उठला आणि अंगांत आल्याप्रमाणें गड्यांवर व हमालांवर घसरा घालूं लागला. थोड्याच वेळांत घर व दुकान पार साफ झालें आणि फाटक्या तुटक्या आंथऱ्या व भांडींच फक्त एकमेकांकडे भकास मुद्रेनें पहात तेथें शिल्लक राहिलीं.

फाटक्या तुटक्या भांड्या चिंध्यांच्या त्या प्रभावळींत दुकानांतून आलेल्या चहापानाचा समाचार घेत भैरवनाथाची स्वारी एकाद्या वडाऱ्यांच्या नायका-प्रमाणें शोभत होती. चहा संपवून खिशांतील फर्मास विडीचा झुरका घेण्यांत गर्क असतांच कोणीतरी आंत डोकावल्याचें त्याला वाटलें. नाकाचा शेंडाच दिसला फक्त त्याला. त्यावरून ती व्यक्ती ओळखून 'किशा' म्हणून त्यानें हांक मारली.

' या इकडे या असे किशाजी, तुमची मालक मालकीण झाली पसार अं एकूण ? ' किशा आंत येतांच त्याला भैरवनाथ म्हणाला.

' कुठें ? ' इकडे तिकडे पहात किशानें विचारलें.

' म्हणजे तुला माहीत नाहीं वाटतं ? ' भैरवनाथ तीव्रपणें म्हणाला. ' कुठें काय ! बराच आव आणला आहेस कीं. '

' खरंच माहित नाहीं मला.' किशा उद्गारला.

' बस्स. पुरे कर हीं सोंगं ! दिवस उजाडण्यापूर्वी तो म्हातारडा पसार झाला तें तुला माहित नाहीं काय ? कोण ठेवील विश्वास यावर ? तूं काय समजतोस मला कांहीं माहीत नाहीं काय ? चोरासारखा काल रात्रीं या घरावर पहारा करीत होतास तो काय मी तुला पाहिला नाहीं ? माहित असलंच पाहिजे तुला तें.' भैरवनाथ कडाडला.

त्याला अगदीं झोंबेल असं उत्तर किशा देणार तोंच भैरवनाथचा पोऱ्या, खंडू ' हें एक पाखरूं आहे इथें शेट. काय करूं त्याचं, ' असें ओरडला. इतका वेळ कांहीं चुकूनमुकून राहिलं आहे कीं काय तें पहात एकाद्या गिधाडा सारखा हिंडत होता तो.

' टाक मान मुरगळून, विचारतोस काय गधड्या.'

' नको, नको शेट, मला द्या तें. ' किशा घाईघाईनें पुढें येऊन म्हणाला.

' तर तर ! हात तर लाव त्या पिंजऱ्याला. अस्तन्या सारीत खंडू गरजला.

' वा जी वा ! चालूं दे तुमची लठ्ठालठ्ठी ! भैरवनाथ म्हणाला. ' चला आटपा जो मारील त्याला मिळेल पिंजरा. '

पूर्वीच्या झोंबीची आठवण होतीच दोघांना. आणि एकमेकांचा घुस्साही होता एकमेकांवर. त्यामुळें कांहीं मागें पुढें न पाहतां ते दोघेही दात ओठ खातच एकमेकांवर तुटून पडले. दोघेही सारखेच होते. शिवाय भैरवनाथही त्यांना ' भले भले ' म्हणून खुलवीत होता. त्यामुळें बराच वेळ रंगली ती लढत. अखेरीस किशानें मोठा जोर करून खंडूच्या नाकाडावर एक चांगला ठोसा लगावला आणि त्याला खालीं निजवला. आणि मग झटकन वर उठून व भैरवनाथाच्या हातांतून पिंजरा हिसकून त्यानें धूम ठोकली.

वाड्याच्या चौकांत जाऊन पोंचेपर्यंत त्यानें आपला वेग म्हणून थांबवला नाहीं आणि दाराजवळ येतांच धाडकन दार ढकलून तो आंत

शिरला. त्याचा त्या वेळचा अवतार पाहून खेळत असलेला त्याचा भाऊ तर किंचाळलाच नी भांडी घाशीत असलेल्या जनाबाईनेंही एकदम दचकून वर पाहिलें, आणि ' अगबाई किशा कायरे हें ? हें रक्तरे कसलं आलं आहे तुझ्या, आणि कानही हिरवा निळा झालेला दिसतोय,' असें भेदरलेल्या आवाजांत विचारलें.

' कांहीं नाहीं ग आई, ' दारावरील फडक्यानें तोंड पुशीत किशा म्हणाला, ' एवढं घाबरायला नको कांहीं. अग त्या खंड्याला चांगला लांब केला आणि हा पिंजरा आणला बघ मिळवून. गप्प बस रे जग्या. तुला काय झालं उगाच केंकटायला ! '

' अरे हा खंड्या कोण, आणि पिंजरा कोणाचा ? ' जनाबाईनें गोंधळून विचारलें.

' अग, आपल्या नलूताईचा हा पोपट नव्हे का ! तो बंदरावरचा शेट त्याला मारून टाकायला सांगत होता. ' किशानें उत्तर केलें, आणि पिंजरा टांगण्यासाठीं तो चांगलीशी जागा शोधूं लागला. ' या खिडकींत लावूं या नाहीं आई ! म्हणजे त्याला बाहेरची गंमतही दिसेल आणि नाचायला लागेल तो ! आई शीळ काय झकास घालतो तो अगदीं आणि बोलतोही कसा, " नलुताई, नलुताई ! " मान वांकडी करून पोपटाची नक्कल करीत खिडकींत पिंजरा टांगीत असतां तो म्हणाला. पोपटानेंही मोठ्या आनंदानें वर पहात पहात, डोळे किलकिले करीत आणि लाडिक आवाजांत बोलायला सुरवात केली. पोपटाची ती गंमत पाहून त्या धाकट्या पोरानींही टाळ्या पिटून त्याची साथ केली.

' बरं तर आई, जरा हेलबील मिळाली तर पाहतों हं. आणि येतांना तुम्हांला लिमजी बिस्कीट पण आणतों. ' असें म्हणून आणि आईच्या फुटक्या आरशांत पाहून आपली ठाकठिकी करून तो बाहेर पडला.

येणारा जाणारांच्या गर्दीकडे मोठ्या आशेनें पहात बाजारपेठेंत तो पुष्कळ वेळ भटकत होता. पण त्याला हेल मिळण्याचें कांहींच चिन्ह दिसेना. मोफतच्या या भ्रमंतीनें त्याचे पायही दुखूं लागले व सपाट्यानें वर येत असलेल्या उन्हाचेही चटके बसूं लागले. अखेर कंटाळून घराच्या एका पायरीवर त्यानें जरा आसन ठोकलें. थोडावेळ तो असा बसला असेल तों एक घोड्याचा

एक्का खुट्रूरुट्रू करीत त्याच्या अगदीं जवळून गेला. घोड्याच्या चालण्याच्या त्या हरदासी पद्धतीकडे तो जरा पहातच राहिला. तऱ्हेवाइकच दिसत होतं घोडं तें. रस्त्याच्या एकाच बाजूनें चालणें त्याला आवडत नव्हतेंसें दिसलें• कारण क्षणांत उजवीकडे तर क्षणांत डावीकडे असें खेकड्यासारखें तें तिरपागडें चाललें होतें. जणुं काय कडेच्या गटारांची साफसफाईच पहात होतं तें. इतक्यांत त्याच्या काय मनांत आलें कोणास ठाऊक. रस्त्यावरील दिव्याच्या एका खांबाजवळच त्यानें ठाण मांडलें व धन्यानें लगावलेल्या चाबकास न जुमानतां रस्त्यावरील रहदारीचें निरीक्षण करीत तें एखाद्या स्थितप्रज्ञासारखें स्वस्थ उभें राहिलें. आंतील म्हाताऱ्यानें त्याच्या लगामाला हिसके देत ' चक् चक् ' करून त्याला फटकारलें आणि अखेर चिडून एक शिवीही हांसडली. पण कसलाहि परिणाम त्याच्यावर झालेला दिसला नाहीं. फक्त मालकानें दिलेल्या गलिच्छ शिवीचा, मान हालवीत फुर्र करून त्यानें निषेध मात्र केला !

ही सर्व गंमत पहात किशा कांहीं वेळ बसला होता. पण अखेरीस आपल्या जागेवरून तो त्या घोड्याजवळ गेला. आणि त्यानें त्याच्या मानेजवळ जरा खाजवीत त्याला चुचकारून त्याचा लगाम धरून पुढें ओढण्यास सुरवात केली. या खुशामतीनेंच जणूं काय खूष होऊन त्या घोड्यानेंही कांहीं आढेवेढे न घेतां पुढें पाऊल टाकलें; आणि मग कोठेंही न थांबतां एका प्रशस्त घराच्या देवडीजवळ येऊन तो उभा राहिला. देवडीच्या खांबावर ' वागळे वकील ' अशी पाटी दिसत होती.

गाडी थांबतांच आंतून एक उतारवयाचे गृहस्थ व त्याच वयाच्या एक बाई खालीं उतरल्या. खालीं उतरतांच आपल्या अंगावरील शाल त्यानीं नीट केली आणि बरोबर आणलेले मोगरीच्या कळ्यांचे दोन तीन सुंदर गजरे हातांत घेऊन त्या वर चढल्या. त्यांच्या यजमानानींही मागून येत असलेल्या किशाला खूण करून जवळ बोलाविलें आणि त्याला जरा गाडीजवळ उभें राहण्यास सांगून तेही पत्नीच्या मागोमाग आंत गेले.

देवडीला लागूनच वागळे वकीलांची बसण्याची जागा असल्यानें आंतील सर्व हालचाल बाहेर स्पष्टपणें ऐकूं येत होती. ' यावं यावं, बागवान साहेब, ' असे वकील साहेबांचे उद्गार आणि नमस्कार चमत्कारांची देवघेव ऐकूं आली.

'सुंदर ! सुंदर !! फारच सुंदर वास दरवळला आहे बुवा !' वागळे उद्गारले. 'आणि गजरेही मोठे ऐटबाज आहेत हं. तुमचं सगळंच करणं मोठं और असतं बुवा.'

'अंहं तुम्हांला नाहीं कांहीं. आमच्या वकीलीणबाईंना आणले आहेत ते.' गजऱ्यांना हाताळीत त्यांचा वास घेत असलेल्या वागळ्यांना पाहून बागवान-बाई म्हणाल्या.

'तरीही आम्हांला त्याचा फायदा मिळणारच कीं नाहीं.' आणि आपण काय मजेशीर बोललों असें वाटून ते 'खिः खिः' करून हंसू लागले. हंसण्याचा भर जरा ओसरल्यावर ते पुढें म्हणाले. 'अलभ्य लाभच आहे आज म्हणायचा. आपल्या चिरंजीवांमुळेंच आला आहे हा पर्वणीयोग! उगीच स्तुती नाहीं करीत मी बागवानसाहेब, मला मोठी चीड आहे त्याची—पण आपले चिरंजीवांवर मी तर निहायत खूष आहे बुवा. पुष्कळ उमेदवार पाहिले मी आजपर्यंत. पण हें काम कांहीं विलक्षणच. रावसाहेब मंडलीकां-वरही ताण करतील ते !'

'आपलीच मेहेरबानी आहे वकील साहेब. आम्हांला दोघांनाही मूठभर मांस चढेल आपल्या या बोलण्यानें.' श्रीयुत बागवान म्हणाले व अनुमती-साठीं त्यांनीं आपल्या अर्धांगाकडे पाहिलें.

'खरं आहे आपलं म्हणणं ! अतीशय आनंद झाला मला हें ऐकून. मोठी काळजी होती मला त्याची.'

'मला पूर्ण खात्री होती त्यांची. त्यांना पहिल्या दिवशीं पाहिल्याबरोबरच वाटलं मला. कारण मुलगा कोणाचा तो ! बरं पण चहा घेणारना ? अहो हरीपंत, आंतून थोडा चहा घेऊन या.'

'माझा नको हो हरीपंत. मी आंतच घेईन वकिलीण बाईबरोबर,' असें म्हणून बाईसाहेब पंतांबरोबर आंत जाऊं लागल्या. पण इतक्यांत वकीलीण-बाईच चहाचा ट्रे घेऊन तेथें आल्या आणि त्यांच्या मागोमाग श्रीयुत बागवानांचे चिरंजीवहि येऊन पोंचले.

अनंतराव पंचविशीच्या आसपास असावे पण दिसण्यांत मात्र जरा जास्तच दिसत. बापलेकांचा तोंडवळा, आंगकाठी बहुतेक सारखीच होती. फक्त वडिलांच्या चेहऱ्यावरील आनंद आणि मोकळेपणा यांचा चिरंजीवांत

अभावच दिसत होता. शिवाय एक प्रकारचा भित्रेपणाही दिसत असे त्यांच्यांत. त्यांची आई मात्र यालाच लाजाळूपणा म्हणत असे तें वेगळें.

' या, या, अनंतराव, आज लौकरच आलांत जरासे. ' वागळेसाहेब म्हणाले आणि त्यानीं त्यांच्याही पुढें चहाचा कप ठेवला.

चहापानानंतर नी ख्यालीखुशालीच्या गप्पांच्या कार्यक्रमानंतर आपल्या कोर्टांतील कामाबद्दल तब्बल एक तास चर्चा केल्यावर बागवान पतीपत्नी वकीलांचा आणि वकीलीणबाईंचा निरोप घेऊन बाहेर पडलीं. चिरंजीवही वडील मातोश्रींबरोबर दाराबाहेर आले आणि त्यानीं आपल्या आईला आंत चढण्यास मदत केली. आंगानें जरा त्या सुखवस्तु असल्यानें चढण्याउतरण्यास त्यांना थोडा त्रासच पडे.

किशानें घोड्याच्या मानेवर थाप मारून लगाम साहेबांच्या हातांत दिला आणि त्यांना राम राम केला. साहेबांनीं खिशांत हात घालून चांचपलें. पण एक पावलीशिवाय दुसरें कोणतेंच नाणें हाताला न लागल्यानें, त्यानीं पावलीच किशाच्या हातावर ठेवली; आणि थोडे हंसतच ते म्हणाले, ' हें बघ पुढल्याच सोमवारीं येणार आहे मी परत इथें, तेव्हां हजर रहा असाच घोडा धरायला. दोनही वेळचे म्हणून दिले आहेत हो तुला पैसे. '

' बरं आहे साहेब. त्याची नको तुम्हांला काळजी. अगदीं हजर आहे मी, ' किशानें उत्तर केलें. आणि साहेबांस लांबलचक राम राम ठोकून तो आपल्या घराकडे वळला.

---

# ७

सबंध शहर आतां सूर्य प्रकाशांत अगदीं न्हाऊन निघाल्यामुळें मोठें प्रसन्न दिसत होतें. रात्रीच्या काळोखांत भयाण दिसणारे सर्व प्रदेश आतां मधुर हास्यानें नटले होते. सूर्याचे कोंवळे किरण, घरांच्या दाराखिडक्यांतून हळूच आंत शिरून सर्व वस्तूंना उजळा देत इकडे तिकडे नाचत बागडत होते; आणि अद्याप आंथरुणांत लोळणाऱ्या खुशालचेंडूंच्या व बालगोपालांच्या नेत्रांना हळूच स्पर्श करून त्यांच्या स्वप्नसृष्टीलाच जणुं उजळीत होते. रात्रीची काळी सांवली सुद्धां आतां कोठें दिसत नव्हती.

याच वेळीं आमचे ते दोन प्रवासी एकमेकांचा हात धरून, मधून मधून एकमेकांकडे हास्यमुद्रेनें पहात एक अवाक्षरही न बोलतां शांतपणें चालले होते. सभोंवतालचं सर्व वातावरण जरी प्रसन्न आणि रम्य होतं, तरी गांवाबाहेरील ते रहदारीनें फुललेले पण आतां अगदीं निर्जन असलेले रस्ते, अचेतन शरीरा-प्रमाणें शून्य व कांहींसे उदास दिसत होते. सर्व सारखेच. एकाच सांच्यांत ओतले होते जणूं कांहीं ! आणि अगदींच निर्जन होत गेले. मग पुढें पुढें ते आतांपर्यंत रस्त्याचे बाजूला असणारीं छोटीं छोटीं घरें, आतां अगदीं विरळ होऊं लागून त्यांचे जागीं लहान लहान शेतांचे तुकडे किंवा भाजीपाल्याचा एकादा मळा मात्र मधून मधून दिसूं लागला. आणखी कांहीं अंतरावर परत विरळ विरळ टुमदार घरें, सभोंवतालच्या चिमुकल्याच फुलबागेनें मोठी मोहक दिसणारीं, प्रवाशांच्या डोळ्यांना आनंद देत होतीं. त्याच्यापुढेंच टोल-नाक्याची झोंपडी आणि परत पलीकडे शेतजमिनी आणि गवताच्या गंजी झाडांच्या सांवलींत पसरल्या होत्या. रस्ता त्याच्यापुढें एका टेकडीवर चढला असल्यानें एक क्षणभर थांबून मागें दृष्टी टाकल्यास, गौतमेश्वराच्या उत्तुंग शिखरावरील सुवर्णकळस सूर्यकिरणांत तळपत असलेला दिसत असे. आणि शहर सोडून आपण बरेच दूर आलों असें प्रवाशाला समजे.

## छोटी नली

टेकडीच्या उतारावरील एका सुंदरशा हिरवळीवर नली आणि तिचे आजोबा विश्रांतीसाठीं जरा टेकले. घरांतून निघतांना थोडी शिदोरी बरोबर घेण्यास तिच्या उपजत स्त्रीगुणांमुळें तिला शिकविलें होतें. थोडा फराळ करून नलीनें विचारलें, 'थकलांत तुम्ही आजोबा ? गळल्यासारखं नाहींना वाटत तुम्हांला ?'

'आतां आपण घर सोडलं आहे ना, आतां नाहीं थकवा बिकवा वाटणार मला.' म्हाताऱ्यानें उत्तर केलें. 'चला, उठूंया आतां. लांब, लांब, शक्य तितके लांब जाऊं या आधीं. आणि मग विश्रांती; चल नली !'

दुतर्फा पसरलेल्या हिरव्यागार कुरणांतून व शेतांतून आतां वाट जात असल्यानें मोठी मजा दिसत होती. स्वच्छ निळ्या आकाशाखालीं जोंधळ्याचीं ताटें मोठ्या डौलानें डोलत होतीं. इकडून तिकडे भराऱ्या मारणाऱ्या पांखरांचा किलबिलाटही कानाला गोड लागत होता. शेतावरून वाहणारा व गवत मातीच्या वासानें धुंदकारलेला वारा, प्रवाशांच्या अंगचा भागोटा पार उडवून लावीत होता.

सबंध दिवसभर चालत होतीं तीं दोघं. रात्रीं रस्त्या जवळच असलेल्या एका लहान झोंपडींत त्यांनीं विश्रांती घेतली. सकाळीं उजाडल्याबरोबर त्यांनीं परत चालायला सुरवात केली. आदल्या दिवसाच्या श्रमामुळें आरंभीं त्यांचें पाऊल जरा रेंगाळतच पडत होतें. पण लौकरच त्यांना हुशारी वाटूं लागून त्यांनीं जलद पाऊल उचललें.

मधून मधून तीं विसाव्या करतां थांबत. पण लौकरच परत चालण्यास आरंभ करीत. तिसरा प्रहर टळून गेला. सकाळ पासून पोटांत फारसें गेलें नसल्यानें त्यांना थकवा जास्त वाटूं लागला. म्हणून जवळच असलेल्या एका खेड्याकडे त्यांनीं आपला मोर्चा वळवला. गांवांत गेल्यानंतर आपल्या पोटापाण्याची आणि विश्रांतीची सोय कुठें करावी या विचारानें नली प्रत्येक घराकडे आशाळभूतपणें पाहूं लागली.

शेवटीं एका अंगणाशीं ती थांबली. आपल्या लहान नातवंडांच्या घोळक्यांत एक म्हातारेबाबा खाटेवर बसले होते. यांना आपल्या आजोबांची कींव येईल असें वाटून ती जरा थांबली. तिच्याकडे दृष्टी जातांच त्यानें 'काय पाहिजे तुला बाळ,' म्हणून विचारलें.

' कांहीं नाहीं दादा. थोडं दूध आणि जरा डोकं टेंकायला जागा दिलीत तर मोठे उपकार होतील,' नली काकुळतीनें म्हणाली.

' ये ये माझे बये. एवढी काय घाबरलीस. एवढ्याशा दुधाला पण महाग झालों काय आम्ही!' असें म्हणून त्या म्हाताऱ्यानें 'काशे, ए काशे इकडे ये. हे पाहुणे आलेत बघ आपलेकडे. पायबीय धुवायला त्यांना पाणी आण अगोदर,' असें घरांत पहात म्हटलें.

त्या आरोळीबरोबर तीस पस्तीशीच्या वयाची एक बाई आणि तिच्या मागोमाग म्हाताऱ्याचा मुलगा अशीं बाहेर आलीं. प्रवासानें अगदीं गळलेला एक म्हातारा व लहान पोरगी पाहून त्यांच्या पोटापाण्याची व्यवस्था करण्यास काशी आंत गेली. आणि म्हाताऱ्याचा मुलगा अंगणांत आला. काशीनेंही मोठ्या चपळाईनें थोडी भाकर व दूध बाहेर आणून ठेवलें.

' काय पाव्हण, फार लांबून आलेले दिसतां. दूरच्या प्रवासाला निघालांत काय ? ' म्हाताऱ्यानें विचारलें.

' होय दादा, लांब निघालोंत जरा, ' आजोबानीं नुसतें तिच्याकडे पाहिल्यामुळें, नलीनें उत्तर दिलें.

' कुठून विलासपुराहून आलां होय दादा ? ' म्हाताऱ्यानें विचारलें, नलीनें मान हलविली.

' पुष्कळ वेळां गेलों होतों मीं तिकडे. सामानाच्या गाड्या घेऊन जात असें मी. पण आतां दहा वीस वर्षें झालीं त्याला. फार बदललं आहे म्हणतात विलासपूर. खरंच आहे तें ! मी सुद्धां नाहीं का किती तरी पालटलों ? ' म्हातारा म्हणाला.

'किती लांब आहे पुढचं गांव इथून ?' खाणें आटोपल्यावर नलीनें विचारलें.

' पांच एक मैल असेल बाळ; ' त्यानें उत्तर केलें. ' पण आजची रात्र थांबणार ना तुम्हीं इथें ? '

' छे छे !' नलीचे आजोबा घाईघाईनें म्हणाले आणि त्यानीं तिला तशी खूण केली. ' पुढे, पुढे जायचं आपल्याला. मध्यरात्र झाली तरी हरकत नाहीं. '

' तुम्ही थकलेले दिसतां बाबा. ' तो झोंपडीवाला आजोबांकडे पहात म्हणाला. ' थांबा इथें आजची रात्र घाई नसली तर. '

' थोडी घाईच आहे हो, ' म्हाताऱ्यानें थोडया चिडखोरपणें म्हटलें. ' नली चल—पुढे चल इथून. '

' खरंच गेलं पाहिजे दादा आम्हांला, ' ती म्हणाली. ' नाइलाज आहे आमचा. गेलंच पाहिजे आम्हांला लौकर. फार मेहेरबानी झाली तुमची आमच्यावर. जातों, हं ! राग नका धरूं हं ! चला आजोबा ! '

गांवाबाहेर पडून पुढील रस्ता आक्रमण्यास त्यानीं सुरवात केली. पण आतांपर्यंतच्या प्रवासानें दोघेंही फार थकून गेल्यामुळें त्यांचीं पावलें फार कष्टानें आणि रेंगाळतच पडत होतीं. अशा रीतीनें एखादा मैल तीं आलीं असतील नसतील तोंच गाडीचा आवाज ऐकूं आल्यामुळें त्यानीं मागें वळून पाहिलें. एक रिकामी गाडी त्यांच्याच दिशेनें जलद येत होती. गाडी जवळ येतांच गाडी उभी करून नलीकडे बारकाईनें पहात गाडीवान म्हणाला, ' तुम्हींच थांबलां होतां नव्हे जानबाच्या त्या झोपडीशीं ? '

' होय दादा, ' नली म्हणाली.

' मला सांगितलं त्यानीं तुम्हांला पहायला. ' तो गाडीवान म्हणाला. ' तुमच्याच बाजूनें जातों आहे मी. दे हात दे, तुझा. चल मार उडी. या आजोबा, बसा असे फरागत आंत. '

किती देव माणसं हीं ! उपकारी माणसांच्या या अकारण प्रेमाविष्कारामुळें किती रम्य, सोज्वळ वाटली ती परमेश्वरी सृष्टी नलीला. असेंच असेल का तिचें स्वरूप सोज्वळ चोंहीकडे ? तिचें मन आज तरी आशावादानें हुंकारत होतें.

अतीशय थकल्यामुळें त्या गाडीचे बसणारे धक्के सुद्धां त्यांना फार बरे वाटले. स्वारीची गाडीच वाटली त्यांना ती. कारण पाऊल सुद्धां टाकण्याचें त्राण नव्हतें त्या दोघांना. आंत बसतांच खालील पेंढ्यावरच नलीनें आंग टाकलें, आणि दिवसभराच्या श्रमानें ती गाढ झोंपी गेली.

ती जागी झाली ती एका गल्लीच्या तोंडाशीं गाडी एकदम थांबली म्हणून. त्या दोघांना हात देऊन गाडीवाल्यानें खालीं उतरविलें आणि जवळच्याच एका पाऊलवाटेनें त्यांना देवळाच्या जवळच्या हॉटेलांत जाण्यास सांगून, बाजूच्या रस्त्याला आपली गाडी वळवली.

त्या मळलेल्या पाऊलवाटेनें तीं गाडीवानानें दाखविलेल्या देवळाच्या जवळ येऊन पोंचलीं. हॉटेल त्याच्या बरेंच पुढें होतें. पण देवळाजवळ

कोणाचा तरी आवाज कानावर पडल्यामुळें त्यांनीं आपलीं पावलें प्रथम तिकडेच वळवलीं.

अगदीं जवळ जाईपर्यंत देवळांत बसलेल्या त्या दोन माणसांना त्यांची चाहूल लागली नाहीं. इतके आपल्या कामांत गढले होते ते. ' यमपुरीचा ' खेळ करीत गांवोगांव हिंडणारे लोक होते ते. यमपुरीच्या खेळांतील लांकडी पात्रें कांहीं पेट्यांत व खालीं त्यांच्या आसपास पसरलीं होतीं. रात्रीच्या खेळाला सुरवात करण्यापूर्वी आवश्यक असलेल्या कांहीं किरकोळ दुरुस्त्या करीत बसले होते ते दोघे यमपुरीवाले. त्यांतला एक जरा बुटकेलासा, घारा आणि गुबगुबीत गालाचा आणि हंसतमुख दिसत होता. एकीकडे हातानें काम करीत आणि तोंडानें ' पिकला गहुं ग हरभरा, हरभरा ' असें गुणगुणत होता तो. त्याचा सोबती मात्र उंच, किडकिडीत, गंभीर चेहऱ्याचा असा आपल्याच कामांत गढलेला दिसला. आमच्या या बालवृद्ध प्रवाशांची ती दुक्कल त्यांच्याजवळ येतांच दोघांनींही वर त्यांच्याकडे पाहिलें.

' राम राम पाव्हण. कुठं, निघालां कुठं इतक्या पारीं ? ' त्या बुटक्यानें आपली लावणी थांबवून त्यांना विचारलें.

म्हाताऱ्याची नजर त्या खालीं पडलेल्या बाहुल्यांकडे लागली असल्यानें त्यानें त्या प्रश्नाला कांहींच उत्तर न देतां, खालीं बैठक मारून, ' कांहो दादा, इथेसे बसलां आहांत ही ठाकठिकी करीत ? ' असें विचारलें.

' काय करावं नाहींतर. त्या तिकडेच हॉटेलांत जर बसलों आम्हीं ह्या यम-दादाला आडवा घालून त्याच्या मिशा डकवीत तर त्याच्या डुरकावणीला कोण हो भिणार रात्रीं ? मग सगळी गंमत गेली कीं यांतली ! " वत्सा तुजप्रत कल्याण असो " असें म्हणत या गणपतिबुवांनीं जरी मग आपली सोंड हलवली, तरी कोणीच पहाणार नाहीं त्यांच्या त्या दोंदाकडे,' तो लावणीवाला उत्तरला.

' बरं ! पण आज रात्रींच व्हायचा आहे का खेळ तुमचा ? ' एकाद्या लहान मुलाच्या उत्सुकतेनें म्हाताऱ्यानें विचारलें.

' हां ! असातर विचार आहे साहेब. चलरे हात चालव जरा आतां. उशीर झाला.' अजून पर्यंत स्वस्थ असलेले कोकाटे म्हणाले, आणि त्यांनीं पेटींतून सरस्वतीची मूर्ती बाहेर काढली.

तिच्या पोशाखाकडे बारकाईनें जरा वेळ पाहून व तिच्या लुगडयाच्या चुण्या

नीट करीत ते म्हणाले, ‘ अरे सुई दोरा आहे कारे ? जरा टांका घालायला हवा आहे या इथें. नाहींतर खालीं सरेल हें सगळें. ’

त्याच्या सोबत्याला डोकें खाजवीत बसलेला पाहून नली म्हणाली, ‘माझ्या जवळ आहे कीं सुई, दादा. आणा इकडे मीच देतें टाका घालून. तुमच्याहून चांगला घालतां येईल मला.’

खालीं मान घालून कौशल्यानें चाललेल्या तिच्या कामाकडे, कौतुकानें तो हंसतमुख माणूस पहात होता. तिचें काम संपतांच ‘ शाबास ! ’ असें म्हणून ‘ कुठपर्यंत जायचं तुम्हांला ? ’ असें त्यानें विचारलें.

‘ आज नाहीं आतां कुठे, ’ आजोबांकडे पहात नलीनें उत्तर केलें.

‘ मग चला कीं आमच्याच बरोबर. त्या पलीकडच्या हॉटेलांत उतरलोंत आम्हीं. स्वस्त आहेत फार तिथले दर; ’ कोकाटे म्हणाले.

एक म्हातारें जोडपें चालवीत होतें ती खाणावळ. म्हातारा म्हातारी चांगलीं होतीं स्वभावाला मोठीं. त्यांनीं आनंदानें या दोन नवागतांचें स्वागत केलें. म्हातारी तर नलीला पाहून खूष होऊन गेली. दुसरे कोणींच नव्हते खाणावळींत त्या दिवशीं. त्यामुळें नलीला जरा बरेंच वाटलें.

कोकाटे कंपनीचा भोजनाचा कार्यक्रम आटोपला असल्यामुळें समोरील अंगणांतच त्यानीं यमपुरीच्या प्रयोगाला सुरवात केली. गांवच्या लोकांना ही एक मोठी पर्वणीच असल्यामुळें तें सर्व पटांगण सानथोर स्त्रीपुरुषांनीं मारे फुलून गेलें होतें. खाणावळीच्या पडवींतच टांगलेल्या दोन लोंबत्या दिव्यांच्या प्रकाशांत खेळाला सुरवात झाली.

आपलें जेवण आटोपून नलीचे आजोबा बाहेर आले आणि त्यांनीं एक सोइस्कर जागा पाहून तेथें त्यांनीं आसन ठोकलें नी थोड्याच वेळांत समोरील खेळांत पूर्णपणें समरस होऊन स्वतःची सगळी काळजीकथा ते पार विसरून गेले. नली मात्र थोडावेळ पडवींत बसून तो खेळ पहात होती. पण थोड्याच वेळांत झोपेनें तिच्यावर अंमल बसविण्यास प्रारंभ केला. तरी कांहीं वेळ ती तशीच बालसुलभ कौतुकानें टेक धरून बसली होती. पण सरतेशेवटीं निद्रादेवीच्या जोरदार हल्ल्यामुळें नामोहरम होऊन तिनें अंथरुणावर आंग टाकलें.

दुसरे दिवशीं सकाळीं सूर्याचे कोंवळे किरणानीं तिच्या खोलींत प्रवेश

केल्यानंतरच ती जागी झाली. पलीकडे झोंपलेल्या आजोबांचें घोरणें अजून चालूच असल्यानें हळूच पाय न वाजवतां ती बाहेर पडली. सकाळच्या त्या शांतवेळेला आसपासचा सर्व भूभाग अतीशय प्रसन्न दिसत होता. अंगणांतील फुलझाडांच्या ताटव्यांवर दंवबिंदूंची सुंदरशी मौक्तिकजाळी पसरली होती. उंच झाडांवरून कावळयांची आपल्या कर्कश आवाजांत चाललेली करकरही त्रासदायक वाटत नव्हती. मखमली गवतावर फुललेल्या इवलाल्या रानफुलांकडे आणि झाडांवरील कावळयांच्या त्या कटकटीकडे सारख्याच आनंदानें पहात ती हिंडत होती.

इतक्यांत आपले प्रातर्विधी उरकून सामानाची आवराआवर करीत असलेल्या यमपुरीवाल्यांजवळ बोलत असलेल्या आजोबांकडे तिचें लक्ष जातांच, आपलेही प्रातर्विधी उरकण्यास घाई घाईनेंच ती आंत गेली. आणि थोड्याच वेळांत सर्वांच्या चहापानास सुरवात झाली.

'कां, आजोबा, निघणार कां तुम्ही पण आत्तांच ?' त्या यमपुरीवाल्यानें विचारलें. 'जवळच्याच या भुवनेश्वरीच्या यात्रेला जाणार आहोंत आम्हीं. येणार असाल तुम्हींही तर जाऊं बरोबरच सोबतीनें. पण तुमची कांही हरकत नसली, तर हो.'

'छे छे ! हरकत हो कसली. जाऊं या नली, यांचेबरोबर.' आजोबा म्हणाले.

लौकर भिक्षा मागूनच आपल्याला पोट भरायला लागणार, मग जत्रे सारखं ठिकाण तर त्याला फार सोइस्कर. असा विचार करून तिनें त्यांना म्हटलें 'चला आजोबा, जाऊं या. पण यांना नाहींना त्रास होणार आपल्यापासून ?'

'अहो भलतंच ! त्रास कसला त्यांत. कायहो त्रिंबकराव ?' तो हंसरा यमपुरीवाला म्हणाला.

'छे हो. त्रास कसला ? पण तूं फारच उतावळा बुवा टिल्लोपंत !' कोकाटे म्हणाले.

टिल्लोपंतांचें खरें नांव हरीभाऊ तुरतुरे असें होतें. आणि त्यांच्या चालीला तुरतुरे नांव शोभून पण दिसे. पण दिसण्यांत ते जरा ठेंगू असल्यानें त्यांना सर्वजण टिल्लोपंतच म्हणत.

'कांहो, काय झालं आतां ?' टिल्लोपंत म्हणाला.

'आत्तां नाहीं रे कांहीं. पण एकंदरींत तूं फारच उतावळा.'

'बरं मग ? यायचंना पण यांनीं आपल्याबरोबर ?'

'हो रे ! त्याला नाहीं रे मी कांहीं म्हणत. पण एकदम नाहीं पाघळूं असं. एवढंच !' कोकाटे म्हणाले.

थोड्याच वेळांत ते सर्व आपल्या मार्गाला लागले. सकाळची वेळ असल्यानें सर्वांचेंच पाऊल जरा जलद पडत होतें. सर्वांच्या पुढें आपलें सामान पाठीवर मारून टिल्लोपंत चालले होते. त्यांच्या बाजूनेंच नली व तिचे आजोबा आणि सर्वांच्या मागें कोकाटे. असा त्यांच्या स्वारीचा बेत होता. टिल्लोपंत मधूनच मागें वळून कोकाट्यांजवळ एक दोन शब्द बोलत. बाकी सगळे जण स्तब्धपणेंच चालले होते.

सबंध दिवस वाट चालत होते ते. आतां तर सूर्यास्त होऊन पांढरें शुभ्र चांदणें जिकडे तिकडे पसरलें. आणि मुक्कामाची जागा जवळ येत चालल्यानें हे थकले भागले जीव जरा जलद पाउलें टाकूं लागले. दस्तुरीच्या नाक्यावरील हॉटेलांतील दिवे आतां स्पष्ट दिसूं लागले आणि मुक्काम करीत असलेल्या गाड्यांच्या मालकांचा ओरडा आणि बैलांच्या गळ्यांतील घंटांचा नाद त्यांच्या कानावर आला.

---

# ८

बरेंच जुनें होतें तें दस्तुरीचें नाकें. आणि त्याच्या शेजारचीं दोन हॉटेलेंही जवळ जवळ तेवढींच जुनीं होतीं. पाण्याची सोय फारच सुरेख असल्यानें कितीतरी गाडया मुक्कामाला रात्रीं तिथें येत असत. ठिकाणही मोठें मजेशीर होतें तें. दस्तुरीच्या पाठीमागेंच एक लहानशी टेंकडी पसरली होती. आणि तिच्यावरील झाडीही मोठी सुंदर दिसे. दस्तुरीच्या समोर रस्त्यापलीकडे एक मोठी विहीर आणि तिच्यामागें थोडया अंतरावर एक सुंदरसा तलाव. तलावाच्या पूर्वेकडे शंभर एक घरांचे टुमदार गांव गर्द आंबरायांचा आसरा घेऊन निवांत राहिलेलें दिसत असे. गांव इतका जवळ असल्यानें सायंकाळचे थंड वेळीं गावांतील सान थोर करमणुकीसाठीं दस्तुरीवर येऊन बसत असत. आणि गप्पांचा मग अड्डाच बसायचा त्या विहिरीच्या फरशीवर किंवा सखारामजींच्या दुकानांत, भजीं चिवडयाचा समाचार घेत.

भुवनेश्वरीची यात्रा जवळ आल्यानें दस्तुरीवर आज तर जणुं दुसरें गांवच वसलें होतें. अनेक प्रकारच्या मालांचीं दुकानें, पाळणे, चक्रें, चरकवाले, मिठाई-वाले, पानविडीवाले, राणीचाबंगलावाले या सर्वांची एकच गर्दी उडाली होती.

दस्तुरीच्या जवळील ती गर्दी पाहून हॉटेलच्या जवळ आपल्याला चांगली जागा मिळते कीं नाहीं याची कोकाट्यांना भीति पडली. आणि पाय जरी अगदीं गळून गेले होते तरी त्यानीं झपाटयानें पाय उचलून सखारामजींच्या हॉटेलची पडवी गाठली. दारांतच उभी होती सखारामजींची स्वारी.

‘ राम राम, सखारामजी. कांहीं जागा बिगा आहे कीं नाहीं आम्हांला ? सामान खालीं ठेवीत कोकाटे म्हणाले.

‘ वा ! वा ! त्रिंबकराव. तुम्हांला जागा नाहीं म्हणजे काय ! वा ! तुम्हीं तर नेहमींचे गिऱ्हाईक महाराजा. ’ आपलें काळें मिचकूट जानवें खालींवर करीत सखारामजी म्हणाले.

कोकाटे आंत शिरले आणि त्यानीं एकवार चौफेर नजर टाकली. नित्याच्या परिचयाचंच होतं आंतलं सर्व स्वरूप. हवेंत जरा गारवा असल्यानें चुलींतील उष्णता सुखदायक वाटत होती. चुलीवरील मोठया पातेल्यांत कांहीं तरी उकळत होतें. त्याचा वास हवेंत मिसळला होता. सखारामजीनीं त्यावरील झांकण काढल्याबरोबर मसाल्याचा उग्र वास कोकाटयांच्या नाकांत शिरला. त्या नुसत्या भपकाऱ्यानेंच त्यांच्या तोंडाला पाणी सुटलें. आणि तोंडावरून हात फिरवीतच ते म्हणाले, ' काय आहे हो सखारामजी ? '

' कांदा बटाट्याचा रस्सा आहे महाराजा हा ! आणि लसणीची चटणी यांच्या जोडीला. असा खुमासदार बेत आहे, महाराजा ! ' प्रत्येक वाक्या-गणिक ओठावरून जिभेचा शेंडा फिरवीत सखारामजी म्हणाले.

' वा ! वा ! मजा आहे नी काय आज मग ! '

' बरं, पण थोडा चहा घेणार कीं नाहीं महाराजा ? ' सखारामजीनीं विचारले. ' थोडा चिवडा पण देऊं ना. अगदीं गरमागरम माल आहे, महाराजा ! '

' हं चहा आणा थोडा, फक्त पावणा कप. बाकी कांहीं नको. अहो रस्सा केला आहां ना आज ? अहो पण हो ! सगळंच मुसळ केरांत. आज पाहुणे आहेत आमच्या बरोबर दोन. हो, दोनच म्हणायचे ! ' कोकाटे उद्गारले.

त्यांचें बोलणें संपलें नाहीं तोंच ' हुश्श ! फारच दमलों बुवा आज आपण,' असें म्हणत टिल्लोपंत आणि त्यांच्या मागोमाग नली व तिचे आजोबा आंत शिरले. ' वास तर मोठा झकास खुमासदार सुटला आहे, सखारामजी ! या आजोबा. यांना त्यांची खोली दाखवा सखारामजी. '

सखारामजीनीं त्या दुक्कलीकडे एकदां आश्चर्यानें पाहून त्यांना ते त्यांच्या खोलीकडे घेऊन गेले. ' ठेवा सामान इथें आजोबा. हातपाय धुवा. पाणी आहे बाहेर गरम. आणि जरा आराम करा महाराजा ! एक तासाभरांत मांडतोच पानं, ' असं म्हणून ते परत स्वयंपाकगृहांत आले.

' कोण हो हे आणलेत आज नवे दोस्त, महाराजा,' ते टिल्लोपंतांकडे वळून म्हणाले. पण टिल्लोपंतानीं मान घुसळल्यामुळें ते कोकाट्यांकडे पाहूं लागले.

' मलाही नाहीं माहिती. भिकारीच दिसतात. पण ! ' कोकाट्यानीं उत्तर केलें.

' पण गरीब दिसतात बिचारे ! ' टिल्लोपंत म्हणाले. ' आणि मला वाटतं म्हातारा जरा ढिला असावा इथें. ' आपल्या डोक्याला हात लाऊन ते पुढें म्हणाले. ' पण मला आपलं वाटतं सखारामजी, ते चांगल्या कुळांतले असावे. त्या नाजूक पोरीला कांहीं या भ्रमंतीची संवय दिसत नाहीं. काय त्रिंबकराव ? '

' कशावरून रे ? तुला रे कुणी सांगितलं ? ' कोकाट्यानीं कुरकुरत विचारलें.

' अहो सखारामजी, यांचं काय तुम्हीं ऐकतां. यांचा पोटोबा थंड झाल्याशिवाय नाहीं यांच्या डोक्यांत प्रकाश पडायचा ! ' टिल्लोपंत हंसत म्हणाला. ' तो म्हातारा नाखूष नाहीं दिसला कुठें थांबायला ? पुढें, पुढें चला, अशीच त्याची अस्वस्थ नजर सांगत असते जशी. '

' बरं मग ? ' कोकाटे पुटपुटले.

' मग काय ? आपल्या स्नेह्यांच्या हातावर तुरी देऊन आलेले दिसतात हे म्हातारबुवा. आणि या पोरीलाही आणली आपल्याबरोबर. म्हाताऱ्यावर मोठा जीव दिसतो तिचा. कुठें निघालीं आहेत कोण जाणे. कधीं न संपणारी सिंदबादची सफरच दिसते आहे ही ! '

पण कोकाटयांचें लक्ष घडयाळाच्या कांटयाकडेच लागलें होतें. फारीच रेंगाळत चालताहेत ते कांटे असेंच वाटत होतें त्यांना. कारण पोटांतील कावळे आणि रश्शाचा खुमासदार वास स्वस्थ बसूं देत नव्हता त्यांना.

त्यांच्याकडे हंसत हंसत पहात टिल्लोपंत पुढें म्हणाले, ' पण आपण बुवा नाहीं चालून देणार हें. कोणा भामट्याच्या तडाख्यांत सांपडली तर ? या पोरीचे मग कुत्रा नाहीं हाल खाणार. गोड आहे मोठी पोरगी ! आपल्याला सोडून जर जायला लागला तो म्हातारा, तर आपण नाहीं त्याला सोडणार. त्यांच्यासाठीं जाहिराती सुद्धां लागल्या असतील विलासपुरांत. आपण बुवा त्यांना स्नेह्यांच्या स्वाधीन करणार त्यांच्या ! '

अजूनपर्यंत घडयाळाकडे पहात चुळबूळ करीत आणि सखारामजींना शिव्या देत असलेले कोकाटे, जाहिरातीचा उल्लेख ऐकतांच ताठ बसले आणि, ' अरे हो रे, टिल्लोपंत ! काय डोकं आहे तुझं ! पण अर्धा वांटा मात्र माझा हं ! ठरलं ? दे टाळी ! ' असं म्हणाले.

बाहेर कोणाचीं तरी पावलें वाजलीं. आणि इतका वेळ हा संवाद ऐकत

मधेंच ओठावरून जीभ फिरवीत व आपली मिशी हळुवारपणें कुरवाळीत उभे असलेले सखारामजी, दाराकडे पाहूं लागले. तोंच जान्या सर्कसवाला आंत आला, आणि त्यानें त्या मंडळीला लवून रामराम केला.

जान्याची सर्कस म्हणजे चार कुत्रे आणि एक माकड यानींच बनली होती. कुत्र्यांच्या अंगावर अलवानाचे लाल तुकड्यांच्या झुली होत्या. तिमाजीच्या अंगांतही चड्डी कोट दिसत होतीं. डोक्याला त्यानें एक कानटोपी बसवली होती. हे सर्व प्राणी आंत येतांच ते चारी कुत्रे आपल्या मागील पायांवर खालीं बसले आणि त्यानीं एक पाय हलवून सलामी दिली. तिमाजी मात्र कावराबावरा इकडे तिकडे पहात, ढुंगण खाजवीत किच् किच् असा आवाज करीत स्वस्थ बसला. तिकडे लक्ष जातांच जान्यानें आपल्या हातांतील चाबूक कडकावला, त्या बरोबर तिमाजीनें घाईघाईनें सर्वांना सलाम करून, घाबरत घाबरत आपल्या धन्याकडे पाहिलें.

जान्या सर्कसवाला म्हणजे चांगला सहा फूट उंचीचा माणूस. छातीचाही चांगला भरदार. मिशांचे मोठे कल्ले राखलेला आणि भिवयांमधें शेंदूर. गळयांत पांढऱ्या ताइतीचा भला जाडा गंडा. केस मानेपर्यंत कापलेले आणि त्यांच्यावर बांधलेला मळका पांढरा रुमाल. आंगामधें आड गिऱ्हाइकी आंखूड गरम कोट आणि हातांत पल्लेदार काठी असा त्याचा थाट असे.

आपल्या सर्कसवाल्यांना जवळच बसवून ठेऊन इतरांप्रमाणें जान्याही पानावर बसून चटणी-भाकरीवर ताव मारूं लागला. आणि त्यांच्याकडे फेकल्या जाणाऱ्या तुकड्यांची वाट पहात ते सर्व प्राणी ओळीनें स्वस्थ बसले होते.

ओळीनें बसलेल्या त्यांना पाहून नलीला मोठी गंमत वाटली. आपल्या पुढील भाकरीचे तुकडे त्यांना देण्याकरतां ती उठली. पण 'तुम्ही नका घालूं बायसाब, मी घालतों समद्यांना. पण त्या तिम्याला मात्र येक तुकडाबी नाइ मिलनार. त्येकानं आल्याबरोबर धन्यास्नी रामराम बी नाय केला. दम त्येका !'

बिचारा तिमाजी घाबरलेल्या मुद्रेनें धन्याकडे पहात चुळबूळ करीत राहिला.

'चल इकडे तिम्या, घ्ये ती प्येटी आणि हालव जरा भाता' जान्या त्याच्याकडे पाहून म्हणाला. 'चलारे उभे रहा समदे. आणि घ्या हे तुकडे रांकन.'

जान्याच्या हुकुमाबरोबर ते चारी कुत्रे रांगेनें उभे राहिले आणि त्यानें हांक मारतांच फेंकलेला तुकडा तोंडांत झेलून ते खालीं बसत. आशाळ-भूतपणें त्यांच्याकडे पहात तिमाजी मात्र कधीं सावकाश तर कधीं जलद असा भाता हलवीत राहिला. पेटीचा एकच भसाडा सूर सारखा निघत होता. मध्येंच एकादा मोठा तुकडा फेंकलेला पहातांच तिमाजी केविलवाणा असा स्वर काढी. पण मालकाकडे दृष्टी जातांच परत जोराजोरानें भाता हलवूं लागे, आणि जेवणारांचा एकच हंशा उसळे.

*    *    *    *

घड्याळांत दहाचे टोले पडतांच नली आपल्या जागेवरून उठली. पण आजोबांना अजून गप्पांतच रंगलेले पाहून ती आपल्या खोलींत जाऊन तिनें दार लावलें. आतां अंथरुणावर पडणार तोंच दारावर कोणी टक टक केल्यानें तिनें दार उघडलें. पण खालीं झोंपी गेलेल्या कोकाट्यांना तेथें उभे पाहून तिला आश्चर्य व थोडी भीतीही वाटली.

‘ तसं कांहीं विशेष नाहीं. पण मुद्दाम सांगायला आलों होतों कीं, मीच तुमचा खरा मित्र आहे, टिल्या नव्हे. तुम्हांला तसं वाटलं असलं तरी. ’ कोकाटे म्हणाले.

‘ म्हणजे काय ? मी नाहीं समजल्यें ! ’ नली उद्गारली.

‘ म्हणजे असं कीं, तो टिल्लोपंत लफंगा आहे मोठा. त्याच्या गोड गोड बोलण्यावर जाऊं नका नुसत्या नलुताई. वरच्या देखाव्यांत काय आहे ! पण मीच खरा मित्र आहे तुमचा. ’

कोकाट्यांच्या या बोलण्याची, नलीला थोडी भीतीच वाटूं लागली. गांजाच्या तारेंत आहे कीं काय ही स्वारी ? अशीही तिला थोडी शंका आली.

‘ बाकी तसा चांगला आहे टिल्लोपंत. मायाळू पण आहे, ’ कोकाट्यांनीं आपलें बोलणें पुढें चालू केलें. ‘ पण जरा जास्तच दाखवतो तो मायाळू-पणा. मी नाहीं तसा. ’

पण खरोखरी कोकाट्यांच्या वागण्यांत जर दोष असला तर तो, ते मुळींच मायाळू नव्हते हाच. पण नलीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. कारण तिला कसलाच अनुभव नव्हता दोघांचाही.

‘ माझं ऐका जरा. कां तें नका विचारूं. पण आमच्या बरोबर येत आहांत

तोंपर्यंत, मला अगदीं धरून असा. मीच खरा दोस्त आहे तुमचा. नीट ध्यानांत ठेवा. मुळींच विसरूं नका बरं का!' कोकाटे पुढें म्हणाले. आणि परत परत तिला तसें बजावीत, आणि हातानें खुणा करीत ते पाय न वाजवतां तेथून निघून गेले. नली चकित होऊनच त्यांच्या त्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात उभी राहिली.

सकाळीं लौकरच बाहेर जरा दिसूं लागल्याबरोबर टिल्लोपंतांनीं त्यांना उठविलें आणि पंधरा मिनिटांतच सखारामजींचा निरोप घेऊन सर्वजण बाहेर पडलीं.

हवा मोठी सुंदर पडली होती. थंडगार वाऱ्याच्या झुळुकी त्यांच्या आंगाला हलकेंच स्पर्श करून जणु काय त्यांना क्षेमसमाचार विचारीतच पुढें चालल्या होत्या. रानफुलांचा मधुर वास हवेंत दरवळला होता. गांवांतील लक्ष्मीनारायणाच्या देवळाच्या देवडीवरील चौघड्याचा मंद्रमधुर आवाज कानाला फारच गोड लागत होता. भोंवतालच्या रम्य वातावरणानें उल्लसित झालेले सर्व प्रवासी, झपाट्यानें वाट चालत होते.

आतांपर्यंतची आपली पिछाडीची जागा सोडून कोकाटे आतां नलीच्या अगदीं जवळून चालले होते. त्यांच्या एकंदर वृत्तींतही बराच फरक पडला होता. तिरसटासारखें एकटेच न चालतां नलीबरोबर हास्यविनोद करीत आणि मधूनच टिल्लोपंतांकडे पाहून मान हलवीत, मीच तुमचा खरा दोस्त आहें, असे हावभाव दाखवीत ते चालले होते.

नलीला या सर्व प्रकाराचें मोठें गूढच झालें होतें. रात्रीची त्यांची ती भेट, तें बोलणें आणि आतांची ही वर्तणूक तिच्या चिमुकल्या डोक्यास अगदीं सतावून सोडीत होती. कुठेंही जरा ते थांबले कीं कोकाट्यांची नजर आपल्या वर सारखी खिळलेली आहे असें तिला दिसून येत होतें. आजोबांशींही त्यांची वर्तणूक अधीक आपुलकीची अशी दिसत होती. टिल्लोपंताच्या वागणुकींतही असाच फरक तिच्या नजरेस आला. त्याची दृष्टी सुद्धां त्यांना एकाद्या मौल्यवान ठेव्याप्रमाणें राखीत होती असें दिसलें. या सर्व प्रकारानें तिला अनेक भय शंकानीं अगदीं अस्वस्थ करून टाकलें.

तो सबंध दिवस आणि भुवनेश्वरीच्या देवळा पुढील मुक्कामाची रात्र ती अतीशय बेचैन होती. त्यांच्या जवळील सांठाही आतां संपुष्टांत आल्यामुळें

लोकापुढं तोंड वेंगाडण्याची पाळी आतां आपल्यावर येणार हें ती पूर्णपणें समजून चुकली होती.

सकाळ होतांच ती हलकेच बाहेर येऊन शेजारच्या रानफुलांकडे तिनें आपला मोर्चा फिरवला. आणि पुष्कळशीं फुलें गोळा करून त्यांच्या वेण्या करून त्या यात्रेंत विकण्यासाठीं ती परत येऊन आपल्या आजोबांजवळ बसली. हा सर्व वेळपर्यंत तिचें डोकें काय करावें या विचारांत गुंतलेलें होतें. अखेरीस मनाचा कांहीं निश्चय करून तिनें आपल्या आजोबांस हळूच हलवून जागें केलें आणि गप्प राहण्याविषयीं त्यांना खूण करून, हलक्या आवाजांत ती म्हणाली, ' असे माझ्याकडे नीट बघा आजोबा. घर सोडण्यापूर्वी मला काय म्हणालां होतात तुम्हीं ? आपला बेत जर कोणाला कळला तर, तुम्हांला वेडे ठरवून मला तुमच्याजवळून दूर नेतील, असं म्हणालां होतात नाहीं ? '

म्हातारा अतीशय भयभीत मुद्रेनें तिच्याकडे पहात आपल्याकडून बोलण्याचा प्रयत्न करूं लागला. पण तिनें त्यांना परत खूण करून, हातांतील वेणीचा दोरा धरण्यास त्यांना सांगून ती परत बोलूं लागली. ' अं हं ! तुम्ही बोलूं नका आजोबा. यांना वाटत आहे कीं आपण पळून आलों आहों घरून. आणि म्हणून ते वाट पहात आहेत आपल्याला कोणाच्या तरी ताब्यांत द्यायची. तुम्हीं असे कांपू नका आजोबा, मग आपल्याला जातां कसं येईल ? '

' कुठें नली ? ' म्हाताऱ्यानें अधीरपणे पण हलक्या आवाजांत विचारलें.

' हा पहा आजोबा, परत कापायला लागला तुमचा हात. धीर नका सोडूं. माझ्याजवळ रहा अगदीं सबंध दिवस. कुठेंही इकडे तिकडे पाहूं नका. हळूच निसटूं आपण केव्हांतरी. तुम्ही गुपचुप या नुसते माझ्याबरोबर समजलं ? बस्स ! '.........

' काय चाललं आहे काय ताईबाई, इतक्या लौकर ? ' जांभई देत कोकाऱ्यानीं विचारलें. आणि परत अजून झोंपलेल्या टिल्लोपंताकडे पाहून ते म्हणाले, ' ध्यानांत आहेना ? दोस्त मी, टिल्लोपंत नव्हे हं ! '

' कांहीं नाहीं, त्रिंबकराव, थोडया वेण्या करतें आहे यात्रेंत विकायला. तुम्हांला देऊं का एक ? ' नलीनें उत्तर दिलें.

' वेणी ? आणि ती मला हो कशाला ? आमची ती कुठें आहे इथें वेणी

घालायला ?' ती शब्दावर जोर देऊन कोकाटे म्हणाले, आणि त्यांनीं आपल्या सोबत्यास हांक मारून उठवलें.

आसपासचा गजबजाट आतां वाढूं लागला होता. रात्रीं आलेल्या गाड्यांतील लोक आपआपलीं दुकानें लावण्यांत अगदीं गढून गेलेले दिसत होते. आसपासच्या पंचक्रोशींत भुवनेश्वरीचें देऊळ मोठें जागृत स्थान म्हणून प्रसिद्ध असल्यामुळें गाडया घोडयांची व पायीं येणाराजाणारांची गर्दी सारखी वाढत होती. पाळण्यांचें रोरावणें, चरकांचा करकराट, दुकानदारांचा ओरडा आणि येणाऱ्या जाणाऱ्या लोकांचा कलकलाट अतीशयच मोठा होत होता. नलीनेंही देवळाजवळ उभें राहून आपल्या वेण्या विकण्यास सुरवात केली. पण दुसऱ्या वेणीवाल्यांच्या गोंगाटापुढें त्या गरीब पोरीकडे कोण पहाणार ? मधुन मधून कांहीं पोक्त बाया मात्र तिच्या गोंडस चेहऱ्याकडे बघून, काय मोहक आहे चेहरा असें एकमेकींशीं पुटपुटत, मान हलवून पुढें निघून जात. पण त्या गरीब बिचाऱ्या पोरीची कोणालाही कींव आली नाहीं !

कोकाटे कंपनीचा कार्यक्रम चांगला सुरू झाला होता. मधून मधून आपली दृष्टी नलीकडे व तिच्या आजोबांकडे टाकून आपलीं सावजें सुरक्षित असल्याची ते खात्री करून घेत असत. पण आतां तिसरा प्रहर लोटूं लागल्यानें यमपुरीच्या तंबू पुढील प्रेक्षकांची गर्दी वाढूं लागली. आणि कोकाटे कंपनीला इकडे तिकडे पाहण्यास सुद्धां सवड मिळेनाशी झाली.

त्यांची नजर चुकवून जर जायचं असेल तर आत्तांची संधी फार चांगली होती. यमपुरीचा खेळ अगदीं भर रंगात आल्यानें टिल्लोपंताचें लक्ष पूर्णपणें आपल्या यमदूतांकडे लागलें होतें. आणि कोकाट्यांची स्वारी त्याच्याकडे खूष होऊन पहात आपल्या पुढील गल्ला मोजण्यांत गर्क होऊन गेली होती. हळूच निसटून जाण्याची आत्तांच सोन्यासारखी संधी होती. आणि वयानें लहान असली तरी हें न समजण्याइतकी नली वेडी नसल्यामुळें तिनें आजोबांचा हात धरून हलकेंच गर्दीतून बाहेर पाय घेतला.

---

# ९

यात्रेच्या गर्दीतून बाहेर पडल्यानंतर त्यांनीं झपाट्यानें चालण्यास सुरवात केली. आणि पाऊल पुढें टाकणें अगदीं अशक्य होईपर्यंत त्यांनीं आपला वेग तिळमात्र कमी केला नाहीं. यात्रेतील गोंगाटाचा अस्पष्ट ध्वनीसुद्धां आतां कानावर येत नसल्यानें रस्त्याच्या कडेला विसांव्याकरितां तीं दोघें जरा टेंकलीं. रस्ता चढणीच्या आतां टोकावर आला असल्यानें भुवनेश्वरीपर्यंतचा सर्व प्रदेश दृष्टीखालीं येत होता. तिकडे दृष्टी जातांच जरा अस्वस्थमनानेंच नलीनें सभोंवार दृष्टी टाकली. पण त्यांच्या दिशेनें एक चिटपांखरूसुद्धां फिरकत नव्हतें. आसमंतांत सर्व कांहीं निवांत, शांत होतें.

जवळच्याच गर्दछायेच्या प्रदेशांतून त्यांनीं आतां चालण्यास सुरवात केली. मनावरील दडपण दूर झाल्यानें सगळे श्रम मागें टाकून, नली आतां आपल्या बालसुलभ उल्हासानें स्वच्छंदी पाडसाप्रमाणें त्या मऊ मऊ गालिच्या वरून पुढें धाऊं लागली. तिच्या त्या हलक्या मृदुस्पर्शानें किंचित खालीं दबलेलें गवत, पुलकित झाल्याप्रमाणें परत झटकन उभें राहात होतें. मध्येंच एकाद्या फुलपांखरामागें धांवत, किंवा स्वच्छंदी पांखराची लकेर सोडीत किंवा झाडांच्या पानांमधून मावळत्या सूर्याच्या नाचऱ्या किरणांकडे पहात आणि मधेंच मागें मुरडून आपल्या आजोबांकडे पहात, त्या गर्द पाऊलवाटेनें ती पुढें जात होती.

ती पाऊलवाट आतां मोठ्या रस्त्याला येऊन मिळाली. थोड्याच अंतरावर त्याला एक लहान फांटा फुटला होता. जवळील खांबावर ' हमरापूर तीन मैल ' असें लिहिलेलें दिसल्यानें त्यांनीं त्या दिशेनें आपला मोर्चा वळविला. पण पाटीवरील ' तीन मैल ' त्यांना बरेच मोठे असावेसें वाटूं लागलें. तरीही रस्त्याला लौकरच उतार लागल्यानें, आपण रस्ता तर चुकलों नाहींना अशी त्यांना आलेली शंका उताराच्या पायथ्याशींच असलेल्या छोटेखानी गावाच्या दर्शनानें नाहींशी झाली.

# छोटी नली

लहानच होता अतीशय गांव तो; पंचवीस तीस उंबरठयांचा. बाहेरील हिरव्यागार मैदानावर शाळेंतील मुलांचा खेळ चाललेला दिसत होता. एकदोन वयस्क माणसेंही दिसत होतीं आपल्या नातवंडांना घेऊन बसलेलीं. त्यांच्याकडे पहात आतां मुक्कामाला जागा कोणाला विचारावी या विचारांत नली जरा रेंगाळत होती. जवळच एका लहानशा बागेच्या फाटकाशीं एक वृद्ध गृहस्थ हातांतील चंचींतील पान खात कुठेंतरी एकाग्र दृष्टीनें पहात स्वस्थ उभे होते. दिसण्यांत अगदीं साधे, अंगयष्टी जरा किरकोळच पण प्रसन्न चेहऱ्याचे असे दिसत होते ते. त्यांच्या बाजूच्याच पाटीवर 'मराठी शाळा' अशी एक जुनी पुराणी पाटी दिसत होती.

'विचार बाळ त्यांना,' आजोबा नलीला म्हणाले.

'मला नाहीं बाई धीर होत त्यांना विचारायला. किती गंभीर दिसताहेत पहा ते आजोबा.' नली म्हणाली. 'थांबूंया आपण जरा. जाईल त्यांचें लक्ष आपल्याकडे जरा वेळानें.'

आणि तशींच स्तब्धपणें तीं थांबलीं. पण त्या वृद्ध गृहस्थाचें कांहीं त्यांच्याकडे दृष्टी जाण्याचें लक्षण दिसेना. अगदीं गढून गेलेले होते ते आपल्या विचारांत. मायाळू दिसत होता त्यांचा चेहरा. आंगावरील पोषाक स्वच्छ पण खेडवळ वळणाचाच होता. त्यांच्यावर आणि त्यांच्या घरावर एकलेपणाचीच छाया पडलेली दिसत होती. शेजारच्या मैदानावरील गजबजाटाच्या विरोधी वातावरणामुळेंही वाटत असेल तसें कदाचित्, पण त्या सगळया जगांत ते एकटेच, अगदीं टाकलेले दिसत होते.

वेळ होऊं लागला. पण त्या वृद्धाचा समाधीभंग होण्याचें कांहींच चिन्ह दिसेना. म्हणून शेवटीं नलीनें धीर करून व जरा पुढें होऊन फाटकाची कडी काढली. त्या आवाजानें जागे होऊन त्या वृद्धानें जरा दचकूनच त्यांच्याकडे प्रेमानें पाहिलें. पण अपेक्षित व्यक्ती न दिसल्यामुळें जणूं काय त्यानें आपली मान हलवली.

'गरीब पांथस्थ आहों महाराज आम्ही. रात्रभर जरा जागा द्याल तर मेहेरबानी होईल मोठी;' नली म्हणाली.

त्या वृद्धानें तिच्याकडे जरा निरखून पाहिलें. गतकालांतील काहीं स्मृतीनें तो जरा चमकला व तोंडांतील पिंक दूर टाकून तो म्हणाला. 'फार दुरून आलेले दिसतां!'

'होय महाराज,' नलीनें उत्तर दिलें.

'फार लहान दिसतेस माझे बाई तूं, तुमची नात कां ही आजोबा ?' नलीकडे हळुवारपणें पहात मास्तर म्हणाले.

'होय महाराज; आणि एवढाच माझा म्हाताऱ्याचा आधार आहे हा जगांतला.' नलीचे आजोबा म्हणाले.

'या आंत या; आपलंच घर आहे असं समजा. कांहीं संकोच करूं नका.' असें म्हणून त्या वृद्ध शाळा मास्तरांनीं या दोन पाहुण्यांस घरांत नेलें. आणि त्यांचे हातपाय धुणें झाल्यानंतर थोडी भाजी भाकरी त्यांच्या पुढें केली व आपण फक्त एक दुधाचा पेला आपल्यापुढें घेऊन जवळच ते एका पाटावर बसले. 'करा सुरवात आजोबा. गरीबाकडची मीठभाकर आहे ही. सुदाम्याचे पोहेच म्हणाना !'

'म्हणजे आम्हीं कृष्णच झालों. नाहीं आजोबा ?' हंसत हंसत नली म्हणाली. 'पण तुम्ही नाहीं काहीं खात तें ?'

'संध्याकाळीं जेवत नाहीं मी बाळ. दूधच घेतों नुसतं.' मास्तरनीं उत्तर दिलें. त्यांची स्मृती परत एकदां गतकाळावर स्थिर झाली.

दोनतीन यत्तांचीच एक शाळा दिसत होती ती. दहा बारा ओबड धोबड, डाग पडलेले आणि चाकूनें खरवडलेले बांक, एक साधारणशी खुर्ची आणि त्यालाच शोभणारें टेबल, फळीवर मळकीं, फाटकीं अशीं पंधरा वीस पुस्तकें आणि त्यांच्याच आंवती भोंवती चेंडू, भोवरे, गोट्या, पतंग, अर्धवट खाल्लेले पेरू, दांडू विटया, असे पसरले होते. उनाडक्या करणाऱ्या पोरांचा जप्त केलेला माल दिसत होता तो. पण भिंतीवरील सुंदर अक्षरांत लिहिलेल्या कांहीं म्हणी, आणि लिहिलेले कांहीं वाक्यप्रकार मात्र लिहिणाराचा हात अतिशय वळणदार असावा अशी ग्वाही देत होता. एकाच हाताचें कौशल्य दिसत होतें तें.'

'सुंदर आहे अक्षर नाहीं ?' नलीचें लक्ष त्यावर खिळलेलें पाहून मास्तर म्हणाले.

'खरंच ! किती सुरेख आहे ! तुमचंच ना हें—मास्तर ?' नलीनें विनयानें विचारलें.

'माझं ?' आपल्या त्या अत्यंत आवडत्या कारागिरीकडे निरखून

पाहण्यासाठीं आपली आरशी डोळ्याला लावीत मास्तर म्हणाले, ' आतां नाहीं काढतां येणार मला तसं अक्षर. तुझ्या एवढ्याच एका छोट्या बच्चानें लिहिलं आहे तें सगळं. फारच हुशार आहे छोकरा. विलक्षण ! प्रत्येक गोष्टींत आपली वरचढच आहे त्याची. अभ्यासांत काय नी खेळांत काय ! काय ओढ वाटते माझी त्याला. मला एक वाटणं स्वाभाविक आहे म्हणा ! पण त्याला कां एवढा ओढा लागावा—'

पण मास्तर इथेंच थांबले आणि चष्मा काढून त्याच्या कांचा पुसण्यास त्यांनीं सुरवात केली. जणूं कांहीं त्यांच्यावरच अश्रुपटल आलें होतें.

' म्हणजे डोळ्यांना पाणी कां आलं मास्तर तुमच्या ? तसं कांहीं विशेष नाहींना ? ' नलीनें घाबरून विचारलें.

' नाहीं विशेष नाहीं. पण खेळतांना दिसला नाहीं कुठें आज तो. थोडा आजारीच आहे म्हणा. आपला नेहमीं पुढें असायचा सगळ्यांच्या. पण येईल बहुतेक उद्यां म्हणा, ' मास्तरांनीं उत्तर केलें.

' फार आजारी का आहे मास्तर, तो ? ' बालसुलभ कळवळ्यानें तिनें विचारलें.

' नाहीं, फार नाहीं. पण काल थोडा जास्त झाला होता, असं म्हणालं कोणी तरी. परवांही होता किंचित् जास्त म्हणा. असं होतंच पण या तापांत. तसं कांहीं अजून वाईट लक्षण नाहीं—नाहीं, वाईट नाहीं ! '

उठून जरा दाराजवळ जाऊन त्यांनीं मोठ्या उत्सुकतेनें बाहेर डोकावून पाहिलें. काळोख वाढत होता, आणि सर्वत्र अगदीं शांत होतें.

' चालायची शक्ती जर असती त्याला तर कोणाचा तरी हात धरून आला असता तो, मला माहीत आहे, ' परत आंत येऊन ते म्हणाले. ' रोज घरीं जातांना यायचा मला तो नमस्कार करायला. पण आज कदाचित् जरा उतार पडला असेल त्याला. आणि आतां या गार वाऱ्यांत बाहेर पडणंही चांगलं नाहीं. बरा नाहीं आला तो ! '

आणि मग विमनस्कपणेंच येरझारा चालल्या होत्या त्यांच्या कांहीं वेळ. आगामी वादळाचा स्फुट अस्फुट प्राथमिक पदरवच जणुं त्यांच्या कानावर येत होता.

इकडे आजोबा बसल्या जागींच डुलक्या घेऊं लागले होते. तिकडे हंसत

हंसत पाहून मास्तरनीं नलीला त्यांची खोली दाखवली, आणि तेही मग आपल्या खोलीकडे वळले.

* * * *

पण बाबजी मास्तरांना कांहीं केल्या त्या रात्रीं झोंप येईना. नलीच्या त्या गोंडस चेहऱ्यानें त्यांच्या अंतःकरणांत मोठी खळबळ उडवून दिली होती. आपल्या गत आयुष्यांतील असंख्य गोष्टींचा चित्रपट त्यांच्या मनःचक्षूंपुढून आतां हळुहळु उलगडूं लागला होता.

आईबापांच्या मृत्यूमुळें लहानपणींच उघडे पडल्यानें कोंकणांतील मामांच्या घरीं गेलेलें त्यांचें बालपण; तें डोंगरदऱ्यांतून, नदी कातळावरून मनमुराद भटकणं; काजू, आंबे, करवंदांच्या मेजवान्या; विटीदांडूचे खेळ, पोरांच्या आपसांतील मारामाऱ्या, मास्तरांच्या व मामाच्या हातचा खाल्लेला मार, मामीनें केलेले लाड, शेजारच्या बनीशीं खेळतांना तिला आपण पाडल्यामुळें तिचा झालेला रुसवा फुगवा, आणि समजूत घालतां घालतां झालेली आपली पुरेवाट व ती मग खुदकन् कशी हंसली, हे सर्व रम्य प्रसंग त्यांच्या डोळ्यापुढून सरकत सरकत, लहानपणच्या आपल्या मैत्रिणीशींच झालेल्या विवाहानें त्यांच्या अंतःकरणास गोड गुदगुल्या करीत, प्रथम अपत्य जन्माच्या दिवसाशीं येऊन, ते किंचित काळ स्थिरावले. पांचवी पूजनाच्या दिवशीं आपण त्या खोलींत प्रथम पाऊल टाकलें. खोलींतील समईचा तो मंद प्रकाश, तें कुंद वातावरण, खाटेवरील प्रिय पत्नीचा क्षीण पण कन्या रत्नाच्या लाभानें सुखावलेला चेहरा आणि तिच्या शेजारींच बाळंत्यांत गुंडाळलेला तो बाळजीव ! किती शांत झोंपली होती ती ! ‘ आपलाच नमुना आहे हं अगदीं, ’ असे आपल्या पत्नीनें काढलेले उद्गार आणि तिची आपल्यावर व त्या चिमण्या जीवावर खिळलेली स्निग्ध दृष्टि, सर्व, सर्व कांहीं अगदीं समोर घडत होतें तें आत्तां.

चित्रपट पुढें सरकला. चार महिन्यानंतर घडलेला पत्नीचा परत गृहप्रवेश, आसुसलेल्या मनानें आपण घेत असलेला तिचा सहवास, जोडीनें केलेलें लाडक्या कलेचें कौतुक, तिच्यावरून झालेले रुसवे फुगवे, या सर्व आयुष्यांतील अत्यंत रम्य दिवसांचें चित्र त्यांच्या डोळयापुढें निश्चलपणें स्पष्ट उभें राहिलें. दृष्टी जणूं काय त्या चित्रावरून पुढें सरकण्यास अतीशय नाखूषच होती !

आणि मग कलेचें तें अखेरचें दुखणें ! किती शांतपणें तो चिमुकला जीव काळाच्या त्या कठोर हातांशीं असहायपणें झगडत होता ! त्या बाळजीवाला होत असलेल्या यातनांनीं आपलें अंतःकरण अगदीं पिळवटून निघत होतें. किती अनिर्वचनीय यातना होत असतील तिला. आणि आपण—अगदीं कांहीं, कांहीं करूं शकत नव्हतों. पूर्णपणें हतबल होऊन, निराश अंतःकरणानें आणि गुदमरलेल्या मनानें शून्य, स्वस्थ बसलों होतों आपण !

मास्तरांचें अंतःकरण जणुं काय त्या आत्तांच घडत असलेल्या प्रसंगानें अगदीं छिन्नविच्छिन्न होऊन गेलें. अत्यंत अस्वस्थ मनानें, अंतःकरणाचा दुःखावेग सहन न होऊन ते खोलींत जोरानें फेऱ्या मारूं लागले. गुदमरलेल्या त्यांच्या अंतःकरणांतून कांहीं वेळानें ‘ तुझी मर्जी प्रभु ! श्रीहरी, श्रीहरी ! ! ’ असे अत्यंत आवेगानें उद्गार निघून त्यानीं परत अंथरुणावर आंग टाकलें.

---

# १०

सकाळीं लौकरच नली जागी झाली. अंथरुणावरच पडून शरीराला जरा आळोखे पिळोखे देऊन मग ती टुणकन उठून बसली. रात्रीच्या शांत झोपेनें तिचा थकवा पार निघून गेला होता. बाहेर येऊन तिनें इकडे तिकडे पाहिलें. पण मास्तर तिला कुठें न दिसल्यानें तिनें त्यांच्या खोलीची झाडझूड करण्यास सुरवात केली.

इतक्यांत मास्तर बाहेरून आंत आले, एकाद्या स्थितप्रज्ञ योग्याप्रमाणें त्यांचा चेहरा आतां शांत दिसत होता. आणि रात्रीच्या वादळाची इवली सुद्धां खूण तिथें आतां दिसत नव्हती. तिनें केलेली ती साफसूफी पाहून ते फार खूष झाले.

‘ फार आभारी आहे हं तुमचा नलुताई. मी केलं असतं कीं पण. बाई येते नेहमीं झाडलोट करायला. पण आज दोन दिवस त्या छोट्या मित्राकडे पाठवली आहे जरा घरांत मदतीला,’ ते म्हणाले. ‘ तिकडूनच आलों मी आत्तां.’

‘ कशी आहे आतां तब्बेत तुमच्या मित्राची ? ’ नलीनें विचारलें. ‘ बरी आहे ना जरा ? ’

‘ नाहीं. जास्तच आहे जरा. ’ मास्तरानीं दुःखानें मान हलवीत उत्तर दिलें.

‘ अरेरे ! ’ नली कळवळून म्हणाली.

तिच्या त्या सहानुभूतीनें मास्तराना थोडें बरें वाटलें. पण लगेच अधीक अस्वस्थपणें ते म्हणाले, ‘ आपलेपणामुळें आपण जास्त भितों कधीं कधीं. पण नाहीं म्हटलं तरी थोडं जास्तच आहे त्याचं ! ’

जेवण होईपर्यंत त्यांचे सर्व व्यवहार अगदीं स्तब्धपणें चालले होते. नली मास्तरांच्या भोंवती लुडबुडत त्यांना स्वयंपाकांत मदत करीत होती. मास्तरानांही तिच्या गोड लुडबुडण्याची मोठी मौज वाटत होती. जेवतां जेवतां नलीच्या आजोबांकडे पहात मास्तर म्हणाले, ‘ तुम्ही फार थकलेले दिसतां

आजोबा. घेतलीत विश्रांती एकादा दिवस तर चांगलं. पुढें जायची फारशी घाई नसेल तर रहा इथेंच आणखी एकादा दिवस. बरं वाटेल मला पण त्यानें.'

म्हाताऱ्यानें फक्त प्रश्नार्थक मुद्रेनें आपल्या नातीकडे पाहिलें.

'आपल्या या छोट्या नातीचा सहवास जर मिळाला आणखी एकादा दिवस तर फार आनंद होईल मला. मोठी गोड पोर आहे ही! पहा, दोन्हीही गोष्टी साधतील त्यांत. विश्रांती परी विश्रांतीही मिळेल तुम्हांला आणि या एकट्या प्राण्याला विरंगुळाही दिल्यासारखा होईल जरा. पण जर जायलाच हवं असलं तुम्हांला, तर नाइलाज आहे. मग आहे एवढ्यांतच समाधान मानून गांवाबाहेर येईन जरा पोंचवायला. शाळेलाही जरा अवकाश आहे, आणि मलाही घाई नाहीं;' मास्तर पुढें म्हणाले.

'काय करायचं मग, नली? सांग तूंच मास्तरनां.' म्हाताऱ्यानें गोंधळून म्हटलें.

पण नलीलाही विश्रांतीची गरज असल्यानें तिनेंही फारसे आढेवेढे घेतले नाहींत. मास्तरही मग अतीशय खूष झालेले दिसले. त्यांच्या डोळ्यांत आनंद आणि वात्सल्य यांचं मोठं गोड मिश्रण तरळत होतं! आतां त्यांच्या अंगांत जणुं नवतारुण्याचा संचार होऊन तोंडानें गुणगुणत आपलीं कामें ते करूं लागले. नलीनेंही त्यांना मदत करण्यास सुरवात केली. मास्तरांचें काम संपल्यावर बागेंत तिनें एक फेरी मारली आणि आणलेल्या फुलांची माळ गुंफीत खिडकीजवळच तिनें बैठक ठोकली. फुलांचा मंद सुगंध हवेंत दरवळला आणि मास्तरांनीं वर पाहिलें. शाळेची वेळ झालीसें वाटून नली तेथून उठली. पण मास्तर तिला जाऊं देईनात. आपल्या बसण्यानें त्यांना आनंद होतो आहे असें तिला दिसल्यानें, परत खालीं बसून तिनें आपल्या कामास सुरवात केली.

मास्तरांचा विद्यार्थीगण आतां हळुहळू येण्यास सुरवात झाली. सहापासून चौदा पर्यंतच्या भिन्न भिन्न वयाचे दिसत होते ते सर्व. प्रत्येकजण आंत येतांच आपल्या गुरुजींना वंदन करून, मास्तरांच्या मागें खिडकींत बसलेल्य नलीकडे कुतूहलानें पहात, आपआपल्या जागेवर जाऊन बसत होता. मास्तरांनीं ही गोड छोकरी कुठून पैदा केली, अशीच जणुं काय त्यांची दृष्टी

बोलत होती. नवीन पाहुण्यांच्या या हजेरीमुळें त्यांचा किलबिलाट आज जरा हळू चालला होता. पण लौकरच त्यांचा आवाज वाढूं लागला.

बांकावरील पहिली जागा मोकळीच दिसत होती. मास्तरांच्या आजारी असलेल्या बालमित्राची मानाची जागा होती ती. त्या जागेकडे विमनस्कपणें पहात मास्तर स्वस्थ बसले होते. आसपासच्या गलक्याकडे त्यांचें फारसें लक्ष नव्हतें. मुलांचें पुस्त्या लिहिणें चालू होतें. दुसऱ्या वर्गांत 'पोर खाटेवर' ही कविता कोणी तरी गुणगुणत होता. मास्तरांनीं जरा चमकूनच त्याच्याकडे थोडावेळ पाहिलें व ते म्हणाले, "आज तुम्हांला सुटी द्यायचा विचार आहे माझा."

मुलांनीं सारा वर्ग डोक्यावर घेतला. मास्तरांचें पुढचें बोलणें कोणालाच ऐकूं जाईना. शेवटीं त्यांनीं आपला हात वर केला आणि मुलेंही एकदम शांत झालीं. मास्तरांनीं आपलें बोलणें पुढें चालू केलें.

'पण हें पहा, आज दंगा मस्ती नाहीं करायची कुणी. गांवांतून ओरडत, हुंदडायचेंही नाहीं. अगदीं गांवाबाहेर जायचं हं सगळ्यांनीं खेळायला. ऐकतो आहेस ना जगदाळे ? आपल्या आजारी मित्राला त्रास नाहीं होतां कामा, मुळीं सुद्धां.'

सर्वांनीं हळु आवाजांत दंगा न करण्याची कबुली दिली. जगदाळेही पुटपुटत होता, 'माझा आवाजच मोठा आहे त्याला मी काय करूं ! मी कांहीं मुद्दाम नाहीं ओरडत.'

'नीट लक्षांत राहील ना रे सगळ्यांच्या, मी काय सांगितलं तें ? ऐकाल ना माझं एवढं ? जा, आनंदानें खेळा. पण आपल्या मित्रालाही विसरूं नका. जा, पळा.' मास्तर त्यांच्याकडे पहात म्हणाले.

सायंकाळच्या सुमारास त्यांची मोलकरीण घाबऱ्या घाबऱ्या त्यांच्याकडे आली. 'हरी कसंसंच करतो आहे मास्तर; चला; लौकर चला.'

मास्तर दारांतच उभे होते. नलीला घेऊन तिकडेच जाण्याच्या विचारांत होते ते. निरोपाबरोबर घाइघाईनेंच पायांत जोडा चढवून नी नलीचा हात धरून ते तिकडे झपाट्यानें चालूं लागले.

पुढल्या ओटीवर पांच सहा बायका एका वयस्क स्त्रीच्या भोंवती बसल्या होत्या. काळजीनें आणि दुःखानें खंगलेल्या त्या वृद्धेच्या डोळ्यांतून अविरत अश्रुप्रवाह चालला होता.

## छोटी नली

‘ कसा आहे तो आजी ? घाबरला का आहे तो ? ’

‘ चालला हो तो; चालला मला म्हातारीला टाकून ! ’ म्हातारी आवेगानें ओरडली. ‘ शिकणं, शिकणं हो हें मास्तर ! मारलं माझं पोर या शिकण्यानीं ! हरी ! हरी ! बाळ, काय रे करूं मी आतां ! ’

‘ असं नका बोलूं आजी. असं काय करतां ? ’ असें कांहीं तरी म्हणून आपल्या आसन्न मरण बालमित्राच्या खोलींत ते हळूच शिरले.

आठ दहा वर्षांचा होता कोंवळा छोकरा तो. डोक्यावरील स्नेहशून्य घन-दाट काळे केंस त्याच्या कपाळाभोंवती विखुरले होते. डोळे तेजस्वी दिसत होते. पण तें तेज या लोकांतील नव्हतें ! त्याच्या बिछान्याजवळ बसत मास्तरनीं त्याला अत्यंत हळुवारपणें हांक मारली. जरा दचकूनच हरीनें मास्तरांकडे अत्यंत प्रेमानें पाहून त्यांचा हात घट्ट धरून ठेवला. ‘ कित्ती चांगले आहांत तुम्हीं मास्तर ! पण ही कोण मुलगी आणली आहेत बरोबर ? पुढें यायला सांगा मास्तर तिला,’ क्षीण आवाजांत तो म्हणाला.

नलीचे डोळे पाण्यानें भरून आले होते. आपल्या अश्रूंना मोकळी वाट देतच तिनें हरीच्या कपाळावर हात ठेवला.

‘ तुला आपली बाग आठवते नारे हरी ? ’ त्याच्या चेहऱ्यावर येत अस-लेली ग्लानी जरा दूर करण्यासाठीं, मास्तर हळू आवाजांत म्हणाले, ‘ सुंदर दिसते नाहीं ती संध्याकाळच्या वेळीं ? लौकर बरा हो तूं आतां. मग आपण खूप खूप खेळूं त्या बागेंत. हं. ’

हरीच्या चेहऱ्यावर क्षीण—अत्यंत क्षीण हास्य पसरलें. आणि त्यानें मास्तरांच्या अंगावर आपला हात टाकला.

सायंकाळच्या त्या प्रशांत वातावरणांतून मुलांच्या खेळण्याचा ओरडा मंदपणें खिडकीवाटे आंत आला.

‘ कसला आला आवाज मास्तर ? ’ हरीनें डोळे उघडून विचारलें.

‘ मुलं खेळताहेत बाहेर मैदानावर. ’

त्यानें उशीजवळचा आपला हातरुमाल उचलला, आणि हात उंच करून खिडकींतून हलविण्याचा प्रयत्न केला. पण तो क्षीण झालेला हात एकदम खालीं पडला. ‘ मास्तर जरा बांधतां का तो त्या गजाला ? माझी आठवण होईल कदाचित त्यांना तो पाहिल्यावर. ’ तो क्षीणपणें म्हणाला.

## छोटी नली

आपलें डोकें उचलून त्यानें एकदां त्या फडफडणाऱ्या रुमालाकडे पाहिलें व आपली क्षीण नजर खोलींतील आपल्या पुस्तकांवरून व खेळांवरून फिरवली. आणि डोकें परत हळूच उशीवर टेंकून त्यानें नलीला आपल्या मंददृष्टीनें शोधण्याचा प्रयत्न केला.

त्याची ती निष्फळ धडपड पाहून नली जरा पुढें झाली व आपला मृदु हात त्याच्या डोक्यावरून हळुवारपणें फिरविण्यास तिनें सुरवात केली. बाल-वृद्ध मित्रांची ती जोडी आपल्या मंद डोळ्यांनीं अतृप्तपणानें एकमेकांकडे पहात होती. त्या लहान बालकानें आपल्या अंगांतील शक्ति सर्वस्व खर्च करून मास्तरांचा हात घट्ट पकडला आणि भिंतीकडे तोंड फिरवून त्यानें डोळे मिटले !

गरीब बिचारे मास्तर ! तसेच तो थंडगार हात आपल्या हातांत धरून त्याला कुरवाळीत होते. पण आतां एका मृत बालकाचा हात होता तो ! त्यांनीं तें जाणलें; आणि तरीही ते हळुवारपणें त्यावर आपला हात फिरवीत तसेच गोंजारीत राहिले; खालीं ठेववेचना तो त्यांच्यानें......

अंतःकरण अगदीं दुभंग होऊनच नली मास्तरांबरोबर घरीं परतली. आपल्या आवेगाचें व अश्रूंचें खरें कारण आपल्या आजोबांपासून लपविण्यासाठीं ती आपल्या चिमुकल्या जीवाचा आटापीट करीत होती. आपल्या म्हाताऱ्या आजीचा तेवढाच होता तो नातू आणि त्याच्या अकाल मृत्यूनें ती म्हातारी जगांत आतां निराधार पडली होती !

घाइघाईनेंच ती आपल्या खोलींत शिरली, आणि अजूनपर्यंत आवरून धरलेल्या आपल्या दुःखावेगास उशींत तोंड खुपसून तिनें मोकळी वाट करून दिली.

---

*

# ११

सूर्यनारायणाची स्वारी क्षितिजावर स्थिरावली, व सृष्टीच्या नित्य व्यवहारांस सुरवात झाली. नली व तिचे आजोबाही प्रातर्विधि उरकून आपल्या निर्दिश प्रवासाला तयार झाले.

शाळा आज लौकर सुरू झाली होती. मुलांचा नेहमींचा गलका सुरू झाला. किंचित् दबल्या आवाजांत आज चालला होता तो. आमचे प्रवासी बाहेर पडले. आपल्या खुर्चीवरून उठून मास्तरही त्यांच्याबरोबर बागेच्या फाटकापर्यंत आले.

' बरं आहे नमस्कार आजोबा, देव आपलं भलं करो ! ' खिन्न आवाजांत मास्तर म्हणाले, ' एकटा प्राणी आहे या जगांत मीं आतां. जर आलांत परत कधीं या बाजूला तर ठेवा आठवण आमची. '

' कधीं नाहीं विसरणार मास्तर आम्हीं तुम्हांला. डोंगराएवढे उपकार आहेत तुमचे आमच्यावर, मास्तर.' नली म्हणाली. तिचे डोळे पाण्यानें अगदीं भरून आले होते. मोठ्या कष्टानेंच आवरले तिनें त्यांना.

' खरंच मास्तर साहेब, मोठे उपकार झाले आपले आमच्यावर. त्याचे कसे उतराई होऊं आम्ही ! ' आजोबाही गहिंवरून म्हणाले.

' त्यांत कांहीं नाहीं. साधी माणुसकी आहे ही, आजोबा. अहो, आपण माणसांनीं जर नाहीं एवढी माणुसकी दाखविली तर मग पशूंत आणि आपल्यांत फरक तो काय राहिला ? मेहेरबानी नाहीं नी उपकार नाहीं ! कर्तव्यच आहे प्रत्येकाचें हें. आणि जुनी खोडंच नाहीं का आम्ही आतां ? आसपासच्या थकल्या भागल्या जीवांना विसांवा द्यायचंच फक्त आमचं काम आतां. दुसरं काय आम्ही करणार ? ' मास्तर सात्विक आवेशानें म्हणाले.

' बरं आहे नमस्कार ' असं मास्तरांनीं परत एकवार जड आवाजांत म्हणून आणि नलीच्या चेहऱ्याकडे क्षणमात्र टक लावून पहात ते मागें

वळले. जणुं तिचें रूपच सांठवीत होते ते आपल्या अंतःकरणाच्या गाभाऱ्यांत.

नली व तिचे आजोबा जड पावलांनीं चालूं लागले. दोघेंही वारंवार मागें वळून पहात होतीं. दाराच्या चौकटीवर हात देऊन मास्तरांची मूर्ती त्यांच्याकडे पहात उभी होती. शेवटल्या वांकणाशीं त्यांनीं अखेरची मागें दृष्टी टाकली. मास्तरनींही त्यांच्या दिशेनें आपला हात हालवला आणि ते दिसेनासे झाले.

आतां मोठ्या रस्त्याला येऊन मिळालीं तीं दोघें. वाट नेईल तिकडेच चाललीं होतीं तीं. कारण सर्वच अज्ञात होता प्रदेश त्यांना तो. पण मुख्य रस्ता न सोडण्याचा मात्र निश्चय होता त्यांचा. असा आस्ते आस्ते चालू होता त्यांचा प्रवास.

तिसरा प्रहर आतां टळून गेल्यामुळें उन्हाची प्रखरता पुष्कळच कमी झाली होती; आणि सायंकाळचे थंड वारेही वाहूं लागून चालण्याचे श्रम त्याना भासूं देत नव्हते. रस्त्यानें आतां एकदम वळण घेतलें होतें आणि तो एका दुतर्फा पसरलेल्या हिरव्या गार विस्तीर्ण कुरणांतून जात होता. कुरण संपून रस्ता परत शेतजमिनीच्या बाजूनें चालू लागला. त्या ठिकाणीं रस्त्याच्या डावे बाजूला चारपांच बारदानी गाड्या उभ्या राहिल्या होत्या. गाड्या अगदीं रस्त्यावरच असल्यानें आमच्या प्रवाश्यांना त्या टाळणें शक्य नव्हतें.

गाड्यांच्या एकंदर स्वरूपावरून व विशेषतः त्यांतील पहिल्या स्वारीच्या गाडीच्या एकंदर रुबाबावरून त्या गाड्यांचा मालक सुस्थितींत असावा असें दिसत होतें. स्वारीच्या गाडीला चांगला तेल्या रंग दिलेला होता. वरील तट्टया आंतून बाहेरून कापडानें चांगला मढवला असून टपाच्या दोन्ही बाजूला लाल अलवानाची झालर लावली होती. स्वारीच्या बैलांच्या अंगावरही रंगी बेरंगी झुली व गळयांत घुंगुर माळा दिसत होत्या. आंतील पुढले बाजूच्या तक्क्याला टेंकून एक मध्यमवयीन गृहस्थ बसले होते. आणि त्यांच्या जवळच मागें पाय टाकून, साधारण स्थूल, दिसण्यांत नीटस, गोरटेल्या पण थोड्या नटव्या अशा एक बाई बसल्या होत्या. त्यांच्या एकंदर रंगरूपावरून त्या पुढील गृहस्थांच्या अर्धांगी असाव्या असें स्पष्ट दिसत होतें.

आपल्या यजमानांच्या हातांतील पाण्याचें भांडें घेऊन तांब्याचें झांकण लावण्यासाठीं त्या मागें वळल्या. तोंच त्यांची दृष्टी त्यांच्याकडे आतुर डोळयांनीं पहात असलेल्या नलीकडे आणि तिच्या वृद्ध सोबत्याकडे गेली.

# छोटी नली

‘ए मुली जत्रेवरून आलांत ना तुम्हीं ? मग त्या छकड्यांच्या शर्यतींत कोण जिंकलं शेवटीं. शितोळ्यांचा छकडाच आला ना पहिला ?’ तिच्याकडे पहात त्या स्थूल बाईनीं विचारलें.

‘मला नाहीं माहीत बाईसाहेब. कोण शितोळे ?’

‘तुला नाहीं माहीत ! कां, पण तूं तर तिथें होतीस. मी पाहिली होती तुला जत्रेंत,’ बाई म्हणाल्या.

नलीला जरा भीतीच वाटली हें ऐकून. त्या यमपुरीवाल्यांना तर नाहींना या ओळखीत. पण तिची ती भीती लवकरच खोटी ठरली.

‘आणि वाईट वाटलं होतं मला तेवेळीं त्या लोकांत तुला पाहून. हलकट असतात अगदीं मेले ते. दूरच असावं आपण त्यांच्यापासून चार पावलं,’ त्या स्थूलबाई पुढें म्हणाल्या.

‘आम्हांला सुद्धां आवडत नव्हतं तें. पण करणार काय बाईसाहेब. रस्ता तर आम्हांला पार नवीन. आणि तेही बिचारे गरीब दिसले. तुमच्या आहेत माहितीचे ते, बाईसाहेब ?’ नलीनें विचारलें.

‘त्यांची माहिती ! काय विचारतेस पोरी ?’ बाई किंचाळल्या. ‘पण लहान आहेस तूं ! आणि म्हणूनच विचारलंस असं मूर्खासारखं. पण आश्चर्यच बाई ! तुला वाटलं तरी कसं तसं ? हलकट काग दिसतें मी तशी ? ऐकलं का, पहायचं तरी एकदां.’ पतिराजांकडे दृष्टिक्षेप टाकून त्या म्हणाल्या.

‘तसं नाहीं बाईसाहेब ! असं भलतंच कसं बोलेन मी ? चूक झाली माझी. माफ करा हं मला.’ नली घाई घाईनें त्यांना म्हणाली.

त्यांच्या यजमानांचें या संवादाकडे फारसें लक्ष नव्हतें. त्यांनीं एकदांच मागें वळून नलीकडे पाहिलें आणि परत आपल्या पुस्तकांत डोकें खुपसलें.

नलीच्या त्या मृदु व नम्र बोलण्यानें बाईचा फणकारा जरा कमी झाला. नलीनेंही मग, आपण जत्रेंतून लौकरच कसें निघालों, वाटेंत एके ठिकाणीं थोडा मुक्काम करून आतां पुढल्या गावांत रात्रीचा मुक्काम करण्यासाठीं कसे जात आहोंत तें सांगितलें. आणि अजून किती लांब आहे तें गांव असेंही त्यांना विचारलें.

बाईनींही गांव अजून आठ मैल आहे असें सांगून उघडलेला फराळाचा डबा, फिरकीचा तांब्या वगैरे आवरण्यास सुरवात केली होती. पण नलीची नजर तिकडे आतुरपणें लागलेली पाहून त्या जरा कुचंबल्या.

त्यांनीं वर पहातांच नलीनें परत एकवार त्यांना माफ करा म्हणून सांगून त्यांचा निरोप घेतला; व आजोबांचा हात धरून चालण्यास सुरवात केली. शेंपन्नास पाउलं ती गेली असेल नसेल तोंच त्या गाडींतील बाईनीं तिला हांक मारून मागें येण्यास सांगितलें.

'ये इकडे ये, पुढें ये आणखी '—त्या म्हणाल्या. 'कांहीं खा प्यायला हवं आहे का तुला ?'

'नको नको. दमलें आहे नुसती मी. आणि अजून बरंच आहे लांब मला वाटतं !' नली म्हणाली.

'नको नाहीं नी हवं नाहीं ! चल ये इकडे. तुमची नाहीं ना हरकत कांहीं म्हातारे बाबा ?'

आजोबांनीं नलीकडे पहात पहात बाईचे आभार मानले आणि कपाळा-वरचा घाम पुसला. बाईनीं त्या दोघांना खालीं गवतावरच थोडें फराळाचें काढून देऊन स्वस्थपणें फराळ करण्यास सांगितलें, आणि बसूनबसून भारावलेले आपले पाय जरा मोकळे करण्यासाठीं त्या थोड्या इकडे तिकडे फिरूं लागल्या. जरा वेळानें परत गाडीजवळ येऊन वर चढण्याच्या पायरीवर एक पाय ठेऊन त्या थोड्या उभ्या राहिल्या.

'ऐकलं का ? तें पुस्तक ठेवावं जरा बाजूला गडे आतां. इतकं काय मेलं त्या बुकांत आहे अगदीं !' बाई आपल्या यजमानांकडे वळून म्हणाल्या.

यजमानांनीं तिकडे न पाहतांच नुसतें 'हं काय ?' म्हणून केलें.

'त्या दोघांना घेऊं या का गडे आपल्या गाड्यांत ? फारीच गळलेलीं दिसतात बिचारीं. आणि बरं का, माझ्या मनांत एक विचार आला आहे.' बाई पुढें म्हणाल्या.

'त्या पोरीचा उपयोग करून घ्यायचा असेल. बाकी आहे, सुंदर आहे पोरगी. मोहक आहे मोठी !' यजमानानीं नलीकडे पहात उत्तर केलें.

'हो ! आपल्याला दिसतंय काय नेहमीं सौंदर्यावाचून ?' बाई उद्गारल्या. 'कलावान ना आपण ?'

'खरंच आहे नाहीं तरी. जगांत आहे काय सौंदर्यावांचून ? अहो, परमेश्वराचंसुद्धां 'सत्यं, शिवं, सुंदरं' असं वर्णन केलं आहे त्या दाढीवाल्या ऋषींनीं ! आणि मी सुद्धां नाहीं का —'

‘ पुरे, पुरे ! ’ ते पुढें काय बोलणार तें जाणून बाई घाईघाईनें म्हणाल्या आणि त्यांनीं आपल्या मानेला गोड वळसा दिला.

थोडावेळ कां होईना, पण आपल्या पायांची रखडंती आतां थांबली या विचारानें नलीला फार बरें वाटलें आणि तिनें आपला फराळ झटकन आटपून भांड्यांची साफसूफी केली, व तीं बाईंच्या ताब्यांत दिलीं. सर्व सामान जागच्या जागीं ठेवल्यावर बाईनीं नलीला आपल्या गाडींत घेतलें. तिचे आजोबा व बाईंचे यजमान यानीं पुढील गाडींत बैठक ठोकली आणि गाडीवान खालीं उतरून त्यांचे मागून चालूं लागला. बैलांच्या गळ्यांतील घुंगुरांचा आवाज परत तालबद्ध सुरू झाला.

---

*

# १२

सूर्यास्त झाल्यानें पृथ्वीवर काळोखानें आपलें साम्राज्य पसरण्यास सुरवात केली होती. वर आकाशांत प्रथम एक मग दुसरा अशा क्रमानें अनंत तेजोगोलकांनीं गगनमंडपाची निळी झालर दूर करून खालीं डोकावण्यास सुरवात केली आणि थोड्याच वेळांत तें आकाशमंदीर असंख्य तारकांनीं गजबजून गेलें.

गळ्यांतील घुंगुरांच्या तालावर बैल मुक्कामाच्या ओढीनें आतां जरा जलद पाऊल टाकूं लागले होते. इतका सर्व वेळ अगदीं स्तब्ध बसलेल्या यजमानीणबाईंनीं आपल्या आंगाची जरा चाळवाचाळव केली. आणि त्या नलीकडे वळून म्हणाल्या, ‘ आवडतं काग तुला हें असं भटकणं ? ’

‘ हो, आवडतं की बाईसाहेब. ’ नलीनें उत्तर दिलें.

‘ तुमचं पोरांचं ठीक असतं म्हणा. पण मला कीं नाहीं कंटाळा येतो याचा. रोज कांहीं तरी नवी गंमत असेल तर बरी असं वाटतं.’ बाई म्हणाल्या, ‘ तुमचं कांहीं तसं नाहीं. तुम्हांला पोरांना सगळंच नवीन; गंमतच प्रत्येक गोष्टींत. ’

नलीकडे पहात त्या परत जरावेळ स्वस्थ बसल्या होत्या, आणि मग एकदम कांहींतरी डोक्यांत आल्यासारख्या त्यानीं हात थोडा लांब केला व गादीखालून कापडाची एक गुंडाळी बाहेर काढून ती त्यानीं नलीच्या डोळ्यापुढें धरली व पेटींतील काडी ओढून उजेड केला.

‘ वाच पाहूं तें. काय लिहिलं आहे ? येतंना वाचतांना. ’

‘आनंदराव व अंजनीबाई जयवंत, यांच्या चित्रांचें प्रदर्शन,’ नलीनें वाचलें.

‘ आम्हींच तीं; मीच अंजनीबाई जयवंत, ’ काडी बाहेर फेकून बाई म्हणाल्या. ‘ याच्या नंतर आतां त्या भिकारड्या यमपुरीबरोबर नको जाऊं. ’

‘ मी ऐकलं आहे आपलं नांव. पण पाहिलीं नाहींत मी चित्रं कधीं. गमतीदार असतात कांहो तीं यमपुरीसारखीं ? ’ नलीनें विचारलें.

‘ गमतीदार ! ’ बाई एकदम चढ्या आवाजांत म्हणाल्या. ‘ आहे काय त्यांत पोरी ? दरिद्री मेलीं. भेसूर बाहुलीं तीं ! पण आमचीं चित्रं तशीं नाहींत. किती प्रशांत, आणि, काय म्हणतात तें—हो—प्रशांत आणि अभिजात ! गडबड नाहीं, धडपड नाहीं, तें खटखट करून दांत विचकणं नाहीं, आणि कांऽऽहि नाहीं. बोलतां जर आलं असतं त्यांना, तर तीं चित्रं असं मुळीं वाटलंच नसतं. आमच्या ह्यांच्या व माझ्या हातांत गूणच आहे तसा. जिवंत, अगदीं जिवंत—आतां बोलतील असं वाटतं मुळीं पाहिल्याबरोबर. ’

‘ खरंच ? पण आपल्याबरोबर आहेत आत्तां तीं इथें ? ’ नलीनें मोठ्या उत्सुकतेनें विचारलें.

‘ अग हो ! त्या पुढल्या गाड्यांत काय आहे मग ? परवांपासून आहे प्रदर्शन सुरू. तुम्हीं यालच बघायला म्हणा. तिकडेच येतांना तुम्हीं ? ’ बाईनीं विचारलें.

‘ अंहं ! मला नाहीं वाटत आम्हीं येऊंशी. ’

‘ म्हंजे ? जाणार तरी कुठें तुम्हीं मग ? ’ बाईनीं आश्चर्यानें विचारलें.

‘ नक्की नाहीं कांहीं, बाईसाहेब, ’ नलीनें अडखळत उत्तर दिलें.

‘ नक्की नाहीं ! काय बाई तरी. कुठें जायचं तें ठरलं नाहीं ? मोठा चमत्कारच आहे. काय करतां ग तुम्हीं ? जत्रेंत तुम्हांला पाहिलीं तेव्हांच मला वाटलं होतं. तुम्हीं कांहीं दिसत नाहीं तशीं ! ’

‘ खरं आहे बाई तें. गरीब माणसं आहोंत आम्हीं. पोटासाठीं भटकतों आहों अशीं ! ’ प्रश्नाच्या त्या अनपेक्षितपणानें नली अडखळत म्हणाली.

‘ जास्तच गोंधळांत टाकते आहेस मला तूं पोरी ! ’ तिच्याकडे आश्चर्यानें पहात अंजनीबाई म्हणाल्या. ‘ भिकारी तर नव्हत ना तुम्ही ? ’

‘ जवळ जवळ ! ’ नलीनें सुसकारत उत्तर दिलें.

‘ अगबाई ! काय तरी एकेक ! कुणाला खरं तरी वाटेल का. आणि वाचतेसही चांगलं तूं. नि लिहितांही येत असेल ना ? ’

‘ हो येतं बाईसाहेब. ’

‘ बाई, बाई ! कहरच झाला आतां ! आणि मला मेली श्री सुद्धां नाहीं पुरती काढतां येत. ’ अंजनीबाई उद्गारल्या.

गाडींत कांहीं वेळ शांतता पसरली. तिच्या खिन्न मुखाकडे पहात अंजनी-

बाई कसला तरी विचार करीत होत्या. शेवटीं मनाचा कांहींतरी निश्चय झालासा दिसला त्यांच्या. आपलें डोकें गाडीच्या पुढल्या पडद्याच्या बाहेर काढून त्यांनीं गड्याला कांहीं तरी सांगितलें. आणि गडी आनंदरावांच्या गाडीकडे गेला व जरा वेळानें परत येऊन त्यानें अंजनीबाईस यजमानांचा निरोप सांगितला. बाईनीं आनंदानें टाळी वाजवल्यासारखें केलें; आणि त्यानीं गड्याला त्या म्हातारेबुवांना आपल्या गाडींत पाठविण्यास सांगून, ‘ तूं जरा मागून चालत ये ’ असें त्यास फर्माविलें.

‘ या आजोबा, बसा असे पुढच्या बाजूला. तुमच्या नातीला कांहीं काम-धंदा देऊं का मी ? सांगा. तुमची हरकत नसेल, तर करीन प्रयत्न काहीं. ’

‘ मला नाहीं सोडवणार तिला. माझं म्हाताऱ्याचं काय होईल मग ? ’ आजोबांनीं घाबरून उत्तर केलें.

‘ आतां काय लहान आहांत का काय तुम्हीं. ’ बाई जरा रागानेंच म्हणाल्या.

‘ आतां नाहीं बाईसाहेब जमायचं त्यांना तें. अगदींच परावलंबी झालेत ते आतांशा. त्यांना नका असं बोलूं बाईसाहेब. मोठी मेहेरबानी आहे तुमची. पण अगदीं पृथ्वीचं राज्य जरी दिलं कुणी आम्हांला, तरी नाहीं सोडणार मी त्यांना ! ’ जणुं काय आत्तांच त्यांना कोणी दूर नेणार होतें, अशा कल्पनेनें ती आपल्या आजोबांना घट्ट धरून म्हणाली.

तिच्या या उत्तरानें अंजनीबाई थोड्या बुचकळ्यांत पडल्या, व कांहीं वेळ कोणीच बोललें नाहीं.

रातकिड्यांचा किर्र आवाज आतां जोरानें कानांवर येऊं लागला. मध्येंच एकादा तित्तिर पक्षी ‘ तित्तिर, तित्तिर ’ असा कांहींसा आवाज करीत गाडीवरून उडून जात होता. पूर्वेकडे जरा उजळूं लागलें. आणि लौकरच वद्य पक्षांतील अर्ध चंद्रबिंब झाडांच्या आडून डोकावूं लागलें.

‘ तुम्हांलाही करतां येईल थोडं काम, करायचं असलंच तर ! ’ शांततेचा भंग करून अंजनीबाई परत बोलूं लागल्या. ‘ या चित्रांवरची मातीबिती झटकायची, कुठें बाजार हाट करायचा किंवा असंच दुसरं कांहीं तरी. तुमच्या नातीचं काम जरा वेगळं आहे. चित्रांचीं वर्णनं करून सांगायचीं प्रेक्षकांना तिनें. खरं म्हटलं म्हंजे जरूर नाहीं त्याची. पण असतात ना

कित्येक माणसं अडाणी. अगदीं ओ म्हणतां ठो कळत नाहीं त्यांना ! त्यांना मेल्यांना सारं कांहीं सांगावं लागतं. मी शिकवीन सारं तिला. आतां माझ्या-सारखं जमायचं नाहीं म्हणा तिला. पण होईल तयार. आहे चुणचुणीत तशी. मलाहि म्हंजे जरा मोकळा वेळ मिळेल. हल्लीं कसं अगदीं बांधल्या-सारखं झालं आहे. आमचे हे कांहीं बघायचे नाहीं तिकडे. एकदां काम संपलं कीं तीं चित्रं आणि मी. असंच असतं हो पुरुषांचं ह्या ! बरं, पण काय सांगत होतें तर ? हो; काम कांहीं मोठंसं कठीण नाहीं. राहायचंही असतं मोठ्या गावांतूनच. येणारे जाणारे लोकही हलकट नसतात. बघा विचार करून. परत परत नाहीं येत वेळ अशी. '

एवढ्या लांबलचक बोलण्यानें बाईंना जरा थकवा आला. श्वास घ्यायला त्या थोड्या थांबल्या; कपाळावरील घाम जरा पुसल्यासारखा केला आणि त्या मग मुद्याच्या गोष्टीकडे वळल्या.

' मात्र एक हो बाई ! पगाराचं नाहीं आजच कांहीं सांगतां येणार. कसं काय जमतं तें पाहिल्यावर मग बघूं. आतां दोघांना जेवाखायला व राह्यला जागा बिगा देऊं आम्ही. आमच्या सारखंच होईल सर्व कांहीं. दुसऱ्या कोणासारखं नाहीं. आपला एका वेळणीवर तीन तऱ्हेचा भात ! मला नाहीं आवडत तसलं. आमच्या इकडे आपलं सगळ्यांना सारखं. '

बाई थोड्या थांबल्यावर नलीनें आपल्या आजोबांकडे प्रश्नार्थक नजरेनें पाहिलें. त्यांनीं संमतिदर्शक आपली मान हलविली. बाईंनीं परत त्यांच्याकडे पाहून विचारलें, ' मग काय ठरलं ? आहे का कबूल ? '

' होय बाईसाहेब. फार उपकार आहेत तुमचे. ' नलीनें उत्तर केलें.

' कांहीं वाईट नाहीं व्हायचं तुमचं. खात्री असूंदे अगदीं ! ' बाई आनंदानें उद्गारल्या.

गाडी आतां गावांत शिरली होती. जवळ जवळ मध्यरात्र झाल्यामुळे सर्व गाव शांतपणें झोंपी गेला होता. कुत्र्यांच्या भुंकण्याशिवाय दुसरा कसला आवाज कानांवर येत नव्हता. प्रदर्शनाची जागा आतां खुली असणं शक्य नसल्या-मुळें धर्मशाळेजवळच मुक्काम करण्याचें गाडीवाल्यांनीं ठरविलें; आणि धर्मशाळेच्या आवारांत त्यांनीं गाड्या सोडल्या.

आजोबांच्या झोपण्याची व्यवस्था करून नली बाहेर आली. चंद्र आतां

डोक्यावर आला होता. त्याचा मंद धूसर प्रकाश सगळीकडे पसरला होता. आणि त्या मंद चंद्रप्रकाशांत एक प्रकारचं उदासरम्य असं वातावरण सर्वत्र पसरलं होतं. हवेंतही आल्हाददायक गारवा आतां आला होता, आणि कुठें तरी फुललेल्या रातराणीचा मादक सुगंध वाऱ्याच्या मंद झुळुकीबरोबर हवेंत दरवळत होता.

नली जरा बाहेर येऊन रस्त्यावरील कमानीजवळ उभी राहिली. आणि उल्हसित अंतःकरणानें त्या रम्य चंद्रप्रकाशाची शोभा पहात होती ती. बरीच जुनी दिसत होती ती कमान. कमानीवरील दोन फुटके सिंह रस्त्यावरून जाणारा येणारांकडे जणुं पहात स्वस्थ बसले होते. रस्ता आतां बहुतेक निर्मनुष्य होता. किती लोकांची ये–जा या सिंहांनीं पाहिली असेल, असा विचार तिच्या मनांत आला. इतक्यांत भिंतीच्या रस्त्यावरील सांवलींतून कोणी तरी बाहे पडलें. त्या आकृतीकडे लक्ष जातांच ती एकदम चमकली. चिरपरिचित होती आकृती ती. विसरणं शक्यच नव्हतं तिला. भैरवनाथ कोरडेच होता तो!

रस्ता अरुंदच होता थोडा तो. आणि समोरील घरांची सांवलीही रस्त्यावरच पडली असल्यामुळें, जमिनींतूनच एकदम वर आल्यासारखा वाटला तिला तो. कमानीच्या सांवलीच्या बाजूला थोडी आंतच ती एकदम झाली. हातांतील काठी फिरवीत तिच्या समोरूनच तो पुढें गेला. चार पावलें गेल्यानंतर तो जरा मागें वळला आणि त्यानें तिच्या दिशेकडे पाहूनच काठी हलविली.

'कोणाला, आपल्याला का बोलावतो आहे तो?' या विचारानें तिची गाळणच उडाली. आणि कुणाला तरी ओरडून हांक मारावी कीं लपलेल्या जागेंतून पळ मारावी याचा तिला पळभरच विचार पडला. तोंच दुसरी एक आकृती तिला येतांना दिसली. डोक्यावर ट्रंक घेऊन येत असलेला एक छोकरा होता तो.

'चल, ए पोरट्या पाय उचल जरा.' भैरवनाथ म्हणाला.

'जड आहे बगा फार साहेब. मान बी मोडून ग्येली बगा माझी.' तो पोरगा म्हणाला.

'मान मोडली पण तंगड्या नाहींना मोडल्या!' भैरवनाथ खेंकसला. 'चल उचल पाय. विलासपूर मेल चुकेल माझी. मग संभाळ!' आपली काठी उचलून तो परत गुरगुरला.

त्याच्या त्या आविर्भावानें घाबरून जाऊन पोरानें आपलें पाऊल उचललें. दृष्टीच्या टप्प्यांतून ते पार दिसेनासे होऊन त्यांच्या पावलांचा आवाजही ऐकूं येत नाहींसा झाल्यावर ती घाईघाईनें आपल्या आजोबांजवळ आली. भैरवनाथाच्या नुसत्या चाहुलीनें सुद्धां ते दचकतील अशीच जणुं काय भीति वाटली तिला. पण अगदीं शांतपणें झोंपले होते ते !

कशाला आला असेल बरं इकडे तो. आपल्या शोधाला तर नव्हे ? मग आतां कुठें गेला तो. इथं राहणं धोक्याचं तर नाहींना ? पण विलासपूरच्या गाडीबद्दल बोलला नाहीं का तो ! म्हणजे आज तरी तो इथून गेला असला पाहिजे. इथें राह्यला हरकत नाहीं म्हणजे कांहीं दिवस. दुसरीकडे कुठें जाणं जग धोक्याचंच नाहीं का ? पण आजोबांना मात्र नाहीं कांहीं सांगतां कामा. उगाच काळजी करीत बसतील ते मात्र आणि जास्तच घाबरतील. पण या सर्व विचारांनीं तिच्या मनाचा मात्र अतीशय गोंधळ उडाला. तिचं मन कांहीं केल्या शांत होईना. एक दोन नव्हे, असंख्य भैरवनाथ जणुं काय आपल्या भोंवतीं वावरत आहेत असें तिला वाटलें. त्याच्या बोलण्याचे ते राकट सूर अजूनही तिच्या कानांत दुमदुमत होते. सभोंवारची छाया सुद्धां आपल्याकडे पाहून भेसूर हास्य करीत आहेसं वाटलं तिला, आणि तिनें आपल्या डोक्यावरून घट्ट पांघरूण घेऊन कानांत बोटें घातलीं !

* * * *

अंजनीबाईच्या सुरू झालेल्या वावरानें व चहाच्या भांड्यांच्या आवाजानें नली जागी झाली. तिनें बाहेर पाहिलें तो चक्क ऊन पडलें होतें. धडपडतच ती उठली व ओशाळेपणानें अंजनीबाईंना मदत करूं लागली. ' अग इतकं ओशाळायला नको कांहीं. मुद्दामच नाहीं उठवली मी तुला. कित्ती गाढ झोंप लागली होती ! ' तिच्याकडे पहात त्या हंसत उद्गारल्या.

चहापानानंतर अंजनीबाईच्या केशभूषेस सुरवात झाली. सुंदर लांब सडक होते त्यांचे केस. काळ्या तुकतुकीत रेशमाचे धागेच जणूं. आरशांत पहात मोठ्या चपळाईनें त्या केसांतून कंगवा फिरवीत होत्या नी त्यांच्या हाताची व मानेची मोठी डौलदार हालचाल होत होती. हळुवार हातानें आपल्या केसांचा सुंदर आंबाडा बांधला त्यांनीं; आणि शेवटीं केंसावरून झटकन फणी फिरवून

अंबाड्यावर एक झुलतें शेवंतीचें फूल खोंचलें व तोंडबींड स्वच्छ धुवून त्यानीं कपडे पालटण्यास सुरवात केली.

'हें बघ, मी जरा पुढें होतें. गाड्या येतील मागून सामान घेऊन. तूं ये त्यांत हं.' असें म्हणून अंजनीबाईनीं आपली शाल अंगावर घेतली. केंसावरून परत एकदां हलकेच हात फिरवला, कानांवरील केंस नीट चांचपले, कासोट्याची पट्टी नीट केली नी मागें मुरडून सारं कांहीं ठीक आहे ना म्हणून त्यांनीं पाहिलें. आणि 'बरं आहे ना ग ?' असें नलीला विचारून त्या बाहेर पडल्या.

प्रदर्शनाची जागा जवळच होती. गाड्यांतील सामान भराभर खालीं काढून गड्यांनीं जागेची जरा साफसुफी केली. दारावर व आंत इकडे तिकडे झालरी, पाट्या फडकूं लागल्या. आनंदराव सामानाच्या पेट्या उघडून आंतील चित्रें हलकेच बाहेर काढून तीं नीट मांडण्यांत गढून गेले. अंजनी-बाईही अंगावरील शाल फलकावीत गड्यांना हाकलीत होत्या. जिभेची टकळी सारखी चालूच होती त्यांच्या. शेवटीं लागलं एकदांचं सर्व सामान त्यांच्या मनासारखं, आणि त्यांनीं आनंदरावांकडे पाहून मंदस्मित केलें.

पौराणिक व ऐतिहासिक अनेक स्त्री पुरुष–व्यक्ती दिसत होत्या तिथें. त्या चित्रांची ढब, पोषाक, दागदागिने वगैरे गोष्टींकडे मोठ्या कौतुकानें पहात नली बाह्य जगाला पार विसरून गेली होती. सर्वच नवीन होतं तिला. आणि चित्रं होतींही खरोखरीच सुंदर. आनंदरावांचा हात धरणारा दुसरा कोणी कलावंत नव्हता त्या प्रांतांत.

' आवडलीं ना सारीं तुला ? ये तर मग आतां इकडे. त्यांची माहिती देतें मी तुला ' अंजनीबाई म्हणाल्या.

'ती अशोकवनांतील सीता. तिच्याकडे पाहात त्या अक्राळ विक्राळ राक्षसी पहा कशा बसल्या आहेत पहारा करीत. किती चिंतामग्न पण मोहक दिसते आहे सीतामाई ! तो पहा पलीकडला अहिल्योद्धार. शिळेंतून निघणारी अहिल्या किती सुंदर आहे बघ. तो रामही कसा तिला हात धरून उठवतो आहे. आणि तें तिकडे गोदोहन चाललं आहे यशोदेचं. किती पण तन्मयतेनें यशोदा पहाते आहे कृष्णाकडे ! पण धार पडते आहे बाजूलाच. त्या गाईची उभी राहाण्याची ऐट तर बघ. मान वळवून चाटते आहे कशी

वांसराला ! तो पहा कीचक वध. ती मोकळ्या केंसाची सैरंध्री बघ किती उत्सुकतेनें पण भेदरलेल्या नजरेनें पहात आहे. तुटून पडले आहेत ते भीम कीचक अगदीं एकमेकांवर; नाहीं ! आणि ही बघ इकडे आग्र्याहून सुटका. किती घाबरलेला दिसतो आहे तो संभाजी ! हे बाजीराव साहेब ! दिल्लीचा रोंख धरून चालले आहेत शहावर. हातानें कणसें चोळून खात आहेत आणि मुद्रा दिसते आहे विचारमग्न. ' अंजनीबाईची रसवंती सराइत धंदेवाईकाच्या कौशल्यानें सारखी वहात होती. मधेंच त्या थांबत आणि नलीला ' समजलं ना ' म्हणून विचारीत. तिच्याकडून आपले शब्द दोन तीनदां म्हणून घेत आणि आपली गाडी परत चालू करीत. नलीच्या हुशारी-वर खूष होत्या त्या. त्या पोरीनेंही फार लवकर आत्मसात केलं तें सर्व.

प्रदर्शनास सुरवात झाली. नलीची गाडी चालू झाली. नीटनेटका पोशाक करून हातांतील बारीक छडीनें चित्रें दाखवीत चपळाईनें इकडे तिकडे ती हिंडत होती. प्रेक्षकांचीही गर्दी वाढूं लागली. तिच्या बालमूर्तीचें व वर्णन कौशल्याचें लोकांना मोठें कौतुक वाटत होतें. येणाऱ्या जाणाऱ्या बायका तर अतीशयच खूष दिसल्या. तिच्या मोहक चेहऱ्याकडे पहात कौतुकानें त्या आपसांत कुज-बुजत होत्या. एकादा दुसरा जास्त पैसाही तिच्या हातावर कोणी ठेवीत होत्या.

पैशांच्या पेटीजवळ बसलेल्या अंजनीबाईचें या सर्व प्रकाराकडे लक्ष होतें. मधेंच खूष होऊन, दाराजवळ बसलेल्या आपल्या पतिराजांकडे त्या अभि-मानानें दृष्टी टाकीत होत्या. ' कां कसा केला सौदा. कशी आहे परीक्षा माझी ? ' असेंच जणूं काय त्या विचारीत होत्या त्यांना.

संध्याकाळीं नली जरा थकूनच जाई. पण अंजनीबाई मोठ्या प्रेमानें तिची विचारपूस करून तिच्या खाण्यापिण्याची काळजी घेत. स्वतःप्रमाणें दुसऱ्याच्याही सुखाची त्या नीट काळजी घेत. हाताच्याही त्या तशा उदार होत्या. नलीला परस्पर मिळणाऱ्या पैशांची त्यानीं कधींच मागणी केली नाहीं. आजोबाचीही व्यवस्था तिच्या डोळ्यासमोरच नीट होत असल्यामुळें नली पण आनंदी दिसत होती. मध्येंच एकादे वेळेस भैरवनाथाची तिला आठवण होई. वाटेंत कुठें भेटणार तर नाहींना असेंही तिला वाटे. आणि मग मात्र ती अतीशय अस्वस्थ होई !

---

# १३

सुखलाजी स्ट्रीटवर होतें नानूजी पितळ्यांचें घर. छोटेंसेंच आणि बरेंच जुनेंही होतें तें. फुटपाथला लागून असल्यामुळें खिडकीच्या तावदानावरील धूळ जाणारा येणाऱ्यांच्या कपडयामुळें आपोआपच साफ केली जात असे. तावदानाच्या आंत अत्यंत जीर्ण झालेला असा हिरव्या रंगाचा पडदा लोंबत होता. त्याच्या जीर्णपणामुळें फुटपाथवरील लोकांना आंतील सर्व व्यवहार नीट दिसायला कांहींच अडचण पडत नसे. पण आंतही कांहीं विशेष बघण्या सारखं नव्हतं. मध्यभागीं एक डुगडुग हलणारें टेबल, त्यावर बांधलेल्या कागदांचीं कांहीं मळकीं पुडकीं, शाईचीं पुटें चढलेली ओगल्यांची दौत, दोन चार टांक, पेन्सिली वगैरे लेखन साहित्य एकमेकांशीं असहकार पुकारून पसरलें होतें! टेबला जवळील खुर्च्या, टेबलापेक्षांही त्यांचें तेथील अस्तित्व प्राचीन होतें असें सांगत होत्या, तर जमिनीवरील मच्छरदाणी वजा सतरंजी व भिंतीचा रंग या एकंदर कुटुंबाला साजेशींच होतीं. एक प्रकारचें कुबट वातावरणच दिसत होतें सर्वत्र पसरलेलें. दारावरील ' नानूजी पितळे, वकील हायकोर्ट, ' अशी एक पाटी व तिच्या खालीं ' पहिला माळा भाड्यानें देणें आहे; फक्त सड्या लोकां करतां ' अशी एका कार्डबोर्डची पाटी यांत मिळविली कीं, वकीलसाहेबांच्या अचेतन ऑफिसचें वर्णन पुरें झालें. फक्त दोनच सजीव व्यक्ती तेथें नेहमीं बसलेल्या दिसत, आणि त्यांचीच ओळख आपणाला करून घ्यायची आहे.

नानूजींचें वय चाळीशीच्या आंत बाहेर असावें. उंची मध्यम, बांधा आडवा, पोट पुढें डोकावलेलें, फुगीर हनुवटी, किंचित् बसकें नाक आणि त्या खालीं फाल्गुनरावी टोकदार मिशा; नाकाच्या शेंड्यावर बसलेला चष्मा, डोक्यावरील तुळतुळीत टक्कल व मागें अर्धचंद्राकृती विरळ घेरा; अंगांत कडक कॉलरचा मळका शर्ट, त्यावर तपकिरी रंगाचें जाकीट आणि वारंवार नाकांत

कोंबतांना गळलेल्या तपकिरीची त्यावरील नक्षी; असा होता एकंदर त्यांचा थाट. त्यांच्यापुढेंच त्यांची कारकून, घरमालकीण, बाजारमास्तर, बिलक्लार्क अशीं अनेक कामें करणारी बहीण बाबलीबाई बसली होती. भावाप्रमाणेंच कज्जल वर्णी होत्या त्या. अंगानें किरकोळ व दिसण्यांत पुरुषी घाटाच्या. नाकाचा शेंडा तरारून उभारलेला आणि त्यांत लाल खड्याची चमकी. तोंडाची जिवणी फाजील रुंद असल्यामुळें नेहमीं तोंड विचकलेल्याच दिसत त्या. ओंठही जाड व खालीं लोंबलेले व विडयानें नेहमीं रंगलेलेच असायचे. केंसांचा घट्ट, तटाटून बांधलेला गांठीवजा अंबाडा आणि वरती चांदीच्या आंकडयाची फौज, नेहमीं खडी असलेली, अशी असायची. चेहऱ्याची व वर उचललेल्या डोळ्यांची ऐटच अशी कीं कोणीही पुरुष 'भीमरूपी महारुद्रा' करीतच चार हात लांब पळावा ! आणि यामुळेंच बाबलीबाईंना कोणीही नरवीर त्यांचें पाणिग्रहण करून त्यांना सनाथ करण्यासाठीं, त्यांच्या वयाची तिशी उलटून गेली तरी अद्याप मिळाला नव्हता !

अस्मानी रंगाचें रेशीमकांठी पातळ नेसल्या होत्या त्या आज; आणि अंगांत एक लांब हातांचा पोलका. गळयांत एक मोठी रायणमाळ आणि त्याच्याखालीं एक लॉकेट छडा. आपल्या भावासमोर बसून एक बिल तयार करीत होत्या त्या. दोघेंही कांहींवेळ स्वस्थपणें आपापल्या कामांत गर्क होतीं.

'झालं कारे नानू तुझं'? त्यानीं डोकें वर करून वकील साहेबांस विचारलें.

'झालं असतं, तूं जरा हातभार लावला असतास तर.' नानूजी म्हणाले.

'मी ना, झालंच मग! पण तूं कारकून ना ठेवणार आहेस?' बाबली-बाई म्हणाल्या.

'हो हो! ठेवणारच आहे नाहीं तरी, बरं बाईसाहेब!' नानूजी टांक तोंडांत धरून धोतर जरा घट्ट करीत म्हणाले. 'पण एवढं का पुन्हा पुन्हा चिडवतेस?'

'पण नानू, असा प्रत्येक पक्षकार जर तुला आपला माणूस ठेवा म्हणून सांगायला लागला, तर मग चंबूगबाळंच हवं उचलायला तुला,' बाबलीबाई म्हणाल्या.

'पण आहे कोण दुसरा पक्षकार तसा, सांग पाहूं. हं सांग. सांगना!' नानूजी उद्गारले.

'चेहऱ्या मोहऱ्यांतना ? नाहींच मुळीं. अहाहा ! काय बाळ आहे पण ! नुसतं गाळीव !' बाबलीबाईनीं सुनावलें.

पण नानूजींनीं उठून एक बिलबुक घेतलें होतें आणि त्याचीं पानें ते भराभर उलटीत होते. 'पहा, पहा ताईबाई, भैरवनाथ कोरडे, भैरवनाथ कोरडे, भैरवनाथ कोरडेच पसरला आहे सगळीकडे. एकही पान कोरडं नाहीं त्याच्याशिवाय ! आतां, यांचं नको ऐकूं तर कुणाचं ? काढून टाकावी लागेल कीं पाटी, 'वकील हायकोर्ट. अं ?'

'पण मला माहीत आहे तुकारामबोवांची मेख. मग एक माणसाला कसं नाक खुपसतां येईल एकसारखं ! तुला काय वाटलं, मला कळत नाहीं होय ?' जरा वेळ थांबून ते पुढें म्हणाले.

'असं कसं ? 'वकील हायकोर्ट' ना तुम्हीं !' हेटाळणीच्या स्वरांत बाबलीताई म्हणाल्या. 'पण मी आपली सांगून ठेवतें, माझ्यावांचून कांहीं चालयचं नाहीं तुझं ! मग मात्र नको येऊं तोंड वेंगाडीत, ताई, ताई, करीत. आपला विचार कर नीट.'

दोघंही मग जरा वेळ तोंड मिटूनच आपलें काम करीत होतीं, आणि तो वाद तेवढ्यावरच थांबला. पण तेवढ्यांतच खिडकींतून कोणाची तरी आंत सांवली पडली आणि पडदा दूर करून भैरवनाथ आत डोकावला.

'दार उघडा नानूजी. मी आणला आहे नवा कारकून बरोबर. कारकून पण कारकून आहे; अगदीं तुमच्या लायक ! दार उघडा झटकन. दुसरा एकादा बगळ्या वकील लुंगावील नाहींतर त्याला.' भैरवनाथ म्हणाला.

नानूजींच्या मनावर कसलाच आघात झाला नाहीं. पण मोठा आस्थेवाईक चेहरा करून त्यांनीं लगबगीनें दार उघडलें व आपल्या पक्षकाराला आंत घेतलें. आणि त्याच्या मागोमागच धोंडोपंतांची स्वारी आंत शिरली.

'याच त्या बाबलीताई !' दारांतच भैरवनाथ पंतांकडे पहात पुटपुटला. 'हिच्याशींच लग्न करायला हवं होतं मला. अनुरूप जोडा झाला असता अगदीं आमचा. किती मोहक ऐट आहे, यंव ! स्त्रीचं सौंदर्य आणि पुरुषाचा कणखर-पणा. मोठा खुमासदार मसाला आहे हा ! आः ! माझी—माझी बाबली !' एकाद्या नाटक्याप्रमाणें तिच्याकडे पाहात त्यानें आपली मान तुकवली.

त्याचा हा लघळपणा बाबलीबाईच्या अर्धवट कानावर आलाच. 'कुठे

उभे आहांत याची शुद्ध आहेना भैरवनाथ!' भैरवनाथाकडे पहात त्या म्हणाल्या.

'पंतांचा कांहीं तसा गैरसमज नाहीं व्हायचा,' भैरवनाथ हळूच त्यांना म्हणाला. आणि मग त्यानें आवाज जरा चढवला. 'हे धोंडोपंत, नानूजी. माझे दिल्जान दोस्त! चांगल्या सुखवस्तु कुटुंबांतील आहेत ते. पण तारुण्यांतील उच्छृंखलपणामुळें गुरफटले थोडे लफडयांत. आणि म्हणून झाले आहेत कबूल ही हलकी कारकुंडी करायला—हलकी, पण या कचेरींत अत्यंत मानाची बरं का, नानूजी. काय सुंदर वातावरण आहे हें इथलें!'

या सुंदर वातावरणाबद्दल जरा शंका येऊनच कीं काय पंतांनीं एकदोन जोरदार शिंका दिल्या आणि ते भैरवनाथाकडे चकित मुद्रेनें पाहूं लागले.

'हां. आनंद झाला मला, शेटजी. फार आनंद झाला! मोठे नशीबवान आहेत धोंडोपंत, आपल्या सारख्यांशीं स्नेह असायला. नाहीं पंत, तुम्हांला मोठा अभिमान वाटत असेल नाहीं शेटजींचा स्नेह असायला?' नानूजी बोलले.

'आज सोमवार नाहीं का नानूजी? पंतांना कामाला लागायला कांहीं हरकत नाहीं.' भैरवनाथ म्हणाला.

'हो, हो! आपली इच्छा असली तर अगदीं ताबडतोब. माझी मुळींच ना नाहीं शेटजी.' नानूजीनीं उत्तर केलें.

'आपल्या बाबलीताई देतील त्यांना कायद्याचे धडे. मोठा मजेशीर अभ्यास आहे तो. आणि बाबलीताई म्हणजे काय, किडा आहेत त्यांतल्या! सिव्हिल कोर्ट मॅन्युअलसुद्धां फिक्कं आहे त्यांच्यापुढें. खांडेकरांचा सगळा न्यायाश्रय उभा आहे त्याच्यापुढें हात जोडून.' भैरवनाथ उद्गारला.

'सुंदर! सुंदर! शेटजी, बहार केलीत बुवा. मोठी मेजवानी आहे आपलं भाषण म्हणजे.' कौतुकानें त्याच्याकडे पहात नानूजी म्हणाले.

'पण यांची बसायची सोय, नानूजी?' सभोंवार पहात भैरवनाथ म्हणाला.

'काहो? आपण दुसरी आणूं कीं एकादी खुर्ची. हो! कारण त्यांच्यासारखा गृहस्थ आणि आमचेकडे येईल अशी कल्पना सुद्धां नव्हती आम्हांला, आपण सुचवीपर्यंत शेटसाहेब. पाहूं आतां एकादी आडगिऱ्हाइकी खुर्ची. तोंपर्यंत इथेंच बसतील कीं माझ्या जागेवर पंत. कारण मी तर सकाळचा वेळ बहुतेक बाहेरच असतों. आणि—'

‘ जरा इकडे या नानूजी. वेळ आहे का थोडा. एक दोन शब्द बोलायचे आहेत मला आपल्या व्यवहाराबाबत.’ भैरवनाथ म्हणाला.

‘ वेळ आणि तो आपल्या करतां नाहीं, असं कसं होईल शेट साहेब ? थट्टा करतां होय माझी. हा बघा निघालोंच. अहो मलत्या सलत्याला का मिळते संधी आपला लाभ घेण्याची !’ डोक्यावर पागडी चढवीत नानूजी म्हणाले.

भैरवनाथानें आपल्या त्या लाळघोट्या मित्राकडे पाहून रांकट हास्य केलें, आपला पवित्रा पालटला व एकाग्रा प्रेमवीराच्या रुबाबांत त्यानें बाबलीबाईचा निरोप घेऊन आणि धोंडोपंतांकडे जरा मान हलवून पाहून तो बाहेर पडला. बाबलीबाईनीं अगदीं थंड व निर्विकार मुद्रेनेंच भैरवनाथाचा नमस्कार स्वीकारला.

धोंडोपंत स्तिमित मुद्रेनें टेबलाजवळ उभे राहून आपण एखादा विचित्र प्राणीच पहात आहोंत कीं काय अशा आविर्भावानें, बाबलीबाईकडे पहात होते. दाराबाहेर पडलेला भैरवनाथ एवढ्यांतच फुटपाथवरील खिडकींतून आंत डोकावला, आणि पिंजऱ्यांतील जनावरांकडे पहाणाऱ्या प्रेक्षकाप्रमाणें त्यांच्याकडे पहात त्यानें आपले दांत विचकले. पंतांनीं त्याच्याकडे निर्विकार मुद्रेनें पाहून तो परत दिसेनासा झाल्यावर, आपल्या जागेवर खिळल्यासारखे अनिमिष नेत्रांनीं बाबलीबाईकडे एकाग्र चित्तानें पहात ते उभे होते. शेवटीं एक दीर्घ निश्वास टाकून त्यांनीं आपला कोट काढून खुर्चीच्या पाठीला लावला; आणि बाबलीबाईकडे पहातच त्यांनीं आपल्या हाताच्या बाह्या मागें सारल्या व ते खालीं खुर्चीवर बसले.

बाबलीबाई आपल्या कामांत गढून गेल्या होत्या. खालीं मान घालून त्यांचें काम चाललें होतें. एकदोन तासांत त्यांचें काम संपलेंसें दिसलें. कारण त्यांनीं आपल्या हातांतील टांक खालीं ठेवला व वर पहात त्यांनीं ऐसपैस आळस दिला. पोलक्याच्या खिशांतील एक विडा त्यांनीं तोंडांत कोंबला, आपल्या पुढील कागद गोळा करून ते लाल फितीनें नीट बांधले आणि त्या खोलीबाहेर पडल्या.

धोंडोपंतही मग हातपाय ताणून खुर्चीवर मागें टेकले, आपल्या हाताचीं बोटें कडाकड मोडलीं, व टेबलावर बोटांनीं ताल धरीत ‘ प्रणय तरंगासवें विवश वाहतों जवें ’ या ओळी गुणगुणण्यास सुरवात केली. इतक्यांत परत दार वाजलें व बाबलीबाई आंत डोकावल्या.

‘ मी जरा बाहेर जाऊन येतें हं, ’ पंतांकडे पाहून त्या म्हणाल्या.

‘ बरं आहे बाईसाहेब. ’ पंत उद्गारले.

‘ आलाच जर कोणी एवढ्यांत तर मी बाहेर गेलें आहें म्हणून सांगा नी त्याचं कामबीम ठेवा लिहून, बरं का ? लौकरच येईन मी परत म्हणा. ’ बाबलीबाई म्हणाल्या.

पंत बरं म्हणून खालीं बसले. जरा वेळ त्यांनीं वर दृष्टी लावली. परत उठून खोलींत दोनचार फेऱ्या मारल्या व परत आपल्या जागेवर स्थानापन्न झाले.

‘ नानूजींचा कारकून बनलों मी एकंदरींत. नानूजी पितळ्यांचा कारकून ! आणि त्यांच्या या बहिणाबाईचा पण, नाहीं का ? वाः वा ! आणखी काय काय होणार आतां तुम्हीं पंत, अं ? ’ पंत उद्गारले.

जरा वेळ स्वस्थ बसून ते पुढें बोलूं लागले. ‘ भैरवनाथानें दिला इथें मला डकवून अं ! आमच्या काकूबाईनीं आमचा तनखा तोडला. आणि वर सागतात काय, “ अरे धोंडू नवं विल केलं आहे मी. ” आणि केलं काय तर आम्हांला ठेवलं त्वंपुरा करीत. वाः ! नाहीं कुठें पत ना खिशांत एक दमडा. घर मालकांनींही त्यांतच घेतला सूड. दिली नोटीस——जागा खालीं करो ! आपण तरी काय करणार कपाळ. नशीबाचं चक्करच फिरलं, तिथं काय ! पण तेंच नेईल परत वर. ठीक आहे. मीहि पण सूडच घेतों त्याचा. बस्स ! खाना, पीना और मजा करना, धोंडोपंत ! ’

कारकुनाच्या आवेशानेंच त्यानीं आपल्या सभोंवतालील जगाचें बारकाईनें निरीक्षण करण्यास सुरवात केली. पेट्या, कपाटें उघडून पाहिलीं, कागद उलटे सुलटे केले, कागदावर आपलें नांव शाईनें खरडलें आणि शेवटीं याचा कंटाळा येऊन खुर्चीवरच पाय लांब करून परत गुणगुणण्यास सुरवात केली.

पंतांचें हें गुणगुणणें चालू असतानांच घरासमोर एक गाडी उभी राहिली व कोणीतरी बाहेरील दार जोरानें ठोठावलें. पण ती कांहीं ऑफिसची घंटा नव्हती आणि म्हणून पंतानीं तिकडे दुर्लक्ष केलें.

दारावरील ठोठावण्याचा आवाज अधीकच मोठ्यानें होऊन दार उघडलें गेलें आणि कोणीतरी धाड धाड आवाज करीत जिन्यानें वरच्या खोलींत गेलें.

' या कोण दुसऱ्या बावलीताई,' असा पंत विचार करीत आहेत तोंच ऑफिसच्या दारावर कोणींतरी टक् टक् केलें.

' या या. एवढं टक् टक् कशाला करायला पाहिजे !' पंत उद्गारले.

' माफ करा हं ! पण आपण येऊन जरा जागा दाखवाल का तेवढी ?' किनऱ्या आवाजांत कोणीतरी विचारलें.

पंतांनीं त्या आवाजाच्या मालकिणीकडे नीट न्याहाळून पाहिलें. एक गबाळ पोरगेली आकृति उभी होती तिथें. तिच्या हातातोंडाशिवाय कांहींच दिसलं नाहीं त्यांना. त्या मळकट कपडयांत अगदींच किरकोळ दिसत होती तिची आकृती. जशी कांहीं रांगायला लागल्यापासूनच कामाला जुंपल्या सारखी दिसत होती ती. पंतांच्या आश्चर्याइतकीच ती पण त्यांना भ्यायलेली दिसत होती.

' मला नाहीं माहीत जागा बिगा कांहीं. परत यायला सांगा त्यांना जरा वेळानें.' पंत म्हणाले.

' अहो पण दाखवाना जागा तेवढी.' ती परत अजीजीनें म्हणाली. ' दहा रुपये भाडं आहे त्या जागेचं आणि जेवणखाण, आंघोळ कपड्यांसाठीं बारा रुपये आणखी देणार आहेत ते.'

' वा ! गंमतच आहे मोठी. आणि तूं कोण स्वयंपाकीणबाई कीं काय ?' पंत जागेवरून उठत म्हणाले.

' होय कीं. स्वयंपाकपाणी, धुणंबिणं, झाडसारव सुद्धां मींच करतें कीं साहेब,' ती मुलगी म्हणाली.

' हं हं ' असा कांहींसा आवाज करीत, आपला टाक कानावर ठेऊन त्या नवीन बिऱ्हाडकरूकडे मग पंत निघाले.

आपल्या हातांतील मोठ्या अवजड ट्रंकेचा जिन्याच्या पायऱ्यांवर धाड धाड आवाज करीत तो नवीन बिऱ्हाडकरू व त्यांचा छकडेवाला वर जिना चढत होते. ट्रंकेच्या होणाऱ्या प्रत्येक आवाजाबरोबर ' चक् चक्, जरा हळू हळू ' असें ते पुटपुटत होते. जिन्याला बसणाऱ्या प्रत्येक हादऱ्याबरोबर तो खालीं येईल कीं काय असेंच वाटत होतें पंतांना जणूं काय.

त्यांच्या त्या ' चक् चक् ' ला तो नवीन गृहस्थ कांहींच उत्तर न देतां वर जात होता. आणि दार उघडून ट्रंकेचें तें अवजड धूड आंत ठेवल्यावर

हाशहुश् करीत तो त्या ट्रंकेवर बसला व शांतपणें खिशांतील रुमालानें त्यानें आपल्या तुळतुळीत डोक्यावरील घाम पुसण्यास सुरवात केली.

'आपल्याला जागा बघायची आहे नाहीं का?' पंतांनीं त्या नवागतास विचारिलें. 'सुंदर आहेत खोल्या मोठ्या. आणि येथून त्या–आपल्या ह्याचा –देखावा मोठा सुरेख दिसतो. आणि शिवाय त्या–ह्याच्या कोंपऱ्याच्या अगदीं जवळच आहेत.'

'भाडं काय ह्यांचं?' नवागत गृहस्थानें विचारलें.

'बारा रुपये महिना पडेल आपल्याला. आणि चौदा रुपये जेवणखाण वगैरे, वगैरे.' त्या मुलीनें सांगितल्यापेक्षां दोन दोन रुपये जबादच पंतांनीं त्यांना सांगितले.

'ठीक आहे. कबूल आहे आम्हांला.'

'आणि हें पहा. आधीं सांगितलेलं बरं. काय, कीं भाडं आगाऊ द्यावं लागेल आणि कमीत कमी दोन महिने तरी जागा घेतली पाहिजे.' पंत पुढें म्हणाले.

'दोन महिने!' पंतांना आपादमस्तक न्याहाळीत ते गृहस्थ म्हणाले, 'अहो दोन वर्षें. दोन वर्षं राहूं आम्हीं इथें! ठरला करार. हें भाडं या महिन्याचं!'

'हें पहा. माझं नांव कांहीं नानूजी नाहीं आणि—'

'पण म्हणतो कोण लेकाचा आहे म्हणून? मीही पण नानूजी नाहीं. मग त्याचं काय?' ते गृहस्थ उद्गारले.

'नाहीं म्हटलं, घराच्या मालकांचं नांव आहे नानूजी.'

'अस्सं! आनंद आहे! वकीलाला साजेसें आहे. ए छकडेवाला, तूं गेलास तरी चालेल; आणि आपणही.'

धोंडोपंत त्या नवीन बिऱ्हाडकरूकडे आ करून, टक लावूनच पहात राहिले. पण त्यांचें तिकडे लक्षच नव्हतें. त्यांनीं स्वस्थपणें गळ्याभोंवतालचा गळपट्टा काढला आणि खालीं वांकून बुटाचे बंद सोडण्यास सुरवात केली. अणि मग खिडकीचें पडदे लावून पलंगावर जरा काळोख केला व खिशांतील रास्कोप घड्याळाला किल्ली देऊन त्यांनीं पलंगावर पाय लांब केले. 'मी बोलावीपर्यंत मला कोणी त्रास देऊं नका. आणि पावती द्या आणून त्याची.' ते म्हणाले आणि पांच मिनिटांतच त्यांच्या घोरण्याचा लयबद्ध आवाज ऐकूं येऊं लागला!

---

# १४

तो नवीन बिऱ्हाडकरू आल्याला आठ दहा दिवस झाले होते आतां. पण स्वारीनें अद्याप मालक किंवा त्याच्या भगिनी यांच्याशीं एका अक्षराचीही देवघेव केली नव्हती. त्यांचें अस्तित्वच घरांत नसल्यासारखें वागत ते. त्यांचा सगळा कारभार आपल्या पंतांमार्फतच चाले. ‘ पंत एकादा चांगला परीट द्या कीं पाहून, ’ किंवा ‘ पंत तुमच्या या आळीला चांगलंसं हॉटेलच नाहीं का हो, ’ अशी त्यांची कांहींतरी रोज पंतांजवळ कामगिरी असायची. पण गृहस्थ कांहीं तसा त्रासदायक नव्हता. उठायचाही लौकर, रात्रींही बाहेर भटकायचा नाहीं कुठें, किंवा आरडाओरड, आदळ आपट कांहीं नाहीं. पण सर्व व्यवहार मात्र पंतांमार्फत. दुसरा कोणी आसपासही फिरकलेला चालत नसे त्यांना. पंतांचेंही महत्त्व आपोआपच चढलें त्याचेमुळें घरांत.

याच बरोबर पंतांच्या दैवानें त्यांना दुसरेकडूनही अगदीं अनपेक्षित हात दिला. बाबलीबाईचें लक्ष पंतांकडे हळूहळू आतां वळूं लागलें होतें. पंतांची ती नेहमीं हंसतमुख मूर्ती, वागण्या चालण्यांतील रुबाब, पोशाकांतील नखरा, बाईच्या पुढें पुढें करण्याची संवय, मदत करण्याची तत्परता आणि थोडा लघळपणा बाबलीबाईच्या मनावर परिणाम करूं लागला होता. आणि त्यांच्याही मनाची अवस्था ‘ असतांना यति संनिध, किंचित सुख वाटतें’ अशी होऊं लागली. पंतांच्या अस्तित्वानें ऑफिसचें वातावरण त्यांना आतां अधीक सुखकर वाटूं लागलें आणि पंत जवळ नसले तर एक प्रकारची गोड हुरहूरही वाटूं लागली त्यांना.

पंतांच्या धूर्त डोळ्यांतून त्यांच्यांत हा क्रमाक्रमानें पडणारा फरक सुटला नाहीं. आणि त्यांनींही आपलें घोडें मोठ्या कुशलतेनें दामटण्यास सुरवात केली. वकील-साहेब ऑफिसांत नसले कीं त्यांच्या बोलण्यांत हुकमी छटा येऊं लागली व गोड गोड बोलून आपलें कामही ते थोडथोडें बाबलीबाईच्या आंगावर टाकूं लागले.

पण एका गोष्टीचें मात्र पंतांना अजून गूढ उमगलें नव्हतें. त्या पोरसवदा स्वयंपाकीण बाईची मूर्ती अद्याप त्यांच्या नजरेस फारशी पडत नसे. त्या नवीन बिऱ्हाडकरूंच्या जागेकडे दिवसांतून एकादे वेळ जातांना मात्र दृष्टीस पडायची ती. बाकी इतर वेळीं 'दिसलि पुनरपी गुप्त जहाली' असाच प्रकार असायचा. वेशही तसाच नेहमीं मळकट, आणि कसातरी गुंडाळलेला. स्वयंपाकाच्या खोलीच्या बाहेर वावरतांना ती कधीं दिसत नसे. दिवसभर त्या अंधेऱ्या धुरकंडींत बसलेली. जरा मोकळी हवा घ्यायलासुद्धां नाहीं ती कधीं बाहेर दिसायची. कधीं कुठें जाणं नाहीं नी येणं नाहीं. तिची वास्त-पुस्तही घेतलेली कोणी दिसली नाहीं पंतांना.

'गूढच आहे हें मोठं.' पंत आपल्याशींच विचार करीत होते. 'बाबली-ताईंना विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हो. आम्हींच उतरायचे मर्जीतून नाहीं तर! लहरी आहे स्वारी.' बाबलीबाईकडे पहात त्यांचा विचार चालू होता.

बाबलीबाईनीं आपला टाक खालीं ठेवला आणि त्या पंताकडे वळून म्हणाल्या, 'जाऊन येतें हं मी पंत. नानू कांहीं एवढ्यांत येणार नाहीं घरीं. जाऊं नका कुठें हं मी येईपर्यंत. आलेंच मी इतक्यांत. कांहीं फारवेळ नाहीं लागणार.'

'बरं, बरं! या कीं. मला कांहीं घाई नाहीं.' त्यांच्याकडे पहात पंत म्हणाले. बराच वेळपर्यंत ते दाराकडे पहात होते, आणि कान स्वयंपाक घराकडे लागले होते.

'आत्तां जर पाहतां आलं आपल्याला कसं वागवतात त्या पोरीला, तर काय मौज होईल.' पंत आपल्याशींच पुटपुटले आणि खिशांत हात घालून त्यांनीं खोलींत एकदोन फेऱ्या मारल्या.

थोडया वेळानंतर पंतानीं आपल्या फेऱ्या थांबवल्या आणि एक सिंगल घेण्यासाठीं त्यानीं हळूच दार उघडलें. त्याचवेळीं बाबलीबाई स्वयंपाक घराच्या पायऱ्या उतरत होत्या. त्यांना पाहून पंतानीं हळूच टाळी वाजवली आणि चोर पावलांनीं त्यानीं आपलाही मोर्चा स्वयंपाक घराकडे वळवला.

माजघरांतही खूप काळोख असल्यामुळें पंतांचें काम फार सुलभ होतें. स्वयं-पाक घराच्या अर्धवट उघडया दाराच्या फळी आडून त्यानीं आंत दृष्टी टाकली.

अतीशय गलिच्छ जागा दिसत होती ती. सूर्यप्रकाशाचा कवडसाही

आंत फिरकूं शकत नव्हता तिथें. सगळीकडेच धुरकट व काळं मिचकूट वातावरण आणि त्यांतच जमिनीच्या ओलसरपणाचाही भपकारा मारीत होता. भिंतीपासून मुळींच वेगळं न दिसणाऱ्या कपाटाचें कुलूप काढीत बाबलीबाई पाठमोऱ्या उभ्या होत्या. ती पोरगेली स्वयंपाकीण खालीं मान घालून जवळच उभी होती. कपाट उघडून आंतून एक शिळी भाकरी, दोन मिरच्या आणि थोडी भाजी बाबलीबाईनीं बाहेर काढली व त्या जिनसा बाईला दिल्या. ' हं, हें घे. आणि आटप लौकर. बसशील नाहींतर रवंथ करीत. आहे ना भाजी पानांत. दिसते आहे ना ? मग आतां जाहिरात नको लावीत जाऊं, नुसती कोरडी भाकरी गिळायला लावतात म्हणून. आणि भाकरी नकोना आणखी आतां. भरलंना पोट ? नाहींतर बसाल पुन्हा डागोरा पिटीत, खायलासुद्धां पोटभर घालीत नाहीं म्हणून ! '

तो भुकेला जीव मात्र आपल्या पहारेकऱ्याकडे पहात पण एक दोन कांहींच न बोलतां, मुकाट्यानें ते तुकडे गिळीत होता !

* * * *

कांहीं दिवस सुरळीत चालला होता त्या नवीन बिऱ्हाडकरूचा कार्यक्रम. मग मात्र त्याच्या एकेक विक्षिप्त लहरी बाहेर पडूं लागल्या. त्या गृहस्थांना राणीच्या बंगलेवाले, यमपुरीवाले, माकडवाले, डोंबारी वगैरे लोकांना बोलावून आणून त्यांचे खेळ पहाण्याचा मोठा नाद दिसला. त्या रस्त्यावरून या लोकांपैकीं कोणीही जाण्याची खोटी कीं हे बुवा दडदड करीत जिन्यावरून खालीं धांवत यायचे, त्या लोकांना हांका मारून आणायचे आणि मग एकच तमाशा व्हायचा सुरू. त्यांतल्या त्यांत यमपुरीवाल्यांकडे जास्त ओढा दिसत असे त्यांचा. त्यांच्या खेळांचा कार्यक्रम कुठें लागला कीं हे त्यांना आपल्याकडे बोलावून आणायचे आणि मग त्यांना चहापाणीही व्हायचें त्यांच्या जागेंत. काय त्या लोकांजवळ ते गृहस्थ गप्पा मारीत तें कोणालाच कळत नसे. पण या नेहमींच्या कटकटीमुळें नानूजींचें डोकें मात्र अगदीं उठण्याची वेळ आली. आणि कडाडलेच मग एक दिवस ते आपल्या बहिणीजवळ.

' काय शिंचा त्रास आहे या बोवांचा. बिऱ्हाड पण बिऱ्हाड मिळालं आहे अगदीं. झाली कटकट सुरू आतां. ती वाजतेच आहे तिकडे जाहिरात त्या यमपुरीची. भरलीच कंबक्ती आतां ! ' नानूजी त्रासिक स्वरांत म्हणाले.

' त्यांत कसली कंबक्ती ? तुझं आपलं कांहीं तरीच. ' बाबलीबाई म्हणाल्या.

' खरंच तें ! मोठा गोड आवाज होत असतो नाहीं त्या लगे ढोल, लगे ढोल चा. कामाकडे जरा लक्ष लागेल तर शपथ. हा पहा लागलाच जिना धडधडायला. ' नानूजी वैतागून बोलले.

आमच्या पंतांना मात्र हे सर्व प्रकार पहाण्याची मोठी गंमत वाटे. कानावर टांक ठेऊन खुशाल बाहेर मौज पहात उभें राहणें हें मानमोडून काम करण्यापेक्षां त्यांना अधीक पसंत होतें. बाबलीबाईनाही त्यांनीं आपल्या बाजूला ओढून घेतल्यामुळें त्यांची बाजू अधीकच सुरक्षित झाली होती.

रस्त्यासमोर आवाज होऊं लागल्याबरोबर—आजही त्यांनीं जागेचा कबजा घेतला आणि बाबलीबाईही त्यांच्या बाजूला रखमाईसारख्या उभ्या राहिल्या. वरील बिऱ्हाडकरू तर पुढील गर्दीत जाऊन केव्हांच उभे राहिले होते.

खेळ संपला आणि नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्या गृहस्थांनीं यमपुरीवाल्यांना वर बोलाविलें. वर खिडकींत उभे राहून त्यांनीं शेजारीं चहाची ऑर्डर दिली. आणि एकच यमपुरीवाला वर येतांना पाहून ते ओरडले, ' अहो, तुम्हीं एकटेच नाहीं. तुमच्या त्या जोडीदारालाही पण बोलवा वर. '

जावें न जावें याबद्दल त्या दोघां यमपुरीवाल्यांत प्रथम मतभेद दिसून येत होता. पण शेजारच्या हॉटेलांतून चहाच्या कपबशा वर चालूं लागलेल्या पाहतांच दोघांचींही पाउलें झपाझ्यानेंच जिन्याकडे वळलीं. पण हे तर आपले त्रिंबकराव आणि टिल्लोपंत !

ते वर गेल्याबरोबर वरील गृहस्थानें त्यांच्यापुढें दोन खुर्च्या सारल्या आणि त्यांस बसण्यास सांगितलें. टिल्लोपंत व त्रिंबकराव अनिश्चितपणें एकमेकांकडे कांहीं वेळ पहात होते. शेवटीं मोठा धीर करून खुर्च्यांच्या टोकावरच ते जरा टेकले. अवघडल्यासारखेच बसले होते दोघे.

' उन्हातान्हांत बरंच हिंडावं लागत असेल नाहीं तुम्हांला ? ' चहाचे पेले त्यांचे पुढें करून त्या गृहस्थानीं विचारलें.

' टिल्लोपंतानीं थोडें हंसून नुसती मान हलवूनच होकार दर्शविला. आणि त्रिंबकराव नुसते हुंकारले.

' जत्रा, बाजारांतून सुद्धां जातां ना, तुम्ही ? कां नुसते गावोगांवच हिंडतां ? '

‘ हो जत्रासुद्धां हिंडतों कीं साहेब. हा सगळा मुलूख घातला आहे साहेब पायाखालीं. ’ टिल्लोपंतानीं उत्तर केलें.

‘ पुष्कळ लोकांना भेटलों आहें मी तुमच्या. पण विलासपूर प्रांत हिंडलेला नाहीं गाठला मला अजून कोणी. ’ ते गृहस्थ म्हणाले.

‘ हा तर आमचा हंगाम त्या बाजूला हिंडायचा. त्याच बाजूनें आलों कीं आम्ही आतां साहेब. ’ टिल्लोपंत म्हणाला.

‘ थोडा चहा घ्या कीं आणखी. एक कपानें काय झालं. ’ त्यांच्या कपांत चहा ओतीत ते गृहस्थ म्हणाले.

‘ पुरे, पुरे कीं साहेब. ’ आपला कप टिल्लोपंताच्या अगोदर पुढें करून त्रिंबकराव म्हणाला. ‘ फार त्रास होतो बघा साहेब या प्रवासाचा आम्हांला; आणि विशेपतः मला. कुठेंही गेलं तरी आपला या त्रिंबकरावाचा त्रास कांहीं संपत नाहीं, साहेब. ’

‘ हो ! होतो त्रास तसा. आणि झोंपाही काढतो त्रिंबकराव ! ’ आपले डोळे मिचकावीत टिल्लोपंत उद्गारला.

‘ हं. हाण टोला ! संवयच ती तुला. नी लेका, मला नाहीं त्या म्हाताऱ्याला आणि त्या पोरीला नीट सांभाळतां आली, तर तूं काय उजेड पाडलास ? तुझ्याही डोक्याला बसते कीं ही टोपी. अगदीं घट्ट माझ्या सारखीच ! ’ त्रिंबकरावानें टोला हाणला.

‘ जाऊं द्या तें. यांच्या समोर कशाला आपला वाद ? ’ टिल्लोपंत साळसूदपणें म्हणाला.

त्यांचे यजमान हा वेळपर्यंत अगदीं स्वस्थ बसले होते. पण त्या म्हाताऱ्याचा आणि त्या पोरीचा उल्लेख आल्याबरोबर त्यानीं आपले कान टवकारले. आणि जवळ जवळ अधीरपणानेंच ‘ तुम्हांलाच शोधीत होतों मी इतके दिवस. बरी गांठ पडली तुमची. कुठें आहेत तीं दोघं ? ’ असें त्यानीं विचारलें.

‘ कोण साहेब ? ’ त्रिंबकरावाकडे पहात अडखळतच टिल्लोपंतानें विचारलें.

‘ ते वृद्ध गृहस्थ आणि त्यांची छोटी नात ? तुमच्याच बरोबर होतीं नाहीं का तीं भुवनेश्वरीच्या यात्रेंत ? हं. बोला ! बोला ! फुकट नाहीं जाणार तुमची माहिती. इथपर्यंत पत्ता लागला आहे मला त्यांचा. पुढें कुठें गेलीं तीं दोघं ? कांहीं सांगूं शकाल काय तुम्हीं ? ’

' म्हटलं नव्हतं मी त्रिंबकराव तुम्हांला, कीं त्या आपल्या प्रवाशांचा कोणी तरी तपास करील म्हणून ? ' त्रिंबकरावाकडे पहात टिल्लोपंत म्हणाला.

त्या गृहस्थानें अत्यंत अस्वस्थ मनानें खोलींत फेऱ्या मारायला सुरवात केली. त्यांचा चेहरा निराशेनें ग्रासलेला दिसला.

' इथेंही निराशाच पदरांत आली म्हणायची ! हे लोक सांपडूनही अखेर फुकटच. परमेश्वराची मर्जी ! ' असें म्हणून त्यांनीं सुस्कारा सोडला.

' थांबा हं जरा. जान्या सर्कसवाल्याचं नांव ऐकलं असेल आपण कदाचित. जान्या सर्कसवाला. तो सांगत होता कीं त्या म्हातारेबुवांना त्यानें कोणत्याशा चित्रांच्या प्रदर्शनाबरोबर पाहिलं होतं. त्याला असेल जास्त माहिती कदाचित, ' टिल्लोपंत म्हणाला.

' इथें आहे का तो या गांवांत. अं ? सांगा लौकर. ' त्या गृहस्थानें अतीशय अधीरतेनें विचारलें.

' आज नाहीं आहे. पण उद्यां येईल साहेब. आमच्याच बरोबर उतरतो तो. ' टिल्लोपंतानें प्रत्युत्तर केलें.

' ताबडतोब घेऊन या त्याला, इथे आल्याबरोबर. ही तुम्हांला चिरिमिरी थोडीशी. एकेकच रुपया आहे दोघांना. पण जर ते लोक सांपडले मला तुमच्यामुळें, तर खूष करीन तुम्हांला ! दहा दहा रुपये देईन प्रत्येकाला ! जा. उद्यां या आता. पण अवाक्षरही उच्चारूं नका हं कोणापाशीं. तुम्हांला सांगायला नकोच म्हणा. हं. तुमचा आतां पत्ता सांगा पाहूं आणि जा. '

ते दोघे निघून गेल्यावरही ते गृहस्थ अत्यंत अस्वस्थ मनानें खोलींतल्या खोलींत जोराजोरानें फेऱ्या मारीत होते. खालीं बाबलीबाई व पंत, यांच्या एवढं आंगांत कशानें आलं आहे याचाच अचंबा करीत बसलीं होतीं !

# १५

प्रिय वाचक, आपल्या किशाला सोडल्याला आपल्याला बरेच दिवस झाले नाहीं ? वागळे वकीलांच्या दाराशीं बागवान पतिपत्नींना रामराम ठोकतांना पाहिलें होतें आपण त्याला. त्यांच्याकडेच नौकरी पकडली होती त्यानें आतां. मालक मालकिणींची तर खूप मर्जी होतीच त्याच्यावर. पण त्यांच्या त्या अडेल तट्टाशींही त्याची दोस्ती जमली होती चांगली. त्याच्याजवळ तो अडेलतट्टू अगदीं सरळ सुतासारखा असे. बागवानांच्या कुटुंबांतीलच बनला होता तो एक. आणि याच बरोबर घरांतील बायजेच्याही मनांत तो आतां थोडा थोडा गुदगुल्या उत्पन्न करूं लागला होता.

नेहमींप्रमाणें आजही किशा मालकांना घेऊन वागळे वकीलांकडे गेला होता. मालकांना खालीं उतरून गाडी जरा बाजूला घेत होता तो. इतक्यांत हरीपंत त्याला हांक मारीतच बाहेर आले आणि त्यांनीं किशाला वकील बोलावताहेत म्हणून सांगितलें.

किशाला अजूनही वागळ्यांची थोडी भीतीच वाटत असे. जरा भीतभीतच तो आंत जाऊन दारांत उभा राहिला आणि त्यानें वकील साहेबांस लवून रामराम केला.

'ये ये, आंत ये असा किसन.' वकील म्हणाले.

'हाच काय छोकरा तो ?' त्यांच्याजवळच बसलेल्या एका प्रौढ व स्थूल गृहस्थांनीं विचारलें.

'हं. हाच तो छोकरा. या माझ्या दाराशींच झाली याची आणि आमच्या या बागवानसाहेबांची ओळख. चांगला दिसतो छोकरा मोठा. आणि मला वाटतं तो जें सांगेल तें खरं मानायला कांहीं प्रत्यवाय नाहीं. पण विसरलोंच. हे आमचे अनंतराव बागवान. थोडी कामकाजाची माहिती घेण्यासाठीं इथेंच

काम करतात. हुशार, फार हुशार माणूस ! दोस्त आहेत माझे मोठे ते !' रेशमी हातरुमालानें आपला चेहरा पुशीत वकील म्हणाले.

'वा ! मोठा अलभ्य लाभच म्हणायचा !' ते स्थूल गृहस्थ उद्गारले.

'मेहेरबानी आहे आपली,' अनंतराव पुटपुटले. 'पण या किसनशीं बोलायचं आहे आपल्याला नाहीं कांहीं ?' ते पुढें म्हणाले.

'होय. कांहीं हरकत नाहीं ना ?'

'छे ! छे ! चालूं द्या आपलें.'

'वकीलसाहेब आपल्याला बाहेर जाण्याचं कांहीं कारण नाहीं.' त्या दोघांना बाहेर जाण्यासाठीं उठलेले पाहून ते स्थूल गृहस्थ म्हणाले.

'माझं काम कांहीं तसं गुप्त नाहीं. आणि या ऑफिसांत तर नाहींच नाहीं. हा किसन ज्या जरेपुराणेवाल्याकडे नौकरीला होता त्यांची थोडी माहिती हवी आहे मला. चांगले परिचित आहेत माझे ते. निकटचे आप्तच म्हणाना ! आणि हें पहा. गेलीं पुष्कळ वर्षे मी परदेशांतच राहतों आहें. त्यामुळें बोलतां चालतांना जर कांहीं चूक झाली माझ्याकडून, तर मला माफ करा हं आपण !'

'छे-छे ! अहो त्यांत कसली माफी. चालूं द्या आपलें.'

'त्यांच्या दुकानाच्या आसपास खूप तपास केला मी इकडे आल्या-नंतर. तिथेंच समजलं मला कीं हा छोकरा होता त्यांच्याकडे नोकर म्हणून. त्याच्या आईचं — जनाबाईचं काढलं बिऱ्हाड मग शोधून आणि केली चौकशी याची. आणि तो सांपडण्याची अगदीं जवळची जागा म्हणून त्यांनीं मला हा आपला पत्ता दिला, वकील साहेब.' ते स्थूल गृहस्थ म्हणाले.

आणि मग अतीशय अधीर होऊनच जणूं काय ते किशाकडे वळून म्हणाले, 'हें बघ, असा घाबरूं नको. त्याना कांहीं त्रासबीस द्यावा म्हणून नाहीं हं हा मी तपास करीत. अगदीं पार सोडून दे तशी कांहीं कल्पना असली तुझी तर आणि पूर्ण विश्वास ठेव माझ्यावर. खरी गोष्ट अशी आहे त्यांतली,' अनंतराव व वकील यांच्याकडे वळून ते म्हणाले, 'कीं, मोठी चमत्कारिक अवस्था झाली आहे माझी. मोठ्या आशेनेंच आलों मी या शहरांत. मनांत मोठीं गोड सुखस्वप्नेंच रंगवीत आलों म्हणाना.

पण इथें आलों तो मोठा धक्काच बसला या निराशेनें ! मला कांहींच तपास लागत नाहीं त्यांचा.पण तुम्हांला कोणाला जर कांहीं मदत करतां आली तर उपकार होतील मोठे माझ्यावर! मनावरील मोठी धोंड नाहींशी होईल माझ्या. कांहीं वाया नाहीं जाणार आपले श्रम. फूल ना फुलाची पाकळी, देईन कांहीं आपल्याला !'

त्यांच्या त्या सरळ व आर्जवी बोलण्यानें वकीलसाहेबही थोडे विरघळले. आणि 'आपण नको कांहीं काळजी करूं; आमच्याकडून जें कांहीं शक्य होईल तें आम्हीं करूं आपल्या करतां' असें घाइघाईनें त्यांनीं सांगितलें.

आणि नंतर मग किशाच्या उलट तपासणीस सुरवात झाली. नली तिचे आजोबा, त्यांची राहणी, रात्रीची भटकंती, नलीचं त्या भयाण जागेंत एकटं राहणं, म्हाताऱ्याचा आजार, भैरवनाथानें घेतलेला दुकानाचा ताबा आणि शेवटीं त्या दोघांचं गुप्त पलायन, या सर्वांविषयीं त्यांनीं किशाला अगदीं खोदखोदून विचारलें. किशानेंही शेवटीं, ती जागा आतां भाड्यानें द्यायची आहे आणि सुखलाजी स्ट्रीटवरील नानूजी वकीलांकडे त्याची अधीक माहिती मिळेल असें त्यांना सांगितलें.

'अं हं. ! विचारून नाहीं कळायची. मी तिथेंच राहतों हल्लीं,' आपली मान हलवीत ते स्थूल गृहस्थ म्हणाले.

'काय ? नानूजींच्या घरांत राहतां आपण !' नानूजींची त्यांच्या धंद्यांतील कीर्ति माहीत असल्यानें वागळे उद्गारले.

'होय. ती पाटी पाहूनच जागा घेतली मी ती. कुठेंही राहिलों तरी सारखंच आहे मला म्हणा. पण विशेषतः कांहीं लागला तपास तर तिथेंच जास्त लागेल या समजुतीनेंच घेतली जागा मी ती. कां—तुम्हांला मोठं चमत्कारीक वाटलं असेल नाहीं ?' ते स्थूल गृहस्थ म्हणाले.

'ज्याच्या त्याच्या मताचा प्रश्न आहे तो ! पण नानूजींचा लौकिक कांहीं विशेष चांगला नाहीं,' आपले खांदे वर उडवीत वागळे म्हणाले.

'असं ऐकतों खरं; पण जुनाच आहे तो लौकिक. जरा थोडे इकडे येतां का वकीलसाहेब ? कांहीं सांगायचं आहे थोडं.'

बराच वेळ मग त्या दोघांचं बोलणं चाललं होतं आंतल्या खोलींत. आणि दोघे बाहेर आले ते अगदीं चिरपरिचित व्यक्तींप्रमाणेंच.

'बरं, तूं जा आतां किसन. कांहीं लागली जरूर तर कळवतील तुला वकीलसाहेब.' पण कोणाजवळ यांतलं कांहींच बोलायचं नाहीं हं, मात्र,' असें म्हणून त्यानीं त्याच्या हातावर एक रुपया ठेवला.

किसननेंही मोठ्या अदबीनें त्यांना रामराम केला, आणि 'त्याची नका काळजी करूं साहेब. एक अक्षरही नाहीं बाहेर पडणार या तोंडांतून तुमच्या परवानगी शिवाय,' असें म्हणून व साहेबांना परत एकवार लवून रामराम करून तो बाहेर पडला.

आणि मग अनंतरावांना परत घरीं घेऊन जाण्याची वेळ होईपर्यंत, तो आईच्या घराकडे फिरकला सुद्धां नाहीं. आपल्या आईला व धाकट्या भावंडांना अगदीं खूष करून टाकायचा त्याचा विचार होता. मुळीं बातमीसुद्धां लागूं द्यायची नव्हती त्यांना अगोदर. पगार व्हायचा होता त्याचा उद्यां, एकदम तीन महिन्यांचा. काय काय बेत केले होते त्यानें त्या सगळ्यांना अगदीं खूष करायचे. सुट्टी पण होती मिळायची त्याला एक वेळची. आणि म्हणून छोट्या जग्याला घेऊन तो बाजाराला जाणार होता मोठ्या.

सगळ्याच गोष्टी कशा अगदीं जमून आल्या होत्या. या नवीन मालकांनीं कांहीं कपडेही घेऊन दिले होते त्याला नि शिवाय त्याचे पैसे कांहीं ते कापून घेणार नव्हते. म्हणजे पगाराचे पैसे आणि वर हे कपडे पदरांत. शिवाय आत्तांच एक रुपयाही पटकावला होता त्यानें चहापाण्यासाठीं. एवढे पैसे त्यानें अजूनपर्यंत कधीं पाहिले पण नव्हते. आणि आतां तर काय ते त्याच्या खिशांतच पडणार होते. आत्तांच आपला खिसा खुळखुळतो आहेसा वाटला त्याला. आणि शिवाय बायजाचा पण नव्हता का पगार व्हायचा उद्यां! आणि तिला पण सुट्टी मिळणार होती. जग्या, बायजा नी आपण. मोठी गंमत होईल नाहीं? तिची आई पण येणार आहे जनाबाईकडे उद्यां. मग काय चैनच चैन!

आणि मग हां हां म्हणतां तो दिवस कसा गेला नी सकाळ केव्हां झाली कांहीं कळलंसुद्धां नाहीं त्याला. भल्या पहांटे उठला त्या दिवशीं तो. बायजाही उठून लगबग वावरतांना दिसली त्याला. तिच्या त्या चपळ मूर्तीकडे पहात आणि तोंडानें हळूच शीळ घालीत, झपाझप संपवलें त्यानें आपलें काम. मालकिणीनें त्याला म्हटलंसुद्धां तसं. न्याहारीवरसुद्धां लक्ष नव्हतं त्याचं.

दुपारीं जेवण झाल्यावर मालकांनीं त्याला वर हांक मारून पगाराचे पैसे त्याचे हातांत ठेवले. खूष दिसले ते त्याच्यावर. ' जा किशा; सुटी आहे तुला आतां. असाच नीट काम करीत जा, बरं का. रात्रीं नाहीं आलास परत तरी चालेल. पण सकाळीं मात्र लौकर ये उद्यां हं. ' ते म्हणाले.

बायजाचं झालं आहे कीं नाहीं हें पहात तो बाहेर पडला. बायजाही आलीच बाहेर त्याच्या मागोमाग. हंसत बोलतच चाललीं होतीं तीं दोघें रस्त्यानें. वर ऊन अगदीं कडक पडलें होतें. पण त्याच्या अंतःकरणांत मात्र शीतल चांदण्याचा आनंद भरला होता! मालक मालकिणीच्या चांगुलपणाच्या गोष्टी करीतच तीं दोघें बायजाच्या घरीं येऊन पोंचलीं.

दारांतच उभी होती बायजाची आई. किती सुरेख दिसेल जोडा नाहीं या दोघांचा. या सुखद विचारानें तिच्या अंतःकरणाला गोड गुदगुल्या केल्या. भरल्या डोळ्यांनींच तिनें त्यांना आंत घेतलें.

स्वतःच्या मालकीच्याच घरांत बसलों आहोंत आपण असं वाटलं किशाला. त्याच्या चहापाण्यासाठीं आपल्या आईच्या भोंवतीं बायजा अगदीं भिरभिरत होती. सर्व कांहीं ठाकठीक होईपर्यंत धीर कसा तो नव्हता तिला., आई म्हणालीसुद्धां तिला, ' फारशी ग तैनात ठेवते आहेस किशाबापूंची ! आणि बायजानेंही ' इश्श, आई ! ' असं नुसतं उद्गारून मान वेळावण्या-पलीकडे कांहीं केलं नाहीं. गंमत वाटली किशाला मोठी.

चहापाणी लौकरच आटपून तिघंही मग जनाबाईकडे निघालीं. किशानें वर्दी लावलीच होती आपल्या आईजवळ त्यांच्या येण्याची. त्यामुळें त्याही सर्व कांहीं आटपून वाटच पहात होत्या त्यांची. आणि मग कित्ती बोलणी झालीं त्या दोघींचीं. जशा कांहीं जुन्या मैत्रिणीच होत्या त्या एकमेकींच्या. ' खरंच, पण आधीं कशी नाहीं झाली आपली ओळख ? चांगलं झालं असतं नाहीं तें मग ? ' जनाबाई म्हणाली.

' खरंच आश्चर्यच आहे नाहीं ? पण आतां काय—मुलांनींच दिली करून ओळख आपली. आणि अजूनपर्यंत दाद पण नाहीं हो आपल्याला लागूं दिली लबाडानीं. काय तरी पोरं ! ' बायजाच्या आईनें दुजोरा दिला.

' पण आई, जायचं आहे ना बाजाराला आपल्याला ? का आपलं इथेंच

बसायचं आहे गप्पा मारीत. नाहीं तर आम्हींच जाऊं आपलीं दोघं.' बायजाकडे पहात किशा म्हणाला.

'तर तर! म्हणे आम्हींच जाऊं. पण कायरे किशा, सर्कसलाच जाऊं या किरे आपण. अजूनवेरी कांहीं पाहिली नाहीं मी कशी असते ती.' जनाबाई म्हणाली.

आणि मग बायजानेंही त्याला होकार भरल्यामुळें सर्कसलाच गेलीं तीं सर्व. कोण प्रचंड गर्दी होती त्या तंबूपुढें. दामटीच वळली जवळ जवळ त्यांची आंत शिरतांना. जग्या तर ओरडलाच मोठ्यानें.

सर्वच नवीन होतें त्यांना तें दृश्य. केवढा तो विस्तीर्ण तंबू. काय त्या दिव्यांचा झगझगाट. आणि गर्दी तरी किती आंत लोकांची. जीव उडूनच गेला त्यांचा अगदीं. बावरलेल्या मुद्रेनेंच पहात होतीं तीं इकडे तिकडे. जग्या तर बॅंडच्या तालावर नाचायलाच लागला होता.

बॅंडवर आतां एक मंद गत वाजायला सुरवात झाली. तिसऱ्या घंटेचा 'खणाण् खणाण् असा आवाज तंबूंत खणखणला. सोत्कंठ उत्सुकतेनें सर्व प्रेक्षकांची नजर तंबूच्या आंतील प्रवेशद्वाराकडे वळली. आणि दारावरील तो तांबडा लाल पडदा दूर करून, तंग पोशाक केलेले पांच सहा जवान नी एक दोन छोकरे रंगणांत शिरून, प्रेक्षकांकडे हात पसरून त्यांनीं सर्वांना लवून अभिवादन केलें. त्यांच्या सिंगलबार वरील कामास सुरवात झाली आणि सर्कशीस रंग भरूं लागला. इतक्यांत आपली संकासुरी टोपी हवेंत उंच उडवीत व 'हो, हो' करीत विदूषकाची स्वारी आंत येऊन वेड्या वाकड्या उड्या घेऊन आणि शेवटीं खालीं डोकें वर पाय करून हवेंत सायकल फिरविल्या प्रमाणें तंगड्या हलवीत हातानें टाळ्या पिटूं लागली. पण हवेंत चाबकाचा काडकन आवाज होऊन, इतका वेळ हवेंत नाचणाऱ्या तंगड्या एकदम खालीं जमिनीवर आदळल्या. आणि प्रेक्षकांचा एकच हंशा पिकला! या पुढील 'रिंगमाश्टर, ओ रिंगमाश्टर, करीत चाललेल्या रिंगमाश्टर विदूषकांचा संवाद, जगूला मोठा मजेशीर वाटला. देहभान विसरून टाळ्या पिटीत होता तो. बायजाही मोठ्या तन्मयतेनें पहात होती सर्व आणि मधूनच किशाकडे एकादा लाजरा कटाक्ष टाकीत होती.

# छोटी नली

सिंह इत्तींच्या कामानंतर झालेल्या टाळ्यांच्या कडकडाटानें आमची सर्व मंडळी भानावर आली. आणि अतीशय आनंदित अंतःकरणानें तंबूच्या दारांतून तीं परत दाटीदाटीनें बाहेर पडलीं. सरळ घरींच जायचीं तीं. पण किशाच्या अंगांत आज पैशांचा कैफ चढला होता ! बाजूच्याच चहाच्या दुकानांत शिरला तो. आणि जवळच्या खुर्च्या पुढें ओढून त्यानें चार सिंगल, मस्का पाव व मिसळची ऑर्डर, एकाद्या कॉलेज कुमाराच्या ऐटींतच हॉटेलच्या पोऱ्यास सुनावली. पोऱ्यानेंही जरा चकित होऊनच सर्व माल झटकन या पावण्यांपुढें ठेवला. आणि एकाद्या सराइता प्रमाणेंच जग्यानें आपल्या पुढील मिसळीवर ताव मारण्यास सुरवात केली.

# १६

अष्टमीचं मंद चांदणं चहूंकडे पसरलं होतं. जिकडे तिकडे सर्व कांहीं निस्तब्ध, शांत असं वाटत होतं. नलीही अगदीं स्तब्धपणेंच झाडाच्या दाट छायेखालीं बसली होती. कांहीं तरी गंभीर विचार तिच्या चिमुकल्या डोक्यांत गर्दी करीत होते. थोडया फार निराशेनेंच ती आत्तापर्यंतच्या आपल्या आयुष्याचा आणि येणाऱ्या दिवसांचा विचार करीत होती. त्या आगामी काळाचं चित्र तिच्या कल्पनाचक्षूंना कांहीं सुखदायक दिसत नव्हतें. अलीकडे कांहीं दिवस, आपले आजोबा आपल्या पासून आस्ते आस्ते पण निश्चितपणें दुरावत आहेत, असें तिला वाटूं लागलं होतं. रोज संध्याकाळीं नी कधीं कधीं भर दिवसासुद्धां ते कोठेंतरी एकटेच बाहेर जात असत. त्यांच्या परत आल्यानंतर दिसणाऱ्या खंगलेल्या चेहऱ्यावरून आणि तिच्या पिशवींतून कमी होणाऱ्या पैशांवरून ते कुठें नी कशाकरतां जात असावेत हें ती पूर्णपणें समजून चुकली होती. पण तिनें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें तर राहोत पण तिला हळूहळू टाळायलाही त्यानीं थोडीफार सुरवात केली होती.

आणि याचाच तिला अतीशय विषाद वाटत होता. अशीच विचार करीत ती आणखी कितीवेळ बसली असती कोण जाणें. पण त्या दूर असलेल्या चर्च मधील पडलेल्या घडयाळाच्या टोल्यामुळें ती भानावर आली. आणि मनांत दाटून आलेल्या दुःखावेगास वाट देण्यासाठींच कीं काय तिनें एक दीर्घ निश्वास सोडला व तशीच भारावलेल्या अंतःकरणानें ती शहराकडे परत वळली.

शहराबाहेर असलेल्या मोकळ्या मैदानांतून वाहणाऱ्या लहानशा ओढ्यावरील लाकडी पुलाशीं ती आतां येऊन पोंचली होती. बाजूला असलेल्या कुंपणापलीकडे पेटलेल्या शेकोटीचा जाळ इतक्यांत तिच्या नजरेस पडला आणि ऐकूं आलेल्या शब्दांतील कोणाचा तरी परिचित आवाज आपल्या कानावर आला असें तिला वाटून ती थोडी चमकून उभी राहिली.

तिला नकळतच तिचीं पावलें त्या दिशेला वळलीं. तिच्याकडे पाठ असलेल्या व्यक्तीचा आकार तिच्या दृष्टीला पडतांच ती आश्चर्यानें वाटेंतच थबकली. क्षणमात्रच तिनें विचार केला आणि आपली शंका खोटी आहे या समाधानानेंच तिनें परत पाऊल उचललें.

पण याचवेळीं इतका वेळ जरा थांबलेलें संभाषण परत सुरू झालें आणि तोच परिचित आवाज परत तिच्या कानावर येऊं लागला. संभाषणांतले शब्द जरी तिला स्पष्टपणें ऐकूं येत नव्हते तरी त्या आवाजाबद्दल मात्र तिला आतां तिळमात्रही शंका उरली नाहीं.

शेकोटीसमोर बसलेली ती पाठमोरी व्यक्ती आतां उठून उभी राहिली होती. हातांतील काठीवर भार देऊन उभे राहण्याची त्या व्यक्तीची ती पद्धती, त्या आवाजा इतकीच तिला चिरपरिचित होती. तिचे आजोबाच होते ते !

मोठ्यानें त्यांना हांक मारावी असेंच प्रथम वाटलें तिला. पण त्यांच्या बरोबरील या व्यक्ती कोण, आणि इथें कशाला जमले होते ते सगळे ? कांहीं जबरदस्त शंका तिच्या मनांत आली व तिचें अंतःकरण थरारलें. अत्यंत सावधगिरीनें पावलें टाकीत त्या कुंपणाच्या आसऱ्यानें ती पुढें सरकली आणि कुंपणाजवळच्या झाडांच्या सावलींत आपलें आंग चोरून कांहीं आवाज न करतां त्या शेकोटीकडे ती पाहूं लागली.

शेकोटीच्या बाजूला एका झाडाला टेकून एक तालीमबाज माणूस उभा होता. आपले हात त्यानें छातीवर स्वस्तिकाकार धरले होते आणि आपल्या काळ्याभोर दाट भुंवयांखालून तिच्या आजोबांकडे व आपल्या दोस्तांकडे आळीपाळीनें तो पहात होता.

'तुम्ही चाललां होतां नाहीं का म्हातारेबुवा. घाई झाली होती तुम्हांला अगदीं जरा वेळापूर्वी. जा कीं, मालक आहांत आपण आपले !' आजोबांना उद्देशून तो म्हणाला.

'पार दरिद्री केला आहे मला तुम्हीं. अगदीं साफ लुबाडलं आहे आणि वरती हे टोले हाणताहांत. वेड लावाल मला अशानें,' त्याच्याकडे आळी पाळीनें पहात आजोबा म्हणाले.

त्या बदमाश कारस्थानी लोकांच्या तावडींत सांपडून अत्यंत असहाय बनलेल्या आपल्या आजोबांना पाहून नलीच्या अंतःकरणाचें अगदीं पाणी

झालें. आणि त्यांची नी आपल्या या भोळया आजोबांची गांठ कुठें नी कशी पडली याचा तिच्या चिमुकल्या डोक्याला कांहीं केल्या उलगडा होईना. पण संभाषण परत सुरू झाल्यानें ती कान देऊन नीट लक्षपूर्वक ऐकूं लागली. तेवढा एकच मार्ग खुला होता तिला.

' इतका नको ताणू म्हातारेबाबांना जमाल. तुला दुखवायचा नव्हता त्यांचा उद्देश. हं. म्हातारेबुवा, चालूं द्या. काय म्हणत होतां तुम्हीं ? ' काळोजी म्हणाला.

पण ते पुढें बोलण्याचें कांहीं लक्षण न दिसल्यानें जमालच परत बोलूं लागला. ' नशीबका चक्कर फिरण्याची आतां आली आहे वेळ, म्हातारेबुवा. समजलं का. अभी डरो मत. अरे यार डर तो पीछे रही. तुमचा खिसा जर खाली असेल तर आमची युगत ऐका. तुमची ती प्रदर्शनवाली बया पैसे पेटींत टाकून दार बंद नाहींना करीत ? तो अच्छा ! अभी तो बहोत ही सोपा काम. असा वखत नाहीं मिळणार बघा परत. तुमचा दोस्तार म्हणून सांगतों आम्ही तुम्हांला. आपला झाला काम कीं टाका पैसे परत पेटींत. काय काळोजी सच या नहीं ? ' काळोजीकडे डोळे मिचकावीत पहात जमाल जरा थांबला. आणि म्हातारा थोडा गुंगलेला पहातांच तो म्हणाला, ' काय मजा आहे ! आपल्याला तर बुवा तो रुपयांचा आवाज वेडच लावतो. छट ! इतके जवळ ! जरा हात लावायची खोटी कीं पडलेच तुमच्या खिशांत. बघा पुन्हां नाहीं येणार वेळ. चाललांत का काय तुम्ही पण ? '

' ठीक आहे, ठीक आहे. करतोंच तसं उद्या. ' आजोबा परत दोन पावलें मागें येऊन घाईघाईनें म्हणाले.

' शाब्बास. जीते रहो ! ' काळूजी व जमाल एकाच आवाजांत ओरडले.

' परमेश्वरा क्षमा कर मला ! सर्वसाक्षी आहेस महाराजा तूं. त्या पोरी-साठींच करतों आहेरे मी हें. क्षमा, क्षमा कर दयाघन मला ! ' असें आवेगानें पुटपुटतच चिंता, श्रम आणि स्वतःबद्दलची खंत यांनीं अगदीं जीर्ण, शीर्ण झालेली ती वृद्धमूर्ती काठीवर सर्व भार टाकीत आणि मोठ्या कष्टानें पाऊल उचलीत पुलाच्या रोखानें चालूं लागली. म्हातारा दिसेनासा झाल्यावर त्या बदमाषानीं मोठ्यानें हंसत एकमेकांच्या हातावर ' वाह, यार, गुरूकी फत्ते ! ' म्हणून जोरानें टाळी दिली.

हीच वेळ तेथून गुपचूप निसटण्यास सोईची असल्यानें नलीनें पावलांचा आवाज होऊं न देतां, दबत दबत कुंपणाच्या बाजूनें चालण्यास सुरवात केली. आणि पुलाच्या पायथ्याशीं येऊन एकवार मागें नजर टाकून ते दोघे दिसत नाहींत अशी खात्री झाल्यावर आंगांतील सर्व शक्ती गोळा करून आपल्या घराच्या दिशेनें तिनें धूम ठोकली.

दूर-दूर पळून जायला पाहिजे अगदीं! सगळयांत प्रथम जर कोणती गोष्ट करायला हवी असेल तर मोहाच्या या नरक द्वारापासून दूर, अगदीं अनंत कोस दूर जायला पाहिजे. हाच एक विचार वारंवार तिच्या त्या भेदरलेल्या मनांत सारखा उभा रहात होता. रस्त्यावर उपाशीं तापाशीं तडफडत मरायची पाळी आली तरी चालेल, पण इथें आतां एक क्षणभरही थांबतां नाहीं उपयोगी. त्या बदमाशांच्या मगरमिठींतून आजोबांना सोडवायचा तो एकच उपाय होता तिच्या हातांत. पण उद्यां रात्रीं म्हणून म्हणाले नाहीं का ते? मग एवढी कांहीं घाई नको करायला. अंहं! पण कुणी भरंवसा द्यायचा. आजच आली त्यांना लहर तर? आणि झाल्याच अंजनीबाई जाग्या मग? पण तो भयंकर विचारही सहन होईना तिच्यानें. अंतःकरणाच्या चिंधड्या उडविण्यास तेवढा एकच विचार पुरेसा होता तिला. चोरपावलांनीं धांवतच ती त्या खोलीकडे गेली आणि तिनें हळूच आंत डोकावून पाहिलें. दैवाचीच खैर! ते नव्हते आले तिथें; आणि अंजनीबाईही शांतपणें झोंपी गेल्या होत्या.

सुटकेचा एक निश्वास टाकून ती आपल्या खोलीकडे वळली, आणि अंथरुणावर तिनें आंग टाकलें. तिनें डोळे मिटले, पण झोंप—कशी यायची झोंप तिला? अगदीं काहूर माजलें होतें तिच्या मनांत. बारीकशा आवा-जानेंही दचकून ती इकडे तिकडे पाहूं लागे. मुळीं सहन होईना तिच्यानें तो विचार. त्याला दाबून टाकण्याच्या तिच्या फोल प्रयत्नांना न जुमानतां अगदीं उफाळून वर येत होता तो एकसारखा. धडपडतच उठली ती अखेर आंथरुणा वरून आणि तशीच पळत शिरली आजोबांच्या खोलींत. आणि अगदीं धसमुसळेपणानेंच त्यांचें मनगट धरून तिनें त्यांना बाहेर ओढलें.

'काय ग, नली!' भेदरून जाऊन त्यानीं विचारलें नी तिच्या त्या अस्ताव्यस्त मूर्तीकडे टक लाऊनच ते पहात राहिले. चुरगळले होते तिचे सर्व कपडे; सुंदर केंसांचा लोळागोळा झाला होता आणि कुंकवाचा फराटा.

'भयंकर, अगदीं भयंकर स्वप्न पडलं मला आजोबा. अयाइग !' आंग शहारल्यासारखें करून ती म्हणाली. 'हें पुन्हा पाहिलं आज मी तें स्वप्न. बाई ग ! तुमच्या सारखेच होते ते म्हातारे गृहस्थ. किती हळूच शिरले ते त्या खोलींत. आणि —आणि पेटीच पळवली त्यानीं त्या खोलींतली. पळा, पळा आजोबा, लौकर पळा—अगदीं !'

आजोबांचें सर्वांग थरथर कांपत होतें. तसेच गुढघ्यावर पडल्या पडल्या त्यानीं कुणाला तरी हात जोडले.

'मला नाहीं, मला नाहीं आजोबा. त्या देवाला सांगा आजोबा आपल्याला वांचवायला यांतून. भयंकर ! अगदीं डोळ्यासमोर दिसतं आहे मला सारं तें. चला, चला. इथें नाहीं रहायचं आतां मुळीं. पळभर सुद्धां नाहीं. प्राण गेला तरी सुद्धां नाहीं ! दूर, दूर जाऊं या कुठें तरी. चला, उठा ! उठा, आजोबा !'

म्हाताऱ्याचें सर्वांग थरथरत होतें. अगदीं सुन्न होऊन गेलें होतें त्यांचें डोकें. काय होत आहे त्यांना कांहींच कळत नव्हतें. शून्य मुद्रेनेंच पहात होते तिच्याकडे ते बावरल्यासारखे.

'मुळींच वेळ नाहीं आजोबा आतां. एक क्षणही घालवायला तयार नाहीं मी ! उठा, नी चला माझ्याबरोबर.'

'आत्तां, या रात्रीचे ?' आजोबा धीर करून पुटपुटले.

'हो, हो. आजोबा, अगदीं आत्तां ! दिवस उगवायच्या आंत. आत्ता इथून गेलों तरच वाचूं आपण आजोबा. पुन्हां नको तें स्वप्न. किती भयंकर !' तिनें परत शहारल्यासारखें केलें.

मोठ्या कष्टानेंच उठले ते आंथरुणावरून. त्यांचें सर्वांग घामानें डबडबलें होतें. थरथरत्या हातांनीं आपल्या तयारीला लागले ते. त्यांच्या हाताला धरूनच नलीनें त्यांना बाहेर आणलें. अंजनीबाईच्या खोलीवरून जातांच तिच्या आंगाचा थरकांप झाला आणि तिनें हळूच आजोबांच्या चेहऱ्याकडे पाहिलें. किती पांढरा फिक्कट पडला होता तो ! आणि किती असहाय नजरेनें पहात होते ते तिच्याकडे !

त्यांना धरून ती आपल्या खोलींत शिरली. त्यांना कोणी आपल्याजवळून ओढून नेईल कीं काय, अशा भीतीनेंच तिनें त्यांना अगदीं घट्ट धरून ठेवलें

होतें. झटकन तिनें त्यांची पिशवी नी काठी त्यांच्या हातांत दिली आणि आपलीही पिशवी पाठीवर टाकून त्यांना धरून ती हळूच बाहेर पडली.

मोठ्या कष्टानेंच पडत होतीं तिचीं पाउलें. गेल्या सर्व प्रकारानें विलक्षण थकवा तिला आला होता. पण आंगांत शक्ती असेपर्यंत न थांबण्याच्या निर्धारानेंच ती पुढें पाऊल टाकीत होती. आपल्या चालीच्या या मंद गती-मुळेंच तिनें वाटेंत कुठेंच फार वेळ विसांवा घेतला नाहीं. तिसरा प्रहरही टळून गेला. सूर्य मावळायलाही आतां थोडाच अवकाश उरला होता. एका छोटेखानी टुमदार गांवाजवळ येऊन पोंचलीं होतीं तीं.

प्रवासाच्या थकव्यानें आणि मानसिक श्रमानें अतीशय गळून गेल्यामुळें ते लहान लहान गजबजलेले रस्तेसुद्धां कंटाळवाणे वाटले त्यांना. अनेकांपुढें तोंड वेंगाडलें तिनें. पण त्यांच्या दीनवाण्या स्थितीची कोणालाच दया आली नाहीं. रात्रभरसुद्धां थारा द्यायला त्यांना तयार होईना कोणी. माणूसकीला पार पाठमोरा होऊन एकाद्या बेवारशी कुत्र्याप्रमाणें जो तो त्यांना आपल्या दारांतून हांकलीत होता ! अखेर निराशेनेंच तीं गांवाबाहेर निघालीं.

गांवाबाहेरच्या सडकेला लागलीं आतां तीं. एकाद्या जवळपासच्या खेड्यांत मिळालं डोकें टेकायला तर बरें अशा विचारांतच नली मोठ्या कष्टानें एकेक पाऊल टाकीत होती. पडणार खालीं आपण आतां असंच वाटलं तिला. पण—त्यांच्याच दिशेनें कोणाची तरी आकृती, डोक्याला टापशी, खांद्यावर पडशी टाकलेली, हातांतील सोट्या जमिनीवर टेकीत नी तोंडानें कांहींतरी मोठ्यानें म्हणत पुढें चाललेली तिला दिसली.

त्या व्यक्तीचा चालण्याचा वेग सपाट्याचा असल्यानें त्याला गांठून कांहीं मदतीची याचना करणें सोपें नव्हतें. पण सुदैवानें पुढील गृहस्थ हातांतील चंचींतील तंबाखूची चिमटी हातावर मळण्यासाठीं जरा वाटेंत थांबला. मोठ्या आशेनें आपल्या आंगातील सर्व शक्ती खर्च करून नली जरा झपाट्यानें पुढें त्यांच्याकडे गेली आणि धांपा टाकीतच तिनें विनवणी करण्यास सुरवात केली.

त्या गृहस्थानें थोडें चमकून मागें पाहिलें. नलीनें मोठ्या आनंदानें आपल्या टाळ्या पिटल्या आणि अतीशय आवेगानें ‘ मास्तर, ’ म्हणून एक किंकाळी फोडून त्यांच्या पायांजवळ ती धाडकन खालीं पडली !

---

# १७

बाबजी मास्तर ! होय. बाबजी मास्तरच होते ते ! आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना त्यांचा. नलीच्या या पुनर्दर्शनामुळें त्यांचेंही अंतःकरण आनंदातिशयानें अगदीं फुलून गेलें. ती आपल्या पायाजवळ बेशुद्ध होऊन पडली आहे हेंही एक क्षणभरच विसरले ते.

लौकरच पण ते भानावर आले. आणि चटकन खालीं वांकून त्यांनीं तिचें मस्तक हळुवार हातानें वर उचललें. गळ्याजवळील कपडे थोडे सैल करून त्यांनीं तिला वारा घालीत शुद्धीवर आणण्याचे प्रयत्न सुरू केले. म्हाताराही जवळच बसून अतीशय दीनवाण्या मुद्रेनें तिच्याकडे पहात, तिचा हात घेऊन तिला कुरवाळीत, ‘ असं काय नली, इकडे बघ जरा; एक तरी शब्द बोलग या म्हाताऱ्याजवळ, माझे बाई ! ’ असे केंविलवाणें पुटपुटत होता.

त्यांचेकडे अर्धवट निषेधात्मक नी अर्धवट दयायुक्त अशा नजरेनें बाबजी मास्तरानीं एकदां पाहिलें, नलीला तशीच वर उचलली आणि तिची पिशवी घेऊन मागून येण्यास आजोबांस सांगून एका हांकेच्या अंतरावर असलेल्या दस्तुरीच्या नाक्याकडे ते तीरासारखे चालूं लागले.

आजोबा मागून येत आहेत कीं नाहीं हें पहाण्यास एक क्षणही न थांबतां आंगांत आल्यासारखेच ते दस्तुरीजवळील चहाचे दुकानाकडे चालले होते. एक दोन मिनिटांतच त्यांनीं दस्तुरी गांठली, आणि ‘ दूर, मेहेरबानी करून थोडे दूर व्हा ’ असें दाराजवळील लोकांना सांगतच दार धाडकन् लोटून ते आंत शिरले, आणि नलीचा बेशुद्ध देह त्यांनीं जवळच्याच एका खाटे-वर ठेवला.

डोक्यावरील पाण्याच्या माऱ्यानें व मोकळ्या वाऱ्यानें ती शुद्धीवर आली आणि आजोबा व मास्तर यांचेकडे पाहून तिनें एक क्षीण हास्य केलें. झालेल्या श्रमानें डोळ्यांवर अजून झांपडच होती तिच्या, आणि जरा वेळानें

ती शांतपणें झोंपीही गेली. उठवावीच लागली तिला जेवणाचे वेळीं. परंतु समोर आजोबा न दिसल्यामुळें कावऱ्या बावऱ्यासारखी ती इकडे तिकडे पाहूं लागली. शेजारच्या खोलींतच बसले होते ते. त्यांचेशिवाय एक घासही घेण्याचें नाकारलें तिनें; आणि त्यांना त्याच खोलींत आपलें पान घेण्यास लावलें. जेवणानंतरही आपल्या खोलींत एकटी निजायला ती मुळींच कबूल होईना; अखेर तिच्या खोलीपलीकडील खोलींतच त्यांनीं आपलें आंथरूण पसरिलें. त्यांना स्वस्थ झोंप लागल्याचें पाहिल्यानंतर त्याच्या खोलीचें दार बाहेरून बंद करून घेऊन ती आपल्या आथरुणावर आडवी झाली; आणि मगच तिच्या मनांतील धडधड थोडी शांत झाली.

एका रात्रीच्या विश्रांतीनंतर सकाळीं तिला थोडी हुशारी वाटली. पण तिला अधीक विश्रांतीची फारच जरूर दिसत होती. आजच परत प्रवासाला सुरवात करणें शहाणपणाचें नसल्यानें बाबजी मास्तरनीं आणखी एक दिवस तेथेंच मुक्काम करण्याचें ठरविलें. त्यांनाही आणखी दोन तीन दिवस सवड होतीच. त्यामुळें अतीशय खूष होते ते. दुपारच्या झोंपेनंतर ते तिच्याकडे गेले.

'मास्तर कित्ती चांगले आहांत तुम्ही. पण ओझंच नाहीं का आमचं तुमच्यावर ? कसे तुमचे उतराई व्हायचं आम्हीं ? आलां नसतात मास्तर जर काल तुम्ही देवासारखे धांऊन, तर मी कांहीं जिवंत नसतें राहिलें. आणि मग आजोबांचं काय झालं असतं ?' मास्तरांकडे स्निग्ध दृष्टीनें पहात नली म्हणाली.

'अं हं ! मरणाबिरणाची नाहीं हं भाषा बोलायची आपण. आणि ओझ्याची तर गोष्टच सोडून द्यायची. अग पोरी, तुझ्या पायगुणानें पुष्कळ पैसे मिळाले मला तुम्हीं गेल्यानंतर हो !'

'खरंच ! खरंच मास्तर ! ती आनंदानें उद्गारली.

'अग हो, खरंच नली. जवळच्याच एका खेड्यांत मिळाली आहे मला दुसरी नौकरी. तुम्ही गेल्यानंतर नी हरीच्या मृत्यूनंतर गोडच लागेना मला तिथें कांहीं. म्हणून पकडली नी काय ही नौकरी. पंधरा रुपये मिळणार आहेत मला महिना. शिवाय एका शेटजीनींही केले आहेत कबूल पांच रुपये त्यांच्या चोपड्या लिहिण्याबद्दल. समजलं ? ' मास्तरनीं उत्तर दिलें.

'देवालाच काळजी नाहीं मास्तर ? कित्ती चांगलं झालं पण ! अगदीं बरं, बरं वाटलं मला !' उल्हासानें नली म्हणाली.

'तिकडेच निघालों आहे मी. गाडी भाडंही कबूल केलं होतं त्यानीं द्यायचं. पण अवकाश होता चार दोन दिवसांचा. म्हणून जाऊं म्हटलं असेच रमत गमत. परमेश्वरानेंच बुद्धी दिली म्हणायची. किती चांगलं झालं मी पायीं निघालों म्हणून!' भरल्या अंतःकरणानें मास्तर म्हणाले.

'खरंच. आभार मानले पाहिजेत देवाचे त्याबद्दल आपण.'

'पाहिजेत, पाहिजेत. अवश्य मानले पाहिजेत!' अस्वस्थपणें खुर्चीवर चुळबूळ करीत मास्तर म्हणाले.

'पण—निघालां आहांत कुठें तुम्हीं, आलांत कुठून, होतात तरी कुठें इतके दिवस? सगळं, सगळं कांहीं सांग पाहूं मला. फारसा कांहीं कुठें हिंडलों नाहीं मी, नी जगाचाही मला अनुभव नाहीं. खेड्यांतच गेला माझा जन्म अजूनपर्यंत. तुम्हांलाच असेल जगाचा अधिक अनुभव म्हणा. मग मी काय तुम्हांला सांगणार. पण, खरं, खरं सांगतों. भारी वाटतं मला तुमच्या-बद्दल—काय असतील पूर्वजन्मींचे लागेबांधे ते असोत! पण नली, काय सांगूं, फार जीव बसला आहे माझा तुझ्यावर पोरी. आणि विशेषतः माझा—हो माझाच नाहींतर काय?—हरी गेल्यापासून तुझ्यावरच जडला माझा सारा जीव! माझी अभाग्याची कामधेनूच तूं! हरी गेला नी नली मिळाली!'

मास्तरांचें भरून आलेलें अंतःकरण त्या साध्याच शब्दांवाटे बाहेर पडत होतें. त्यांच्या चेहऱ्यावरील सरळ निष्कपट भाव, डोळ्यांतील आतुरता, आणि आवाजांतील उत्कट मार्दव तिच्या अंतःकरणाला भेदीतच गेलीं अगदीं. पवित्र, निर्मल भावाचा अथांग डोहच जणुं काय तुडुंब भरून वाहत होता तिच्यापुढून! आणि अनंत जन्मांतरींचा प्रेमभाव तिच्या बाल मनांत जागा होऊन, आपली सर्व कर्मकथा भरल्या आवाजांतच तिनें मास्तरांना सांगण्यास सुरवात केली........

या अफाट जगांत आपला असा त्यांना कोणींच नव्हता. ना स्नेही, ना कोणी आप्त. आणि आतां तर पापाच्या खोल, खोल खड्ड्यापासून आपल्या आजोबांना सुरक्षित ठेवण्यासाठीं, त्यांचा अधःपात टाळण्यासाठीं कुठेंतरी दूर, दूर निघून चालली होती ती. या जगाच्या पाठीवर निवांतपणें, सगळा दुःखपूर्ण भूतकाळ खोल गाडून टाकून, कुठेंतरी राहण्यासाठीं भटकत होती ती. परमेश्वरावरच आतां सारा भार होता त्यांचा. तोच एकमेव आधार!

मास्तर अगदीं चकित होऊनच ऐकत होते सर्व. आपण एकादी नवल-कथाच ऐकतों आहोंत असं वाटलं त्यांना. किती अद्भुत असतं सत्य कित्येक-वेळां ! किती वेळ तरी मग ते सारखे बोलत होते. ते जात असलेल्या गांवींच त्या दोघांना न्यायचं ठरवलं त्यांनीं. तिथेंच कुठें तरी त्यांच्या पोटापाण्याची सोय लावतां येईल, असं वाटलं त्यांना. ' यश येणारच आपल्याला खात्रीनें. तो सत्यसंकल्पाचा दाता आपले मनोरथ पूर्ण केल्यावांचून कधीं राहणार नाहीं !' लहान बालकाच्या उत्साहानें ते म्हणाले.

जरा बरें वाटत होतें नलीला आतां, नी म्हणून दुसरे दिवशीं संध्याकाळीं तीं तेथून निघालीं. दस्तुरीजवळ सुटलेली एक गाडी ठरवली होती त्यांनीं जायला. मास्तरांच्या त्या नवीन गांवाकडेच जायची होती ती गाडी परत. रिकामाच चालला होता तो गाडीवाला नी त्यामुळें भाड्याचीही घासघीस त्यानें फारशी केली नाहीं. वेळही आतां उतरत्या उन्हाची असल्यानें हवाही मोठी सुखकर होती. गाडींतील पेंढा नीट पसरून त्यावरच नलीला झोंपवली होती मास्तरांनीं; आणि ते व आजोबा तिच्याशीं गप्पागोष्टी करीत गाडी-मागून चालत होते. दस्तुरीवरील तो मुसलमान नाकेदार व हॉटेलवालाही आले होते त्यांना निरोप द्यायला. मोठ्या आनंदांत चालला होता त्यांचा प्रवास. आजोबा व मास्तरही मधून मधून आळीपाळीनें नलीच्या आग्रहानें गाडींत बसत होते. नलीचा सहवास आतां आपल्याला मिळणार या जाणी-वेनें मास्तरांचा आनंद अगदीं शिगेला पोंचला होता. त्या आनंदाच्या उन्मादांत त्यांच्या बोलण्याला खळ म्हणून पडत नव्हता. मधेंच एकादे वेळेस ते अगदीं स्तब्ध बसत आणि भाविकाळाचीं रम्य चित्रें रेखाटण्यांत ते गुंग होऊन जात. नलीलाही त्यांच्या या स्वप्नसमाधीची मोठी गंमत वाटत होती. × × × × × × ×

दिशा उजळूं लागल्या होत्या आतां. डोंगराचा उतार संपून एका सपाट विस्तीर्ण माळरानांतून त्यांची गाडीवाट सरळ चालली होती. क्षणाक्षणानें सुस्पष्ट होत चाललेला त्यांच्या समोरील तो भूभाग नुकत्याच जाग्या झालेल्या एकाद्या बालकाप्रमाणें प्रसन्न दिसत होता. दूरवर दिसत असलेल्या काळ-सर धूसर टेंकड्यांच्या आसऱ्यानें त्यांच्या पायथ्याशींच एक लहानसें

टुमदार गांव पसरलेलें आतां दिसूं लागलें होतें, नी तेथेंच संपायचा होता त्यांचा प्रवास.

‘ तें पहा, तें पहा नली, बल्लाळेश्वराचें देऊळ, ’ मास्तर आनंदातिशयानें बोट दाखवित म्हणाले. ‘ आणि ती त्याच्या पलीकडली, हो शाळाच ती. काय सुंदर ठिकाण आहे नाहीं. आणि पगारही भरपूर ! ’

फार प्राचीन होतं तें देवालय. त्याचा तो सुंदर कळस, घुमटाच्या बाजूची माकडें व ध्यानस्थ ऋषि, भव्य सभामंडप, आणि तो मंद नंदादीप तेवत असलेला प्रशांत गाभारा पाहून नलीला मोठी मौज वाटली. जवळचीं घरें-सुद्धां किती नीट नेटकीं आणि रांगेनें वसलेलीं दिसत होतीं. आणि झाडांनी सुद्धां वर कशी डौलदार छाया पसरली होती त्यांच्या. गावापलीकडील ती चिमुकली नदी, तिच्यावरला अर्धवट दिसणारा लाकडी फळ्यांचा पूल आणि दूर दिसणारे ते उंच निळे डोंगर, सारंच कांहीं अगदीं रेखल्यासारखं वाटलं तिला ! ‘ किती सुंदर, ’ ती म्हणत होती.

त्या प्रसन्न वातावरणानें भारल्या सारखीच तीं स्वस्थ बसलीं होतीं सर्व कांहीं वेळ. ‘ इथेंच बसतां का थोडावेळ ? मला कांहीं पत्र द्यायचं आहे आणि थोडी चौकशीही करायची आहे शाळेची. कुठें बसाल मी येईपर्यंत ? ’ मास्तर म्हणाले.

‘ इथेंच बरं आहे कीं. देऊळही मोकळं आहे. इथेंच थाबतों आम्ही मास्तर, तुम्ही येईपर्यंत.’ नली म्हणाली.

‘ ठीक आहे. चांगलं आहे देऊळ बसायला,’ आपल्या खांद्यावरील पडशी खालीं ठेवीत मास्तर म्हणाले.

‘ आलोंच मी आत्तां जाऊन. फत्ते होणार काम आपलें नक्की.’ असें म्हणून मास्तरानीं डोक्याला आपला फेटा चढवला आणि उपरणं खांद्यावर टाकून मोठ्या उल्हासानेंच ते देवळांतून बाहेर पडले.

बऱ्याच वेळानें मास्तर अगदीं हंसत हंसत आणि धापा टाकीतच देवळांत आले. आणि आले ते देवळाच्या गाभाऱ्याच्या किल्ल्या हातांत खुळखुळवीतच आले नी त्यानीं नली मोठ्या उत्सुकतेनें पहात असलेल्या दोन छोट्या घरांकडे तोंडानें न बोलवल्यामुळें नुसतें बोटच दाखविलें.

'तें पाहिलंस ना घर नली !' जरा वेळानें ते म्हणाले.

'हो तर ! मघांपासून बघतें आहे मी तिकडे.' नलीनें उत्तर केलें.

'आणि तुला जर कळलं असतं मी काय सांगणार आहे तें, तर मग काय अधिकच लक्ष लाऊन पाहिलं असतंस तूं त्याच्याकडे. माझं आहे बरं का त्यांतलं एक घर; नलुताई.' मास्तरनीं सांगितलें आणि मोठ्या आनंदानेंच 'चला तिकडेच जाऊं या आपण,' असें म्हणून त्यांनीं आपली पडशी उचलली.

घरापुढील फाटकांतून आंत शिरून आपल्या हातांतील किल्ल्यांनीं घराचें कुलूप काढण्यास त्यांनीं सुरवात केली. बराच वेळ धडपड केल्यानंतर मोठ्या नाखुषीनेंच जणुं काय त्या कुलुपानें आपली समाधी सोडून जांभई दिली आणि जरा कुरकुरतच त्यानें आपली जागा सोडली.

जुनाटच होती घराची एकंदर बांधणी. पण चांगलें भक्कम व सोईस्करपणें बांधलेलें दिसत होतें तें. दारांतून आंत गेल्यावर एक लहानशी ओटी नी तिच्याच बाजूला एक दोन खणी खोली. खोलींत एक जुनी पुराणी भक्कम लांकडी खाट टाकली होती आणि त्या वरील जीर्ण सतरंजीवर तितकाच जीर्ण असा काथ्याचा एक तक्क्या भिंतीला टेकून भकास मुद्रेनें पहात होता. ओटी पलीकडील माजघराच्या एका बाजूला स्वयंपाकघर व दुसऱ्या बाजूला कोठीची व्यवस्था दिसत होती. माजघरांत एक खिळखिळा झोंपाळा जेमतेम आपलें स्थान संभाळून होता, असें त्याच्या झालेल्या करकर आवाजावरून कोणी म्हटलें असतें. मागील पडवीच्या पलीकडील अंगणांत एक साधारणसें तुळशी-वृंदावन आंतील खुरटलेल्या रोपट्यासह उभें असलेलें दिसत होतें. स्वयंपाक गृहांतील आंगाला राख फांसून बसलेली चूल आणि कोपऱ्यांतील जळाऊ लांकडें, आपल्या अस्तित्वानें नुकतेंच कोणीतरी तेथें राहात होतें असें स्पष्टपणें दाखवीत होतीं. आणि तिकडे अंगणांतील कांहीं जीर्णपर्ण तर कांहीं निष्पर्ण झाडें आपलें गतवैभव व आत्तांचें शून्य जीवन यांची मूकवाणीनेंच करूण-कहाणी जणुं सांगत होतीं त्यांना !

या जुनाट वास्तुपुरुषाकडे नली अगदीं गंभीर चेहऱ्यानेंच पहात होती. अनंतकालाच्या अथांग विस्तारांत केवळ बिंदुमात्र असणाऱ्या या मानवी कृतीचाच ती विचार करीत होती कीं काय कोण जाणे ! कोणीच बोलत

नव्हतें कांहीं वेळ; जणूं काय सभोंवारच्या त्या उदास गंभीर वातावरणाची स्तब्धता मोडण्यास कोणीच तयार नव्हतें.

'किती शांत आहे ही जागा. नाहीं!' हलक्या आवाजांत नली उद्गारली.

'अशीच प्रशांत आणि उदास पाहिजे राहायला जागा. तुला नाहीं वाटत?' मास्तर म्हणाले.

'होय मास्तर; अशीच पाहिजे शांत नी उदास जागा, रहायला आणि मरायलाही!' गंभीरपणें त्यांचा हात घट्ट पकडून ती म्हणाली.

'अं हं! अगदीं स्वस्थपणें राहायला, जगायला, खायला-प्यायला, चांगलं टुणटुणीत व्हायला नी हंसा खिदळायला! तुझं आहे आतां हें घर बरं का.' मास्तर उल्हासानें म्हणाले.

'माझं? आमचं घर हें? खरंच मास्तर!' त्यांच्या आवाजांतील उल्हासानें तिचा उदासपणा पार जाऊन नली बालसुलभ उत्साहानें म्हणाली.

'अग हो, हो पोरी! अगदीं पुष्कळ, पुष्कळ दिवस; आणि पलीकडेच राहाणार आहे मीही त्या शेजारच्या घरांत.'

आणि मन जरा हलकें झाल्यानंतर मग सकाळीं काय काय घडलें तें मास्तरनीं बैठक मारून सांगण्यास सुरवात केली. शाळेच्या पंचाकडे चिठी घेऊन आपण कसे गेलों नी तिथेंच देवळांतील पुराणीकबुवा कसे आपल्याला भेटले आणि मग सहजच या बल्लाळेश्वराच्या देवळाच्या गप्पा कशा निघाल्या, तें मास्तर सांगूं लागले. देवळाची झाडलोट दिवाबत्ती करणारा माणूस आजारी पडून कांहीं दिवसांपूर्वींच मेला होता, नी तें काम करायला चांगलासा माणूस कोणी मिळत नव्हता त्यांना आणि शोधांतच होते ते अशा माणसाच्या अजून. मग मी माझ्या दोस्तांविषयीं त्यांना कसें कसें सांगितलें नी माझी कल्पना पुराणीकबुवांना नी त्या शाळेच्या पंचांना कशी पटली, आणि मग त्यांनीं मला तुम्हांला उद्यां देवळाच्या पंचाकडे न्यायला कसं सांगितलं तें सारं, सारं कांहीं मास्तरांनीं त्यांना सांगून टाकलें. 'पंचाकडे आपलं नांवाला जायचं राहिलं आहे कारण तुमची नेमणूक झाल्यासारखीच आहे, असंच म्हणाले होते ते. पगार कांहीं तसा फारसा नाहीं. पण या निवांत स्थळीं पुरेसा आहे तो. आणि आपण मुळीं एकत्रच राहूं सगळीं जणं. मग तर काय मुळींच पंचाईत नाहीं कसली.'

त्या उदार हृदयी जीवाचे ते उद्गार ऐकून नली अगदीं गहिंवरून गेली आणि त्या देवतुल्य माणसाकडे भरल्या डोळ्यांनीं पहात ‘ देव तुमचं भलं करो मास्तर ! ’ असें कसेंबसें ती पुटपुटली.

‘ तथास्तु, माझे बये ! असंच आतां सुखासमाधानांत नी आनंदांत जाऊं दे आपलं आयुष्य. पण माझं घर बघायचं राह्यलंच कीं. तुझं तूं पाहिलंस आपलं मात्र, नी माझं कोण पाहील ? लब्बाड ! ’ मास्तर आनंदानें म्हणाले आणि ‘ आनंदु आनंदु—अवघा ब्रह्मानंदुरे ’ असें तोंडानें गुणगुणतच ते बाहेर पडले.

पहिल्या घरासारखेंच होतें तें घर. तिथेंही त्यांना कुलुपाशीं झटापटच करावी लागली कांहीं वेळ नी मग कुठें एकदांचें तें दार उघडलें. आंत ओटी, माजघर, स्वयंपाकघर सगळं तसंच होतं पहिल्यासारखं. जागा मात्र लहान होती एकंदर पहिल्याच्या मानानें. त्यावरून तें पहिलें घर मास्तरां-करतां आणि दुसरें हें देवळाच्या नोकरासाठीं हें कोणालाही सांगतां आलें असतें. पण त्यांचेबद्दलच्या आपुलकीनें मास्तरनीं हेंच छोटें घर आपलं, म्हणून सांगितलं होतं त्यांना.

सबंध दिवसभर मग तीं झाडझूड करायला जुडलीं होतीं घराच्या. नली सुद्धां आपले श्रम विसरून इकडे तिकडे नाचत होती. मध्यान्ह टळल्यानंतरच मग त्यांनीं पोटपूजेकडे पाहिलें. पंचाकडून आलीच होती सर्व तयारी. आणि जेवण झाल्यावर सगळ्यानींच मग थोडा आराम केला. पण पडल्या पडल्या पुढच्या गप्पाच चालल्या होत्या त्यांच्या. रात्रींसुद्धां किती वेळ बोलत होतीं तीं. आपल्या या नवीन आनंदाच्या भरांत कसलंच भान नव्हतं त्यांना. शेवटीं मास्तरच उठले नी ‘ चला, फार उशीर झाला आतां ’ असें म्हणून आपल्या जागेंत झोंपण्यास गेले. पण जाण्यापूर्वी ‘ जाईन मी जेथें ’ हा अभंग नलीबरोबर म्हणण्यास मात्र ते चुकले नाहींत.

सकाळच्या चैतन्ययुक्त वातावरणांत त्यांनीं परत कामाला आरंभ केला आणि सगळीकडे अगदीं चक्क करून टाकलें. आपल्या आंघोळी उरकून मग तीं बल्लाळेश्वराच्या पंचाच्या घरीं निघालीं. साधे सुधे नी म्हातारेच दिसले ते गृहस्थ. जगापासून दूर झालेल्या, निरिच्छ योग्याप्रमाणेंच दिसत होते ते. पुष्कळ दिवस झाले होते त्यांना इथें आल्याला. संसारांतील त्यांची प्रेमळ

सहचरीही त्यांना याच घरांत एकटे टाकून गेली होती. आणि ' उपकारा पुरता उरल्या ' सारखीच राहणी होती त्यांची अलीकडे.

मोठे प्रेमळ दिसले गृहस्थ ते नी मोठ्या आस्थेनेंच केली त्यांनीं चौकशी नलीची. त्या पोरीनें आपल्या गोड वाणीनें आणि लाडिक चेहऱ्यानें मोहनीच घातली त्या म्हाताऱ्याला. मास्तरनीं आधींच सांगितलं होतं सर्व त्यांना. कोणीच नाहीं त्यांना दुसरं जगांत आणि माझ्याबरोबरच राहणार आहेत तीं आतां. पोटच्या पोरीपेक्षांहि माया लागली आहे हिची मला, असंही ते म्हणाले त्यांना.

' बरं, बरं मास्तर साहेब. तसंच होऊं द्या तुमच्या मनाप्रमाणें, ' ते वृद्ध गृहस्थ म्हणाले.

आनंदानेंच निघालीं मग तीं तेथून त्यांचा निरोप घेऊन. घरीं आलीं तरी सुद्धां चालल्या होत्या त्यांच्या गप्पा नी किती वेळ चालल्या असत्या आणखी कोण जाणे. पण इतक्यांत दाराशीं आलेंच कोणी.

त्या सर्व वृद्ध पंचांच्याच घरांत रहाणारे एक लहानखोरे म्हातारे गृहस्थ होते ते. पंचांच्या पत्नीच्या निधनापासूनच आले होते ते तिथें रहायला. पंधरा वर्षें झालीं होतीं त्याला आतां. त्यांचे शाळा सोबती आणि मोठे दोस्त होते ते. पत्नीच्या दुःखानें भारावलेल्या आपल्या मित्राच्या मनाला थोडा विरंगुळा म्हणून आले होते वामनराव त्या गांवांत, आणि तेथेंच राहात होते ते अजून. गांवांत फारसे मिसळत नसत ते कोणाशीं. आपल्या स्नेह्याच्या घरीं प्रथम ते आले तेव्हांच त्यांची विद्वता आणि संन्यस्त-वृत्ती यांची कुणकूण लोकांना लागली होती. आणि त्यामुळें थोडे दूरच असत ते वामनरावांपासून. तेही पण नेहमींच्या संन्यस्त नी परोपकारी वृत्तीनेंच रहात होते आल्यापासून आपल्या स्नेह्याच्या घरीं. त्यांचा जन्मस्वभावच तो; कुठेंहि सारखाच.

वामनराव आले ते एकाद्या माहितगाराप्रमाणेंच माजघरांत आले.

' नमस्कार मंडळी, नमस्कार. तुम्हींच बाबजी मास्तर नव्हत का ? ' मास्तरांकडे पहात ते म्हणाले.

' होय. मीच तो बाबजी मास्तर. '

' भाग्य आमच्या या गांवाचें मास्तर ! मोठा आनंद वाटला मला. ऐकत

होतों नांव बरेच दिवस तुमचं. आणि ही आमची छोटी गुरवीण नाहीं का ? मास्तर, धन्यवाद देतों मीं तुम्हांला. थोर आहे अंतःकरण तुमचं. हीच खरी खुरी माणुसकी ! ' वामनराव त्यांच्याकडे आदरानें पहात म्हणाले.

' थोडी आजारीच आहे ती अलीकडे. अशक्त ही झाली आहे फार, ' नलीकडे स्निग्ध दृष्टीनें पहात असलेल्या वामनरावांना उद्देशून मास्तर म्हणाले.

तिच्या आजोबांकडे आणि तिच्याकडे प्रेमळपणें पहात वामनराव म्हणाले, वाटेल, चांगलं बरं वाटेल तुम्हांला इथें. बरं; कांहीं काळजी नको. आमच्या-कडून काय होईल अल्प स्वल्प तें करूंच आम्हीं म्हणा; आणि एवढ्यांत हात फिरला वाटतं तुझा इथें ? वा ! वा ! छान ! आणखी थोडी ठाकठिकी करूंया हं आपण; चला पाहूं. '

मग ते दोन्ही घरांत बराच वेळ हिंडत होते, इकडे तिकडे लक्षपूर्वक पहात. आणि तोंडानें कांहीं पुटपुटतच घरांतून ते बाहेर पडले नी आलेही परत थोड्याच वेळांत. आपल्या खांद्यावर कांहीं सामान आणि पोराच्या डोक्यावर कांहीं सामान देऊन. सतरंज्या, गाद्या, पासोड्या, फळ्या, एकदोन लहान लहान अलमाऱ्या, कंदील अशा नाना तऱ्हा होत्या त्यांत त्यांना लागणाऱ्या. आणि येऊन तरी कुठे स्वस्थ बसले. लगेच भिंतींना खिळे ठोकून फळ्या वगैरे लावायला सुरवात केली त्यांनीं आणि पोऱ्यावर ओरडायलाही स्वतःचा संसारच मांडीत होते जसे कांहीं ते.

त्या दोन जीर्ण घरांच्या खिडक्यांतून मोठा प्रसन्न प्रकाश त्या रात्रीं रस्त्यावर परत पडला होता. वामनराव व त्यांचे दोस्त फिरून परत येतांना त्या खिडक्यांकडे मोठ्या आनंदानें पहात नलीबद्दल कौतुकानें आपसांत बोलत होते आणि तावदानांतून दिसणाऱ्या त्यांच्या सावल्यांकडे पाहून त्यांनीं समाधानाचा एक सुस्कारा सोडला.

---

# १८

अलीकडे किशा बरेच वेळां नानूजींच्या घरीं एकटाच येत असे. आणि तो आला कीं नानूजींचेंही कांहीं काम निघे, नी ते पंतांना हांक मारून त्यांना त्या कामगिरीवर जायला सांगत. पंतांची स्वारीही एकदां बाहेर पडली कीं दोन तीन तासांची निश्चिंती म्हणून समजायला कांहीं हरकत नसे. नानूजींची स्वारी मग मोठ्या खुर्शींत तोंडानें कांहीं तरी गुणगुणत टेबलावर तंगड्या टाकून आळ्याकडे पहात पण जिन्याकडे कान देऊन नाकांत तपकीर कोंबीत बसलेली असायची. किशा खालीं आलाच कीं 'किसन जरा इथें बसतोस कारे? जरा पलीकडून जाऊन यायचं आहे मला,' असं सांगून किंवा कधीं त्याला गप्पांत गुंतवून मग जातांना त्याच्या हातावर थोडी चिरमिरीही द्यायचे ते. भोळा बिचारा किशा! त्यालां वाटे वरचा बिऱ्हाडकरूच सांगतो यांना चिरीमिरी द्यायला. आणि त्याला मोठे उपकार वाटत त्यांचे. जनाबाईला नव्हती का त्यानें मागें एकदां बक्षिसी दिली होती. चांगला आहे माणूस मोठा; नी मग त्या पैशांचा जग्यासाठीं कांहीं तरी खाऊ किंवा बायजासाठीं डोक्यांतले आकडे बिकडे घेऊन जायचा तो.

पंतांनाही अलीकडे बराच वेळ मोकळा सांपडत असे. नुसतं माशा मारीत स्वस्थ बसणें त्यांना मुळींच आवडत नसे. पण पंतांचें डोकें मोठें तल्लख असल्यानें ते आपले समोर जोडीदार आहे असं समजून पत्त्यांचा डाव टाकून त्यांत रंगून जात असत. पण नुसतं खेळण्यांत काय गंमत असें समजून पैसेही लावायचे ते खेळतांना. आणि खिशाला खरीखुरी चाट लागायची मुळींच धास्ती नसल्यानें पैसे लावायचेही जबर सवालाचे. ऑफिसांत कोणींच नसल्यानें चोंहीकडे अगदीं स्मशान शांतताच पसरलेली असायची. पण गेले दोनचार दिवस कोणाचा तरी जोरानें चाललेला श्वास त्यांना ऐकूं यायचा. घरांत दुसरे कोणी नसल्यानें ती पोरसवदा स्वयंपाकीणच

असावी दाराशीं असा त्यांनीं तर्क केला. आणि एक दिवस दाराच्या भोंकांतून हळूच त्यांनीं बाहेरही पाहिलें. हो. शंकाच नाहीं ! तीच होती तिथें दाराच्या फटींतून आंत पहात. पंतांनीं चोरपावलांनीं जाऊन हळूच दार उघडलें आणि झटकन हातच पकडला त्यांनीं तिचा, ती निसटण्यापूर्वी.

'अग आई ! सोडा, सोडा पंत !' आपला हात सोडवीत ती गयावयां करीत म्हणाली. 'कांहीं नव्हतें हो मी करीत. जातां जातां नुस्ती उभी होतें जरा. कंटाळा आला होता, खालीं अगदीं. खरंच पंत. बाईंना नका गडे सांगू पण !'

'म्हणजे ? सोबतीसाठीं का उभी होतीस माझ्या तूं ?' पंत उद्गारले. 'हात्त्येच्या ! बाईंना कशाला ग सांगू मी ? पण किती वेळ ग आहेस अशी उभी, अं ?'

'खरं सांगू पंत ? पुष्कळ वेळ झाला मला; नी पत्ते खेळायला लागलांत ना तुम्हीं, तेव्हांपासून येतें आहे मी.'

'अच्छा ! ये आंत ये अशी. इथें बस. पत्ते खेळायला शिकवतों ये तुला.' जरा विचार करीत पंत म्हणाले.

'इश्श ! खरंच ? पण नको बाई पंत ! जीवच घेतील बाई माझा, त्यांना कळलं तर.'

'बरं ! पण माझा कांहीं प्राण नाहीं घेणार बाई मी आलों खालीं तर. चल, मीच येतों खालीं. चल.' पत्ते खिशांत टाकीत पंत म्हणाले. 'किती ग बारीक आहेस तूं. बाई खायला नाहीं वाटतं घालीत पोटभर, अं ? मस्का पाव खाल्ला आहेस का ग कधीं तूं आणि चहा ?'

'नाहीं बाई; नी चहाची तर चवसुद्धां नाहीं अजून पाहिली, कशी असते ती.'

'काय गंमत आहे ! चवसुद्धां नाहीं पाहिलीस अं ? पण काय ग, वय काय आहे तुझं ?' पंतांनीं विचारलें.

'मला नाहीं माहीत बाई.' ती उद्गारली.

पंतांनीं क्षणभरच आश्चर्यानें तिच्याकडे पाहिलें, आणि दाराकडे जरा लक्ष ठेवायला तिला सांगून ते तडक बाहेर पडले.

थोड्याच वेळांत ते परत आले. त्यांच्यामागून हॉटेलचा पोऱ्या, चहाचे

कप आणि खाण्याच्या कांहीं बशा घेऊन येत होता. त्याच्या हातांतून पंतांनीं सर्व सामान घेतलें आणि आपल्या त्या पोरसवदा मैत्रिणीला दाराला कडी घालायला सांगून ते स्वयंपाक घरांत शिरले.

' हं. बसा आतां तिथें आणि करा सुरवात नी काय. ' तिच्यापुढें बशा ठेवीत पंत म्हणाले. ' आणि मधून मधून हा चहाचा घुटका घ्यायचा बरं का. माहीत नाहीं म्हणून सांगतों तुला. '

' इश्श, एवढं नको सांगायला कांहीं ! सुंदर लागतो आहे हो हा चहा. ' त्यांची मैत्रीण उद्गारली.

पंतही आरामशीरपणें चहाचे घुटके घेत तिच्याकडे पहात स्वस्थ बसले होते. पुढल्या सर्व बशा अगदीं साफसूफ झाल्यावर मग त्यांनीं तिला पत्त्यांचे धडे द्यायला सुरवात केली. तिनेंही झटपट गिरवला तो धडा. चुणचुणीत आणि हुशार दिसली ती.

' हें पहा, पैशाशिवाय कांहीं गंमत नाहीं येत खेळायला. ' खिशांतील एकदोन पया टेबलावर ठेऊन पंत म्हणाले. ' जर तूं जिंतलीस तर या पया तुझ्या. आणि जर मी जिंतलों तर मग माझ्या बरं का. आपलं सगळं हें खरं बरं का; लटुपटीचं नाहीं हं. पण हाक काय मारूं मी तुला, अं ? काय बरं. हां, हां ! राणी म्हणूंया तुला. वाः ! सुंदर; राणी, राणी ! ! ऐटबाज आहे नांव नाहीं मोठं ? ' पंत बोलत होते.

' इश्श ! मला नाहीं बाई समजत ! ' राणी उद्गारली.

' हं ! मग राणी, करा सुरवात. '

हातांतील पान घट्ट धरून काय पान टाकावं याचाच विचार करीत होती राणी. पंतही तिच्याकडे पहात, विचारी मुद्रेनें मधून मधून चहाचा घुटका घेत ती काय पान टाकते तें पहात होते.

घड्याळांत साताचे ठोके पडले. नानूजी बावलीबाईची घरीं येण्याची वेळ झाली होती आतां.

' आठाला येणार आहेत नाहींका साहेब आपले ? मग अवकाश आहे थोडा. चहा घेऊंया परत आपण. ' एखाद्या नाटकी प्रेमवीराप्रमाणेंच चालली होती सर्व हालचाल पंतांची. पण नाटकांना पूर्णपणें अनभ्यस्त असलेल्या राणीला मात्र जरा बावरल्यासारखं वाटत होतें त्यामुळें. पंतांच्याही लक्षांत

आली होती आतां ती गोष्ट. आणि त्यांनींही तो नाटकीपणा मग सोडून दिला नी घरगुती वातावरण खेळूं लागलें त्यांच्याभोंवतीं.

‘ काय ग राणी, अशीच जातात कां ग बाहेर भटकायला नेहमीं हीं ? आणि तूं एकटीच ? ’

‘ हो तर काय. चमत्कारिक आहेत बाई मोठ्या. ’ राणी म्हणाली.

‘ आणि काय ग, गप्पा ऐकल्यास आहेस का कांहीं त्यांच्या चाललेल्या ? माझ्याविषयीं बोलतात का ग कधीं ते ? ’ पंतांनीं विचारलें.

राणीनें होकारार्थी मान हलविली.

‘ काय बोलतात ग राणी ? चांगलंच बोलतात ना ? ’

राणीनें जोरानें मान हालविली. त्या हिसक्यानें ती चिमुकली मान मोडते कीं काय असं वाटलं पंतांना. ‘ मोठा मजेशीर आहे प्राणी पंत म्हणजे ’ असं म्हणतात बाई, राणी म्हणाली.

‘ वाः अग राणी, स्तुतीच आहे कीं ही ! अग मजेशीरपणा शिवाय मजा नाहीं जगांत बघ. आपल्या नाटकांत, लळीतांतसुद्धां नाहीं कित्ती मजा असते, राणी. ’ पंत म्हणाले.

‘ मला नाहीं बाई माहीत. पण त्या म्हणतात तुमच्यावर विश्वाससुद्धां नाहीं ठेऊन चालायचा. ’ राणी पुढें म्हणाली.

‘ अंः ! त्यांत कांहीं नाहीं. पुष्कळ लोक म्हणतात तसं. नानूजी पण म्हण-तात का ग, तसं ? ’ पंतांनीं विचारलें.

राणीनें मिस्कीलपणें त्यांच्याकडे, पहात मान हलविली. जणूं काय, एव-ढ्यानें काय झालं आहे, असंच दाखवायचं होतं तिला. पण लगेच स्वतःला सावरून ती म्हणाली, ‘ पण पंत माझं नकाहं नांव सागूं. नाहींतर डागच देईल बघा माझ्या तोंडाला ती. ’

‘ राणी, तें व्हायचं नाहीं माझ्या हातून. शब्द म्हणजे शब्द. आणि मी तुझा दोस्त नाहीं का आतां राणी ? अशीच मजा करूं कीं आपण पुन्हां. कसा चुटकीसारखा गेला वेळ नाहीं ? ’ डोक्याला टोपी चढवून दाराकडे जात पंत म्हणाले, ‘ पण काय ग खरं सांग हं. रोजची संवय दिसते तुझी ही राणी फटींतून चोरून पहायची. त्या शिवाय नाहीं. ’

नाहीं हो पंत ! फडताळाची किल्ली पहात होतें हो कुठें दिसली तर. चार

तुकडे मिळाले असते पोटांत घालायला तर बघत होतें हो मी. दुसरं कांहीं नाहीं. !' घाबरत राणी म्हणाली.

'सांपडलेली दिसत नाहीं तुला पण ती. नाहींतर दिसलं असतं मांस थोडं अंगावर तुझ्या. बरं. जातों मी आतां. नमस्ते राणी–दाराची नीट कडी लाव बरं का.'

असें म्हणून पंतांनीं दाराबाहेर पाऊल टाकलें. त्यांचें मकाणही जवळच होतें ऑफिसच्या. आंत शिरून पंतानीं दिवा लावला आणि लाथेनेंच गादी उलगडून त्यानीं तीवर आंग टाकलें.

'राणी ! राणी !' पंतांचा विचार चालला होता. 'गूढच आहे मोठं. कोणाची कोण, नांव गांव, वयाचाही कांहीं पत्ता नाहीं. त्या अंधाऱ्या स्वयंपाक घराचा कोंडवाडा हेंच तिचं जग. चहाच्या चवीची सुद्धां बिचारीला कांहीं कल्पना नाहीं ! असंच का जायचं आहे तिचं सारं आयुष्य ? काय नशीबांत आहे बिचारीच्या कोण जाणे. येईल का कोणाला यश ? राणी !!'

सहानुभूतीचें इवलेसें नाजूक बी पंतांच्या मनांत रुजू लागलें होतें आतां आणि काय गंमत ! कोंवळ्या अंकुरानीं विरत असलेल्या धरित्री प्रमाणें त्यांचेंही मन स्फुरत होतें, उमलत होतें !

* * * *

सकाळीं चांगलें उजाडल्यावर पंतांना जाग आली. उल्हासानेंच उठले ते आंथरुणावरून. रोजचे सर्व कार्यक्रम उरकून नेहमीं प्रमाणें तोंडानें शीळ घालीत आपल्या ऑफिसांत त्यांनीं प्रवेश केला. बाबलीबाईच्या कामाला सुरवातही झाली होती. त्यांच्याकडे पहात पहातच रोजच्या प्रमाणें आपला कोट काढून त्यांनीं खुर्चीला लावला आणि ते आपले जागेवर बसले.

'माझी ती चांदीची पेन्सिल पाहिली आहे कांहो कुठें पंत ?' बाबलीबाईनीं मान वर करून विचारलें.

'रस्त्यांत तर कांहीं कुठें भेटली नाहीं बुवा. नाहीं म्हणायला एक लठ्ठ बुटगी बरणी आणि एक उंच डोलकाठी मात्र पाहिली चाललेली रस्त्यानें ! पण बोलण्यांत गढून गेलीं होतीं तीं अगदीं. म्हणून नाहीं केला समाधीभंग त्यांचा.' मिस्कीलपणें हंसून त्यांच्याकडे पहात पंत उद्गारले.

'थट्टा राहूं द्या पंत. तुमची आपली नेहमींच थट्टा; मी खरं खरं विचारतें आहे अगदीं.' बाबलीताई मान उडवीत म्हणाल्या.

'आहा! काय पण. म्हणे खरं खरं विचारतें आहे. आत्तांच नाहीं का आलों मी हा?' पंतानीं उत्तर केलें.

'काय जाणे बाई! सांपडत नाहीं खरी आत्तां. कित्ती, कित्ती शोधली मी. इथेंच होती टेबलावर नक्की.'

'आमच्या राणीबाईंचं नाहींना काम हें,' पंत विचार करीत होते.

'फार वाईट आहे हें पंत'—बाबलीबाई पुढें म्हणाल्या. 'तुमच्या माझ्या मधेंच हं पंत—नानूला नाहीं कळता कामा हं. नाहींतर मग मला जन्मभर पुरेल तें. पण थोडे पैसेही जायला लागले आहेत अलीकडे. दोन तीन वेळां झाला हा प्रकार. पांच सहा रुपये गेले अजून पर्यंत.'

'खरं म्हणतां हें? घात आहे मग. पण तुमची नक्की खात्री आहे. चूकबीक नाहींना होत तुमची कांहीं? बघा नीट.' पंत म्हणाले.

'अगदीं पक्की खात्री आहे माझी. सवकला आहे कोणी तरी नक्की.' बाबलीबाई जोरानें म्हणाल्या.

'संपलाच म्हणायचा मग राणीचा अवतार,' पंत आपल्याशींच म्हणाले. गंभीरपणेंच जरा विचार करीत होते ते. बाबलीबाईही कांहींतरी आपल्याशींच पुटपुटत मधेंच मान हलवीत होत्या. इतक्यांत बाहेर नानूजींचा आवाज ऐकूं आला आणि पाठोपाठ नानूजी मोठ्या खुशींतच आंत आले. 'काय पंत, झालीसुद्धां का कामाला सुरवात? वा, वा!' नानूजी म्हणाले. 'मजा वाटते नाहीं मोठी कामाला यावेळीं. रात्रभर भरपूर विश्रांती आणि सकाळीं सुंदरसं जेवण आणि मग अशी मजा येते म्हणतां कामाला, कीं यंव!'

पंतांजवळ बोलत असतांना हातांतील एक पांच रुपयांची नोट उजेडांत धरून तिच्याकडे नानूजी पहात होते. पंत अजून आपल्याच विचारांत गुंग होते. त्यांचा तो गंभीर चेहरा पाहून नानूजी परत बोलूं लागले. 'कांहो, अगदीं गंभीरसे दिसतां एवढे. छे:! पंत. कामाला कसा माणसानें उल्हासानें आरंभ केला पाहिजे. आपल्याला शोभत नाहीं असं हें—'

बाबलीबाईनींही याचवेळीं एक दीर्घ निश्वास टाकला. 'बापरे! तूं सुद्धां का? कांहो पंत, कांहीं विशेष?'

पंतांनीं बाबलीबाईकडे पाहिलें. त्या खुणेनें त्यांना ' हं सांगा तुम्हीं ' असें सांगत होत्या. पंतांनाही एकदां सोक्षमोक्ष लागायला हवाच होता नी म्हणून त्यांनीं घातली सर्व हकीगत नानूजीच्या कानांवर. बाबलीबाईनींही त्यांना दुजोरा दिला.

नानूजींनीं चेहरा थोडा उतरल्यासारखा केला. त्यांनीं हळूच एकदां दार उघडून बाहेरचा कानोसा घेतला आणि हलक्या आवाजांत ते म्हणाले, ' फार, फार वाईट आहे गोष्ट ही ! खरं सांगायचं म्हणजे, मलाही शंका आली होती ही दोनतीनदां. पण सांपडेल म्हटलं कोण चोरटा आहे तो. पण आतां हें वाढतच चाललं पंत. आतां नाहीं गय करतां उपयोगी. '

बोलतां बोलतां नानूजींनीं हातांतली नोट तशीच नकळत खणांत टाकली. पंतांनीं त्यांना आठवण देतांच ' छे, छे ! पंत राहूं दे. अहो काय तुमचा संशय घ्यायचा कीं काय ? वा, काय गोष्ट आहे. म्हणजे माझाच संशय मला घेतला पाहिजे कीं ! ' त्यांच्या खांद्यावर थापटीत नानूजी म्हणाले.

' इश्श ! कायबाई तरी. अजून कसं लक्षांत आलं नव्हतं माझ्या. त्याच मेल्याचं काम तें नक्की ! ' बाबलीबाई टेबलावर हात आपटीत ओरडल्या. ' तेंच नाहीं का कारटं येतं एकसारखं इथं ? आणि तुम्हीं भोलानाथ ! त्यालाच सांगतां मेल्याला इथें बसायला. त्याचंच असलं पाहिजे हें काम. अगदीं चिऱ्यावरची रेघ ! '

' कोण म्हणतेस, तो किशा ? छट्, शक्य नाहीं तें. ' आपला हात तिच्या पुढून झटकीत नानूजी म्हणाले. जणु काय शंकांची जळमटंच झाडून टाकीत होते ते आपल्या समोरून. ' बागवान साहेबांचा, किशा ! अं हं. मुळींच शक्य नाहीं तें. आपला नाहीं कान हालत. '

' तुझा नसेल हालत. पण माझी पक्की खात्री आहे अगदीं. त्याच पोरट्याचं काम. ' बाबलीबाई जोरानें म्हणाल्या.

' आणि मीं म्हणतों नाहीं. अगदीं शंभरदां नाहीं ! ' नानूजी ठांसून म्हणाले.

' फारच सालस आणि सच्चा आहे छोकरा तो. कोण आहे ? या, आंत या. ' दारावर कोणी तरी ठोकीत होतें.

' ते आपले पाहुणे आहेत का वर, साहेब ? ' किशानें आंत डोकावून विचारलें.

'आहेत वर, जा. नी जातांना जरा येऊन जा हं.' आपल्या वहिणीकडे रागानें पहात ते म्हणाले आणि तो बाहेर गेल्यावर ते परत बोलूं लागले. 'हा पोरगा नी चोरटा ? त्याचा चेहरा बघा नीट, किती निष्पाप आणि सरळ दिसतो तो ! लाखो रुपये देईन मी त्याच्या हातांत वेळ आली तर, अगदीं डोळे मिटून.' —

पंधरा मिनिटांतच किशा जिन्यावरून खालीं आला. नानूजी एकटेच होते आपल्या ऑफिसांत. पण रोजची त्यांची आनंदीवृत्ती दिसत नव्हती किशाला. कसल्या तरी विचारांत व्यग्रच दिसले ते. टेबलावरील कागदांकडे शून्य दृष्टीनें पहात विचार करीत होते कसला तरी ते.

'कांहीं होत आहे तुम्हांला, साहेब ?' किशानें विचारलें. 'फिकट दिसताहांत साहेब फार तुम्हीं.'

'हेः ! काय खूळ आहे काय. मला काय धाड भरली आहे ? चांगला टंच आहे कीं ! हाः हाः ! पण कायरे आपले ते दोस्त कसे आहेत माडीवरले, अं ?'

'ठीक आहेत कीं साहेब.' किशानें उत्तर केलें.

'आनंद आहे, आनंद आहे, आम्हांला. चांगला आहे माणूस मोठा, आणि तुझे मालकही ठीक आहेत ना रे ? लाख माणूस आहे अगदीं, नी मैत्रीलाही मोठा बांका, बरं का किशा, अगदीं मिष्ठास ! आः !!' वकीलसाहेब डोळे मिचकावीत उद्गारले.

'पण हे पंत आले कसे नाहींत अजून. मोठा कामचुकार माणुस बुवा. पण वशिल्याचं तट्टू आहेना बाबा. ए, तुला जरा वेळ आहे कारे किशा ? फार नाहीं वेळ लागायचा, हा आलोंच बघ अस्सा वर जाऊन.' त्याच्या पाठीवर थापटीत ते म्हणाले आणि उत्तराची वाट न पाहतां सटकलेच बाहेर जिन्याकडे.

ते आणि पंत परत आल्याबरोबर किशा बाहेरच पडला. उशीरच झाला होता जरा त्याला. पण दारांतच बाबलीबाई गांठल्या त्याला.

'कोण ? हं हं ! तुझं लाडकं बाळ चाललंय होय ?'

'हो, हो ! मग म्हणणं काय तुझं अं ? सच्चा छोकरा आहे मोठा पंत, खराखुरा सच्चा !' नानूजी उत्तरले.

बाबलीबाई तिरस्कारानें नुसत्या हुंकारल्या.

' हें.बघ बाबल्ये, मला उगाच चिडवूं नको. मी पुन्हां सांगतों तुला, सच्चाच आहे छोकरा तो. माझ्या जिवाचीसुद्धां पैज लावायला तयार आहे मी, समजलीस. पुन्हां बोलूं नको अगदीं. ठाम विश्वास आहे माझा त्याच्यावर नी तसाच राहील तो. किशा म्हणजे—पण ती, माझी—' एकदम आठवण झाल्यासारखें करून नानूजी म्हणाले.

' काय हो, सांपडत नाहीं का काय कांहीं ?' पंतांनीं विचारलें.

' म्हणजे !' घाबऱ्या घाबऱ्या आपले खिसे चांचपीत आणि खणांतील कागद उलथे पालथे करीत नानूजी उद्गारले. ' नोट काय झाली माझी, पांचांची ? इथेंच ठेवली होती आत्तां, नाहीं पंत !'

' बाई माझ्या ! म्हणजे नोट गेली ?' कागद अस्ताव्यस्त खालीं पिस्कारण्यास भावाला मदत करीत बाबलीबाई म्हणाल्या. ' आत्तां कोण ? झालं ना मी म्हटलं तसं ?'

' खरंच गेली म्हणतां कीं काय ?' फिकट चेहऱ्यानें पंतांनीं विचारलें.

' शंकाच नाहीं पंत.' परत धांदलीनें आपले खिसे चांचपीत नानूजी म्हणाले. ' नोट तर गेली. आतां ?'

' पण त्याच्यामागून नका हं जाऊं कुणी. सच्चा बिचारा ! लाऊं दे त्याला वाट तिची एकदांची. बाई, बाई ! शर्थ झाली आतां !' कुत्सितपणें बाबलीबाई उद्गारल्या.

नानूजी व पंत जरा वेळ अगदीं मूढ होऊनच एकमेकांकडे पहात उभे होते. दोघांनींही एकदम मग आपल्या टोप्या डोक्याला घातल्या आणि पळतच सुटले ते बाहेर.

आपला नानूजींनी मोडलेला वेळ भरून काढण्यासाठीं किशाही झपाट्यानें चालला होता. तो पळतो आहे असंच वाटलं असतं कोणाला कदाचित. पण त्याचा नेहमींचा जाण्याचा रस्ता नानूजींना चांगला माहित असल्यामुळें ते त्याच रस्त्यानें पळत सुटले होते. दोन तीन रस्ते ओलांडल्यावर पुढल्या वाकणावर वळतानांच दिसला त्यांना तो. मागें न पाहतांच पळत होता तो.

' थांब किशा, उभा रहा !' त्याच्या खांद्यावर हात ठेवीत नानूजी ओरडले. पंतानीं दुसऱ्या खांद्याचा कबजा घेतला होता. ' पळतो आहेससा रे ?'

'उशीर झाला आहे फार साहेब,' त्यांच्याकडे आळीपाळीनें आश्चर्यानें टकमक पहात किशा म्हणाला.

'मला—हो—म्हणजे तें कांहीं खरं वाटत नाहीं! पण ऑफिसांतून नाहींसें झालें आहे माझ्या कांहीं. तुला नाहींना माहिती कांहीं?' धांपा टाकीत नानूजींनीं विचारलें.

'काय साहेब! अरे देवा! साहेब तुम्हांला नाहींना वाटत—' अगदीं भेदरून जाऊन लटलट कांपतच किशानें विचारलें.

'छे छे, माझ्या वाटण्याचा प्रश्नच नाहीं रे! मी कांहीं म्हणत नाहीं. पण आमच्या बरोबर यायला कांहीं हरकत नाहींना तुझी?'

'हरकत कसली साहेब. चला कीं.' किशानें उत्तर केलें.

'अलबत. हरकत कसली? पण काय गहजब झाला आहे मघांशी मी तुझी बाजू घेतली म्हणून.' नानूजी बोलले.

'आणि तुम्हांला सुद्धां वाईट वाटेल माझ्यावर गहजब केल्याबद्दल. चला साहेब.' किशा म्हणाला.

'हो हो. शुभंच शीघ्रं.' नानूजी म्हणाले. 'पंत तुम्ही पकडा तो हात, नी मी धरतों हा उजवा. नाइलाज आहे! पण केलं पाहिजे सगळं.'

किशा क्षणभर गोंधळला. चिडलाही थोडा. पण थोडक्यांतच त्यानें आपल्याला आवरलें. जर गडबड केली तर खेंचीत न्यायला कमी करणार नाहीं ते, असंच वाटलं त्याला. रस्त्यांत नको तो देखावा. आणि म्हणून गुपचूप चालूं लागला मग तो. डोळ्यांत पाणी आणून गहिंवरल्या आवाजांतच तो त्यांना पुन्हा पुन्हां आपण निरपराधी आहों म्हणून सांगत होता, आणि 'बघा साहेब तुम्हांलाच पश्चात्ताप होईल मागाहून,' असं त्यांना बजावीत होता. थोड्याच वेळांत ते ऑफिसांत येऊन पोंचले आणि बाबलीबाईनींही ते आंत आल्याबरोबर दार आंतून बंद करून टाकलें.

'हें बघ किशा, तूं जर निरपराधी असशील तर सर्वांची तशी खात्री पटणं, मला वाटतं अत्यंत जरूर आहे. तर तुझी जर कांहीं हरकत नसेल तर, झडती घेणं मला वाटतं सगळ्यानांच बरं पडेल.' त्याच्याजवळ जात नानूजी म्हणाले.

'घ्या साहेब, घ्या झडती!' आपले हात वर करून त्यांच्याकडे बाणेदार-

पणानें पहात किशा म्हणाला. ' पण पुन्हां सांगतों साहेब, पश्चात्ताप होईल याचा तुम्हांला जन्मभर. '

' वाईट वाटतं आहे मलासुद्धां किशा, फार वाईट वाटतं ! ' त्याच्या खिशांत नीट चांचपीत नानूजी म्हणाले. ' कांहीं नाहीं पंत इथें. अंहं. कांहीं नाहीं या जाकिटांतसुद्धां. आनंद आहे, आनंद आहे. बरं वाटलं मला ! '

पंत मोठ्या उत्सुकतेनेंच पहात होते या सर्व प्रकाराकडे. बारकाईनें पाहिलं असतां समाधानाची सूक्ष्म छटाही दिसत होती त्यांच्या चेहेऱ्यावर.

' पण पंत, हा रुमाल पहा हो. त्यांत काय असणार म्हणा. पण पाहिलेलं कांहीं वाईट नाहीं. काय हो, काय झालं ? ' पंतांचा ' आश्चर्य आहे बुवा ' असा उद्गार ऐकून नानूजी म्हणाले. पंतांनीं कागदाची बारीक घडी घातलेली नोट त्यांच्या डोळ्यापुढें धरली होती. त्यांना मोठें आश्चर्य वाटलेलं दिसत होतं.

' कुठें, त्या रुमालांत कीं काय. कहर झाला आतां ! ' पंतांकडे व आपल्या बहिणीकडे पहात नानूजी ओरडले.

किशा आश्चर्यानें अगदीं सुद्द झाल्यासारखा उभा होता.

' आणि हा मोह बरं का ! कांहीं नेम नाहीं माणसाचा. कांहीं नेम नाहीं ! कुणाचा विश्वास म्हणून नाहीं ! हूं !! पंत, हांक मारा पोलीसला. आतां दया माया नाहीं. कायद्याचा नी नीतीचा प्रश्न आहे हा. आणि कायदा दया माया जाणत नसतो. पंत, मारा हांक पोलीसला ! '

## १९

चार आठ दिवसांतच किशाचा खटला कोर्टापुढें चालू झाला, आणि किशावर चोरीचा आरोप ठेवला गेला. 'अपराधी कीं निरपराधी ?' या कोर्टाच्या प्रश्नाला किशानें निरपराधी असें ठासून उत्तर दिलें. पण त्याच्या अपराधाचा भरभक्कम पुरावा नानूजींनीं हजर केला होता. पंतांची तर मुख्य साक्ष व बाईची साक्षही पुराव्याला पोषक अशीच होती. किशाच्या वतीनें बागवानसाहेब पुढे आले. पण त्यांनाही किशाचें पूर्ववृत्त कांहींच सांगतां येईना. कारण त्याच्या आईच्या शिफारसीवरच त्यांनीं ठेवला होता त्याला नोकरीवर. आणि त्याच्या पूर्वीच्या मालकानें त्याला नोकरी वरून काढून टाकलें होतें हेंही त्यांना कबूल करावें लागलें.

झालें ! किशाचा अपराध शाबीत धरला जाऊन कोर्टानें शिक्षा ठोठावली आणि कोर्ट उठलें. नानूजी व बाबलीबाई हंसतमुखानेंच बाहेर पडल्या. पंतांचें मन मात्र अस्वस्थ होतें.

पोलीसच्या पाहाऱ्यांत किशा बाहेर आला. अजूनही बिचारा गयावया करीत पोलीसदादांना आपण निरपराधी आहों म्हणून जीव तोडून सांगतच होता. पण पोलीसदादांनीं एक शिवी हांसडून त्याला गचांडी देण्यापलीकडे कांहींच केलें नाहीं !

गरीब बिचारी जनाबाई, बायजाच्या आई बरोबर खालीं कोठडीशीं उभी होती. तिच्या डोळयांतून सारखें पाणी चाललें होतें. किशानें मोठ्या धैर्यानें आपलें मन आवरून तिला धीर दिला. 'त्या परमेश्वराला डोळे आहेत आई. असा धीर नको सोडूं तूं. आज ना उद्यां खरा चोर सांपडेल नी माझा डाग धुतला जाईल आई. अगदीं पक्की खात्री आहे माझी. जा आतां माझे बये, नी जग्या बिग्याला नीट जप हो. आणि हें काय बायजाचे आई ! तुम्हींच दिला पाहिजे धीर तिला आतां. बायजालाही सांगा बरं का कीं लौकरच येईल तुझा किशा परत म्हणून.' आणि मनांतील आवेग लपविण्यासाठीं म्हणून खालीं

चांकून एकदां आपल्या धाकट्या भावाचा मुका घेऊन त्यानें तोंड वळविलें.

त्याच्या त्या पाठमोऱ्या आकृतीकडे आवेगानें पहात जनाबाई मटकन खालींच बसली; तिच्या त्या मृदु मातृहृदयास तो आवेग सहन झाला नाहीं. आणि ' किशा, माझ्या किशा ' असें बडबडत ती बेशुद्ध झाली नी पोरांनीं एकच हलकल्लोळ केला.

तिची ती अवस्था पाहून पंत धांवतच पुढें आले, आणि तिच्या त्या संज्ञाशून्य देहास दोहों हातांनीं उचलून व बायजाच्या आईस मागून येण्यास सांगून, रस्त्यावरील एका छकडयांत त्यांनीं जनाबाईस ठेवलें व छकडा तिच्या घराकडे पिटाळण्यास सांगितलें. त्यांच्या हृदयांत नवीनच अंकुरित झालेल्या दयार्द्र जीवनाचा स्वाभाविक आविष्कार होता तो !

पण छकडयाचें भाडें देण्याइतका सुद्धां त्यांचा खिसा जड नसल्यानें, जनाबाई नीट सावध झाल्यानंतर त्याच छकडयांतून ते नानूजींच्या ऑफिसांत परत आले आणि ' सुटे पैसे घेऊन येतों हं, ' म्हणून छकडेवाल्याला सांगून ते आंत आले. नानूजींनींही त्यांचें हंसत मुखानेंच स्वागत केलें.

त्यांचा मिस्किलपणें हांसणारा चेहरा पाहून पंतांची अस्वस्थता परत चाळवली गेली. किशाला प्रथम पोलीसच्या ताब्यांत दिला त्या दिवशींच पंतांना आपल्या या लाघवी, गोडबोल्या मालकाच्या नीचपणाची अंधुक शंका आली होती. आणि नुकत्याच घडलेल्या त्या दुर्दैवी कुटुंबावरील आघातानें व नानूजींच्या त्या आसुरी आनंदानें जरा जोरानेंच ती अस्वस्थता आतां त्यांना सतावीत होती. आणि म्हणून अगदीं मोजक्या शब्दांतच त्यांनीं पैशाची मागणी केली.

' हो हो, जरूर; अगदीं जरूर ! अहो पोट हें सगळयांनाच आहे पंत. मोठं वाईट आहे नाहीं हें पोट ? आहे किती छोटं, पण भूक काय प्रचंड ! हो, पण पंत, मोड आहे का थोडी ? ' नानूजींनीं विचारलें.

' नाहीं बुवा. ' पंत उत्तरले.

' कांहीं हरकत नाहीं. आहेत; आहेत तुमच्या पुरेसे. हं ! हे घ्या पंत आणि हें पहा—' त्यांचे हातावर पैसे ठेवीत नानूजी म्हणाले.

पण पंत या वेळीं दाराशीं पोंचले होते. ते परत मागें वळले.

' असं म्हणत होतों मी पंत, आतां नाहीं घेतलीत तसदी परत येण्याची, तरी चालेल. ' नानूजी म्हणाले.

पंतांनीं प्रश्नार्थक मुद्रा केली.

‘ म्हणजे असं. ’ कोटाच्या खिशांत हात घालून खुर्ची मागील पायावर हलवीत नानूजी परत बोलूं लागले, ‘ कीं, फुकट कुजतो आहे तुमच्यासारखा माणूस या इथें. शुद्ध अपव्यय आहे हा तुमचा बुद्धिमत्तेचा पंत; शुद्ध अपव्यय ! आणि, घोर अपराधी ठरेन मी परमेश्वराकडे याबद्दल. कारण अधिक व्यापक, अधिक विशाल पाहिजे कार्यक्षेत्र तुमच्या अलौकिक बुद्धिमत्तेला, या नीरस नी एकसाची धंद्यापेक्षां. मात्र मधून मधून पायधूळ झाडीत जा हं या गरीबाकडे. बाबलीलाही बरं वाटेल जरा त्यानें. आणि आपला लोभ मात्र टिकवायचा हं कायम. मी नाहीं बुवा विसरणार तुम्हांला. माझा आपला स्वभावच तो. बरं ! नमस्ते पंत ! ’

या सर्व चीड आणणाऱ्या बडबडीला एक अवाक्षरानेंही उत्तर न देतां एकाद्या धीरोद्धत पुरुषाप्रमाणेंच त्यांच्याकडे नुसत्या तिरस्कारानें दृष्टीक्षेप करून पंत ऑफिसच्या बाहेर पडले.

* * * *

त्या रात्रभर तळमळत होते पंत आपल्या आंथरुणावर. चांगलाच ताप भरला होता त्यांना आणि आपल्या मस्तकांत कोणी तरी प्रचंड घणाचे घाव घालीत आहे असंच त्यांना वाटत होतं. या कुशीवरून त्या कुशीवर, हजार तऱ्हेनें पाहिलं त्यांनीं निजून; पण व्यर्थ. सर्वांगही कसें कसकसतें आहे असें वाटत होतें. सगळी खोली त्यांच्याभोंवती जणूं काय गरगरत होती. डोळ्यांपुढें अनंत काजवे चकाकताहेत आणि क्रमाक्रमानें असंख्य लहान मोठे तेजोगोल आपल्या आंगाभोंवती भिरभिरी पिंगा घालीत आहेत, नी दूरदूर हेलावत जात दिसेनासे होऊन त्यांच्या जागीं एक मोठें प्रचंड, भयाण, वैराण वाळवंट आपल्या भोंवतीं पसरलं आहेसं वाटलं त्यांना. हिरवळीचा एक वीतभर तुकडा सुद्धां डोळ्यांना दिसत नव्हता त्यांच्या. किती वेळ तरी नाचत होतं त्यांच्या दृष्टीसमोर हें दृश्य. आणि मग सर्वच अंधुक होत जाऊन भयाण, मिट्ट काळोख त्यांच्या भोंवतीं पसरला नी त्यांना कांहीं दिसेनासें झालें !

......आतां ते चांगले जागे झाले होते; आणि मिळालेल्या मनःशांतीमुळें,

किती त्रासदायक होती कालची रात्र, आणि ती सुद्धां न संपणारी, असंच त्यांना आतां वाटत होतें. त्याचाच विचार चाललेला होता त्यांचा. त्या विचाराच्या भरांतच त्यांनीं आपला हात वर उचलला. आः! किती जड; पण दिसतो आहे किती बारीक! आश्चर्यच वाटलें त्यांना. काय बरं झालं? त्यांचा विचार परत चालू झाला. सर्वांगभर त्यांच्या ग्लानी पसरली होती नी, सुखद वाटत होतं मोठं त्यांना असं स्वस्थ पडून राहण्यांत. कोणाच्या तरी खोकण्याचा आवाज झाला. रात्रीं आपण दार मोकळंच टाकलं होतं कीं काय. कोण आहे दुसरं आपल्या खोलींत?......पण विचारमालिका सरळ चालूं शकत नव्हती. डोळे शून्यपणें भिरभिरत अंगावरील हिरव्या पांढऱ्या पट्ट्यांच्या चादरीवर जरा स्थिरावले. सुंदर, चिमुकल्या पाऊल वाटांनीं भरलेल्या हिरव्यागार कुरणांतून त्यांचा मनःसंचार सुरू झाला. त्या हिरव्यागार कुरणापलीकडील ती अगदीं दूर, दूर, क्षितिजावर असणारी ती स्फटिक शुभ्र इमारत त्या अंधुक उजेडांत किती मोहक दिसत होती!

प्रसन्न अंतःकरणानेंच पंतांचा संचार त्या कुरणांतून चालला होता. परत कोणीतरी खोकल्याचा आवाज झाला. आणि मळलेल्या पाऊलवाटांचें कुरण अदृश्य झालें नी पट्ट्यांची ती चादर परत डोळयांना दिसूं लागली. पंतानीं मान जरा उचलून, पडल्या पडल्याच मच्छरदाणी जरा बाजूला करून बाहेर पाहिलें.

मेणबत्तीचा मंद प्रकाश भोंवती पसरला होता. होय. आपलीच खोली ही! पण काय उलथा पालथ झाली आहे ही! किती सुबक, नीटनेटकी लावलेली दिसत होती आतां ती. कपडयांच्या घडया दांडीवर नीट घातलेल्या दिसत होत्या. आजाऱ्याच्या शुश्रूषेचें सामान जवळच ठेवलेलें दिसत होतें आणि खोलींत कोलन वॉटरचा मंद सुगंध दरवळला होता. कोण? राणी? होय, तीच! स्वस्थपणें पेशन्सचा डाव लावीत बसली होती ती. आणि तीच अगदीं हलक्या आवाजांत मधून मधून खोकत होती.

आश्चर्यानें चकित होऊनच पंतानीं उशीवर परत डोकें टेकलें. 'स्वप्नांत आहे कीं काय मी? इतके बारीक कशानें झाले माझे हात. असे नव्हते ते झोंपण्यापूर्वी. म्हणजे? ही काय जादू झाली? का झोंपेतच आहें मी अजून. अयाई! चिमटा समजतो आहे कीं मला, नी हें सर्व तर खरं खरंच दिसतं आहे कीं! राणीच आहे ही. पण ही इथें कशी आली? अं? मोठी मजा आहे बुवा!' परत चिमटा

घेतला त्यांनीं मांडीला नी चांगलाच कळला त्यांना तो. खात्री पटली त्यांची आतां.

'नक्की आपलीच खोली आहे ही नी आपण पण चांगले जागे आहोंत. पण जरा मजा करूंया हं राणीची,' असं म्हणून स्वस्थपणें पत्त्यांच्या पानांकडे ते जरा वेळ पहात राहिले. आणि राणीला जरा घुटमळलेली पाहतांच 'अग राणी, तो बदाम दहिल्या लाव कीं; अशी बघतेस काय बावळ्या-सारखी.' असें मोठ्यानें तें ओरडले.

राणीनें दचकून उडीच मारली आपल्या जागेवरून; आणि आनंदानें टाळ्या पिटीत नाचतच गेली ती त्यांच्या कॉटजवळ.

'ए राणी, मला सांग अगोदर, माझा हा आवाज इतका बारीक कशानें झाला नी हातावरचं हें मांस कुठें पळालं ?'

राणीनें नुसती मान हलविली. तिचे डोळे पाण्यानें डबडबले होते.

'मी आजारी होतों काय राणी ?' क्षीणहास्य करीत पंतांनीं विचारलें.

'इश्श ! सांगायला का पाहिजे ! आजारी म्हणजे काय ? बाई, बाई ! नी बडबडत काय होतांत कांहीं बाहीच;' भरल्या डोळ्यांनींच पण हंसत हंसत राणी म्हणाली. 'कृपाच आहे मोठी देवाची. मला नव्हतं वाटलं यांतून उठाल तुम्हीं म्हणून.'

'किती दिवस ग आजारी होतों मी ?' पंतांनीं जरा वेळ थांबून विचारलें.

'तीन वार होतील उद्यां आतां.'

'किती ?' पत आश्चर्यानें उद्गारले.

'बाई बाई ! तीन वार म्हटले हो मी. अगदीं पुरे पुरे तीन वार बरं का.' राणी उत्तरली.

पंत परत स्वस्थ आढ्याकडे पहात पडले. विचारचक्र पुन्हां पुन्हां सुरूं झालें होतें त्यांच्या डोक्यांत. त्यांच्याकडे प्रेमभरानें पहात राणी उगाचच त्यांच्या भोंवतीं कांहींतरी करीत लुडबुडत होती. मध्येंच तिनें त्यांच्या हाताला व कपाळाला हात लाऊन पाहिला नी समाधानाचा एक मोठा सुस्कारा सोडला. आणि मग 'इश्श, अशी बसलें काय मी. चहा द्यायचा आहे कीं अजून,' असें म्हणत ती चहाच्या तयारीला लागली.

नुकत्याच आलेल्या ताज्या पावाचे पातळ तुकडे करून त्यांच्यावर मोठ्या चपळाईनें तिनें लोण्याचा हात फिरवला आणि चहाचा कप व पाव तिनें

पंतांच्या पुढें ठेवले. मानेखालीं दोन उशा घालून त्यांना जरा तिनें बसते केले. एकाद्या परिचारिकेच्या कुशलतेनेंच तिचा सर्व व्यवहार चालला होता. पंतही मोठ्या कौतुकानेंच तिच्या या हालचालीकडे पहात होते. कुठून पैदा केली ही सर्व अक्कल या पोरीनें, असेंच जणुं ते आपल्याशीं म्हणत होते. कांहीं विलक्षण गोडी वाटत होती त्यांना त्या चहापावांत आज. राणीकडे कृतज्ञतेनें पहात पहात पुढील जिनसांचा ते समाचार घेत होते.

सर्व कांहीं नीटनेटकें आहे असें दिसल्यावर हातांत चहाचा कप घेऊन राणीही त्यांच्या शेजारीं येऊन बसली.

' राणी, आपल्या बाबलीबाई कशा काय आहेत ? '

राणीनें मिस्कीलपणें तिरक्या नजरेनें त्यांच्याकडे पहात मान हलवली.

' मान काय हलवतेस अशी ? भेटल्या नाहींत तुला त्या ? ' पंतानीं विचारलें. ' म्हणजे काय समजूं मी ? '

' इश्श ! म्हणजे काय, काय ! पळुनच आल्यें तिथून मी मुळीं ! ' राणी मान वेळावीत परत मिस्कीलपणें हांसली.

पंत परत अंथरुणावर पडले. चीतच झाले होते ते, राणीच्या या बोलण्यानें. जरा वेळानें त्यानीं राणीकडे वळून विचारलें. ' पण राहत्येस कुठें तूं राणी ? '

' बाई बाई ! शर्थ झाली आतां ! म्हणजे काय विचारणं. इथेंच नाहीं का राहात मी ? ' इथ्थेंच राहत्यें हो मी या खोलींत.' राणी हंसत हंसत उद्गारली. ' आतां तरी कळलं का ? '

पंतानीं नुसता आश्चर्यदर्शक ' ओः ! ' असा उद्गार काढला, आणि डोक्यावर एकादा सणसणीत टोला बसल्याप्रमाणेंच त्यानीं उशीवर मान टाकली.

त्याच्याकडे चोरून पहात पहात राणीनें आपला चहा संपवला आणि ती भांड्यांची आवरा आवर करूं लागली. तिचें काम चालू असतांच पंतानीं तिला हांक मारलें. ' हें बघ राणी, इकडे ये अशी. सगळं कांहीं मला नीट सांग पाहूं. माझ्या डोक्यांत कांहीं प्रकाश पडला नाहीं नीटसा अजून. पण इथें यायचा विचार कसा आला तुझ्या डोक्यांत ? '

' इश्श ! एवढं पण नाहीं का समजत ? तुम्ही गेलांत नी मग कीं नाहीं मला अगदीं मुळीं करमेना तिथें. तो वरचा बिऱ्हाडकरूही गेला कुठें निघून. कुणाला विचारावा तुमचा पत्ता. मला कांहीं समजेना. रडकुंडीस आलें मी

अगदीं. पण एक दिवस सकाळीं मी अशी—'

'मी अशी दाराशीं चोरून उभी होत्यें, हं सांग कीं' तिला जरा अडखळलेली पाहून पंत म्हणाले.

'हो हो! दाराशींच उभी होत्यें चोरून! नी मग मी ऐकलं की तुम्ही इथें राहतां आणि फार फार आजारी आहांत नी माणूस पण नाहीं तुमच्या जवळ दुसरं कोणी. "पण" नानूजी म्हणत होते, "आपल्याला काय करायचं आहे;" आणि त्यांच्या बहिणाबाईही मग म्हणाल्या, "आहे मोठा गमत्या माणूस; पण आपल्याला काय करायचं आहे." आणि मग त्या रात्रींच पळ मारली मी नी आल्यें इथें तडक. तुमची नातेवाईक आहें म्हणून सांगितलं मी खालीं, आणि इथेंच आहें नी काय मग तेव्हां पासून.'

'अरे अरे! गरीब बिचारी राणी. इथं झिजते आहे माझ्यासाठीं!' पंत उद्गारले.

'अंहं! असलं नाहीं हं कांहीं बोलायचं; सांगून ठेवतें. इश्श! त्यांत काय मोठंसं. मला किनइ, आवडतं असं काम करायला. पण आतां तुम्ही गप्प बसा पाहूं. डॉक्टरनीं सांगितलं आहे कीं अजून त्रास घ्यायचा नाहीं तुम्ही. स्वस्थ, अगदीं स्वस्थपणें पडून राह्यचं डोळे मिटून. हं, मिटा पाहूं डोळे. ही मी बसतें हं तुमच्याजवळ आतां. मिटा डोळे.' राणीनें सांगितलें.

आतांपर्यंतच्या बोलण्याच्या श्रमानें पंतानांही थोडा थकवा आला होता. राणीनें त्यांच्या कपाळावर हात ठेवला नी पांच मिनिटांतच त्यांना स्वस्थ झोंप लागली.

तासाभरांतच परत जागे झाले ते. आपल्या डोक्यावरून त्यांनीं एकदां हात चोळला आणि एकदम कांहींतरी आठवल्यासारखें करून ते म्हणाले, 'राणी, त्या किशाचं काय झालं ग?'

'इश्श! तुम्हांला नाहीं का माहीत त्याला शिक्षा झाली तें?'

'आणि त्याची आई ग, तिचं कसं काय आहे?' पंतांनीं विचारलें. त्यांच्या परिचारिकेनें मान हलवून आपल्याला कांहीं माहीत नाहीं म्हणून सांगितलें.

'पण तुम्ही जर स्वस्थ पडाल नी आपल्याला कांहीं त्रास करून घेऊन परत ताप आणणार नसाल, तर सांगेन हळु हळू—पण आत्तां नाहीं हं,' राणी पुढें हळूच म्हणाली.

‘ सांग ग राणी. तेवढंच जरा बरं वाटेल मला. ’ पंत बोलले.

‘ हो ! वाटेल तर काय झालं ! पण मला समजतं आहे तुमच्यापेक्षां जास्त बरं का. दम धरा थोडा बरे होईपर्यंत नी मग सांगेन हां सगळं. ’ राणी जरा काळजीच्या स्वरांत म्हणाली.

पंतांनीं अतीशय आतुरतेनें तिच्याकडे टक लावून पाहिलें. आधींच खोल गेले होते ते डोळे. भीतीच वाटली राणीला त्यांची. तिनें त्यांना शांत करण्याचा प्रयत्न केला. पण आतांपर्यंत मिळालेल्या अपुऱ्या माहितीनें पंतांची उत्सुकता अधीकच वाढली होती. नव्हे, एक प्रकारचें भयच वाटूं लागलें होतें त्यांना; नी म्हणून काय तो सोक्षमोक्ष होऊं दे एकदां असंच म्हणाले ते राणीला.

‘ इश्श ! सोक्ष मोक्ष कसला त्यांत. तुमचा कांहीं संबंध नाहीं त्यांत, ’ राणी म्हणाली.

‘ मग कुणाचा ? त्या—पण दाराच्या फटींतूनच चोरून ऐकलंस ना तूं सगळं ? ’ पंतानीं अधीरपणें विचारलें. त्यांनीं राणीचा हात आवेगाच्या भरांत घट्ट पकडला नी तिला जरा पुढे—आपल्याजवळ ओढली. ‘ हं बोल झटपट आतां. लांबण नको लाऊं उगाच. नाहीं तर बघ मग ! ’ ते पुढे म्हणाले.

‘ सांगत्यें, सांगत्यें ! पण माझा हात सोडा पाहूं आधीं; अयाई ! तुम्हांला काय सांगितलं होतं मी; त्रास करून घ्यायचा नाहीं म्हणून सांगितलं होतं ना ? मग इतकं नाचायला काय झालं तुम्हांला. बघा आतां, जर पुन्हां असा धिंगाणा घालायला लागलात किं नाहीं, तर कांहींच सांगणार नाहीं मग नी निघून जाईन इथून मुळीं. समजलं ना ? ’ राणीनें बजावलें.

‘ अश्शी धरून ठेवीन तुला घट्ट; मग कशी जाशील ! पण—शहाणीच आहे आमची राणी मुळीं. सांगणारच ती आम्हांला—नाहीं तरी, हं ! ’ पंत खट्याळपणें म्हणाले.

‘ तर तर ! काय पण ! ’ राणीनें मान वेळावली आणि जरा वेळानें ती सांगूं लागली.—

‘ तुम्हांला माहीत आहे पंत, स्वयंपाकघरांतच निजत असें मी नेहमीं—आपण खेळत असूं ना हां, तिथेंच. बाबलीबाई नेहमीं बाहेरून दार लाऊन घेत असत. दिवा सुद्धां घेऊन जायच्या त्या आपल्या बरोबर नी एकटी निजायची मी त्या अंधारांत. सकाळपर्यंत कांहीं त्या उगवायच्या नाहींत कधीं.

किती भीती वाटायची मला तिथें. अगदीं अर्धमेली होऊन जायची मी ती बया येईपर्यंत. मला आपलं नेहमीं नेहमीं वाटायचं कीं जर या बयेनें बाहेरून कुलूप लाऊन घेतलं आणि घराला आगबीग लागली तर आंतल्या आंत सागुती व्हायची माझी. कांहीं पत्ता सुद्धां नाहीं लागायचा कोणाला. पण म्हणतात ना, देवालाच मेली काळजी ! एक जुनी किल्ली सांपडली मला त्या कुलपाची. अगदीं बरोबर लागली ती त्याला, नी मग माझा जीव थोडा भांड्यांत पडला. कारण दारावरच्या गजांतून हात बाहेर काढता येत होता माझा. इतके दिवस कसं नव्हतं ध्यानांत आलं माझ्या, देव जाणे बाई ! पण आतां त्यानंच सुचवलं सगळं, वेळ आली तशी.'

—' आणखी तुम्हांला पण माहीत आहे पंत. ती बया खायला सुद्धां पोटभर घालायची नाहीं मला. अश्शी उपासमार करायची माझी रोज. पण आतां दाराची किल्ली सांपडल्यानंतर, सगळ्यांची निजानीज झाली कीं हळूच बाहेर यायची मी. आणि काय भाकरी तुकडा कुठें मिळेल पडलेबिडलेला तर तोच खायची मी. तुम्हांला खरं सुद्धां नाहीं वाटणार, लिंबाचीं सालं सुद्धां पाण्यांत कुसकरून पीत असें मी तें. सरबतच माझं तें ! तुम्ही चाखलं आहे कधीं असलं अमृत ? '

' नाहीं बुवा, आमच्या दुर्दैवानें नाहीं मिळालं चाखायला अजून ! ' पंत सहानुभूतीपूर्वक तिच्याकडे पहात हंसून म्हणाले.

' बरं झालं बाई, नाहीं चाखलंत तें ! नाहीं तर माझ्या पाठीसच लागले असतेत तसलं सरबत कर म्हणून.' राणी खट्याळपणें पण किंचित् कडवटपणें म्हणाली. ' पण तें जाऊं दे. कधीं कधीं तीं दोघं झोंपण्याच्या पूर्वीसुद्धां येत असें मी आपल्या कोंडवाड्या बाहेर. हो आणि लपवून कशाला ठेऊं, सेफच्या किल्लीची जागा बघायलाच येत असें मी. आणि, मला वाटतं किशावर तो गंहजब झाला ना, त्याच्याच आधीं असेल दोन तीन दिवस. अशीं समोरा समोर बसलीं होतीं तीं बहीण भावंडं त्या दिवशीं टेबलाजवळ बोलत.'

' नानूजींचा आवाज येत होता. " धोक्याचंच आहे थोडं हं, बाबल्ये ! माझं कांहीं मन घेत नाहीं. " " पण तुझं मुख्य कूळ आहे ना भैरवनाथ ? " बाई म्हणाल्या. " असं तर खरं, " नानूजी बोलले. " मग त्यांची जर इच्छा आहे तर, मी म्हणत्यें आपल्याला काय अडचण आहे किशाला अडकवा-

यला ? " बाई म्हणाल्या. आणि मग बराच वेळ त्यांचं कांहींतरी खलबत चाललं होतं. मधून मधून फिदी फिदी हंसतही होतीं तीं भुतं. नानूजींनीं मग पांचाची नोट काढली एक बाहेर खिशांतून आणि म्हणाले " हें बघ बाबल्ये, उद्यां येईल सकाळीं तो पोरगा. तो वर गेला कीं तूं जा निघून नी मीं पंतानाही पाठवीन बाहेर. आणि मग त्याला बोलण्यांत गुंतवून ही नोट टाकीन त्याच्या खिशांत अलगत. करामत तर बघ माझी. पंतांनाच सांगेन मग त्याचा झाडा घ्यायला कीं झालाच आयता साक्षीदार तयार. अगदीं सोळा आणे काम ! " ती बयाही खूष होऊन हंसली खदखदां नी मग उठलीं तीं दोघंही. मीही निसटलें मग तिथून हळूच. झालं आतां ! '

' शाब्बास राणी ! जीते रहो ! पण बोलली बिललीस नाहींस ना कुणा-जवळ ? ' पंतानीं अधीरपणें विचारिलें.

' इश्श ! सांगेन कशी ? एवढी काय ही आहें कीं काय ? पण मला आपलं वाटत होतं कीं, बिचारा सुटेल तो.' राणी जरा फणकाऱ्यानेंच म्हणाली.

' राणी, ' पायांवरील पांघरूण दूर फेंकून पंत म्हणाले, ' बाहेर जरा हवा कशी आहे बघ पाहूं. मी उठणार आहें थोडा.'

' छे छे ! असं नाहीं हो कांहीं करायचं.' त्यांची परिचारिका एकदम ओरडली.

' अं हं !' उठलंच पाहिजे मला. कपडे कुठें आहेत माझे ?' पंतांनीं खोलीभर इकडे तिकडे पहात म्हटलें.

' कशी झाली ! कशी झाली एका माणसाची ! ' एकाद्या लहान बालकाप्रमाणें टाळ्या पिटीत राणी म्हणाली. 'विकून टाकले सगळे ते, तुमच्या औषधपाण्यासाठीं पण एवढं नको कांहीं त्याचं वाटायला. उभें सुद्धा राहवणार नाहीं तुमच्यानें.'

' खरं आहे तूं म्हणतेस तें राणी ! नाहीं खरंच माझ्यानें उभें राहवत ! पण आतां ?' पंत हळहळून म्हणाले. ' पण असं केलं तर ? बागवानसाहेबांना कळवूंया आपण आधीं. ते अनंतराव असतील अजून बागळ्यांच्या ऑफिसांत.'

' खरंच ! तसंच करूंया गडे. मला द्या पत्ता लिहून त्यांचा. मी काढीन शोधून त्यांचं घर, ' राणी उल्हासानें म्हणाली.

आणि मग थोड्याच वेळांत पंतांनीं लिहिलेला पत्ता घेऊन, राणी बागवानांना आणण्यासाठीं धांवतच बाहेर पडली.

---

# २०

खिडकीजवळ घातलेल्या कॉटवर पडून विमनस्कपणें बाहेरील देखाव्याकडे नली पहात होती. आकाश जरा अभ्राच्छादितच होतें. लहान मोठे, काळे पांढरे मेघखंड हलक्या पावलांनीं आकाशाच्या विस्तीर्ण पटांगणांत पाठशिवणीचा खेळ खेळत होते. क्षणांत त्यांच्या आवरणाखालीं सूर्य पार झांकोळला जाई, तर दुसऱ्याच क्षणीं त्या आंगाभोंवतीं गर्दी करणाऱ्या मेघखंडांना तो पार दूर झिंझाडून टाकीत होता. अवखळ मेघांच्या त्या खेळानीं त्रासल्यासारखाच दिसत होता जरा तो.

असाच नाहीं का गेला आतांपर्यंतचा आपला जीवनक्रम; नली विचार करीत होती. आपल्याला समजायला लागल्यापासून असाच नाहींका आपणही पाठशिवणीचा खेळ खेळत आहोंत सुख दुखाशीं. असेच नाहींका या सूर्यासारखे आपणही वैतागून गेलों आहोंत या खेळानें. पण त्या बिचाऱ्या सूर्याला तरी कुठें आशा दिसते आहे यांच्या तडाक्यांतून सुटण्याची! संपतच आला आहे प्रवास त्याचा आतां; नी आपलाही? विचार करवेना तिच्यानें आतां पुढें. खिन्नपणें तिनें आपले डोळे झांकून घेतले.

इथें आल्यापासून आजारी आजारी, अशीच होती अलीकडे ती. श्रमातिरेकानें नी भावनातिरेकानें बाबजी मास्तरांच्या पायाजवळ ती बेशुद्ध पडल्यापासून तिची प्रकृती ढांसळलीच होती. तिच्या नाजूक देहाला ते सर्व श्रम आणि चिंतेची दाहक गांजणूक चांगलीच जाणवली होती. भटकंतीचा त्रास मात्र आतां तिच्या पाठचा संपला होता आणि आजोबांची काळजीही थोडी कमी झाली होती. किती समाधानाचा निश्वास टाकला होता तिनें इथें आल्यानंतर! मोहाच्या तडाक्यांतून तिनें त्यांना अचानक बचावलें होतें. अजूनही ती काळ रात्र आठवली कीं तिच्या आंगाचा थरकांप होत असे. मास्तर जर त्या काळांत आपल्याला रस्त्यांत गांठले नसते, तर एखाद्या भणंग

भिकाऱ्यासारखाच आपलाही देह कोल्ह्याकुत्र्यांच्या भक्षस्थानीं पडल्याशिवाय राहिला नसता. किती भयंकर वाटे तिला तो विचार!

पण देवदूतासारखेच मास्तर दिसले होते त्यांना वाटेंत. त्या पुण्यहृदयी माणसानें पोटच्या पोरीसारखी घेतली होती तिची काळजी. आपले शाळेचें नी पोटापाण्याचें काम आवरले कीं ते नेहमीं बाकी सगळा वेळ तिच्या भोंवती भोंवती काढायचे. कांहीं काळ मूर्च्छित झालेलें त्यांच्या अंतःकरणांतील पितृवात्सल्य भर वेगानें आतां वाहूं लागलें होतें. त्या बालजीवाचें मोठें कौतुक वाटत असे त्यांना. किती धैर्यानें आणि शहाणपणानें तिनें आपल्या आजोबाना वटावलें होतें सर्व वावटळींतून, असें ते नेहमीं म्हणायचे वामन-रावांना. आणि वामनरावही सरळ अंतःकरणानें त्याला मान तुकवायचे.

रात्रीं तर रोज गप्पांचा अड्डा पडायचा नलीच्या खोलींत. जेवणींखाणीं झालेलीं असायचीं आणि झोंपही कुणाला लौकर नाहीं यायची. वामनराव नी बाबजी मास्तर दोघेही बहुभाष आणि बहुश्रुत. रात्रीची प्रशांत नी निश्चित वेळ, आणि दिवसही थंडीचे. छोट्या नलीसारखा दोघांचा लाडका रसिक श्रोता नी मग एकदां दोघांच्या वाक्गंगेचा ओघ वाहूं लागला कीं, अकराही वाजून जायचे कधीं कधीं. नली बिचारी आपल्याशींच हंसत केव्हांच झोंपी गेलेली असायची. शास्त्रीबुवाच्या 'अहो वामनराव उठा आतां' या घनगंभीर हाकेनें ते जागे व्हायचे नी मग नलीकडे दृष्टी जातांच आपली जीभ चाऊन हलक्या पावलांनींच बाहेर निघून जायचे.

रोजचा अगदीं यांत्रिक कार्यक्रम होता हा त्यांचा. आजोबा मात्र या सर्व संभाषणांत कांहींच भाग घेत नसत. स्वस्थपणें हातावर डोकें टेकून या वाक् गंगेचा प्रवाह ते आपल्या आंगावरून वाहूं देत. या कशानेंच त्यांची चित्त-वृत्ती विचलीत होत नसे. कोणत्या तरी निराळ्याच जगांत स्वैर संचार चालत असे त्याचा, अगदीं मूकपणें. रोजचा रात्रीचा कार्यक्रम सुटल्यामुळें चुकल्या चुकल्यासारखें वाटे त्यांना प्रारंभीं. पण मग त्यांच्याही आंगवळणीं पडत चाललें होतें सगळें. नली पहात होती हें सर्व, आणि त्यांच्यांत पडत चाललेल्या या इष्ट फरकानें तिला बरेंच वाटत होतें. पण आजोबांची मात्र अस्वस्थता आतां वाढूं लागली होती. तिच्या नाजूक देहाची झालेली ती हलक अवस्था त्यांच्या अंतःकरणाला भिववीत होती. काहींबाहींच विचार त्यांच्या मनात अशावेळीं

थैमान घालूं लागत नी ते व्यथित मनानें तिच्या त्या क्षीण देहाकडे तास न् तास पहात बसत. त्यांचे समोर चाललेल्या वादविवादाचे शीतल मंद किंवा तुफानी वारे त्यांच्या मनःसागरावर एकादा सुद्धां तरंग उठविण्यास पार असमर्थ ठरत !

अशीच रोजच्या सारखी पडली होती आजही ती कॉटवर स्वस्थपणें. पण कां कोण जाणे, किशाचा विचार राहून राहून तिच्या मनांत एकसारखा उभा रहात होता. किती भाबडा होता बिचारा नी किती आनंदी ! कसा एकाद्या निष्पाप बालकासारखा हंसायचा तो आपले डोळे बारीक करून. काय काय चुका करायचा आपण शिकवीत असतां त्याला. आणि किती चिडवीत होतों आपण तरी त्याला, पण तो कांहीं चिडला नाहीं कधीं. किती काळजी घेतसे आपली नी आवडायचाही मला तो फार. काय वाईट वाटलं त्याला तेव्हां, उद्यां येऊं नको म्हणून मी म्हटल्याबरोबर. गरीब बिचारा ! पण आपण तरी काय करणार. आजोबा नव्हते का चिडले त्याच्यावर अतीशय ? डॉक्टरनींच सांगितलें आपल्याला त्यावेळीं तसें. भेटेल का कधीं आपल्याला पुन्हां तो.

किशाचे पाठोपाठच भैरवनाथाची भेसूर मूर्ति तिच्यापुढें उभी राहिली. अजूनही त्याचें तें विकट हास्य कानांत घुमत आहेसें वाटलें तिला. गरीब बिचारी भामाबाई ! काय करीत असेल बिचारी या राक्षसापुढें ? मांस सुद्धां दिसत नव्हतें तिच्या आंगावर मुळीं. वाघापुढल्या शेळीचीच अवस्था बापडीची.

किती वेळ चालले असते तिचे विचार कोण जाणें. पण रोजच्या सारखीच वामनरावांची नी मास्तरांची दुकल आंत आली. मास्तरकाका आणि बुवाकाका म्हणून म्हणायची त्यांना ती. वामनराव ब्रह्मचारी असल्यानेंच बुवाकाका म्हणून नांव दिलें होतें तिनें त्यांना.

‘ काय म्हणत्ये तब्बेत नलुताई, आणि विचार कसला चालला होता अगदीं गंभीरपणें ? आम्हांला तरी सांगा, म्हणजे आम्हींही होतों थोडे गंभीर, ’ लांब चेहरा करीत वामनराव म्हणाले.

‘ इश्श, गंभीर काय नी काय काय ! आणि तुम्हीं गंभीर होणार ना, बुवाकाका ? ’ हंसत नलीनें विचारलें.

‘ म्हणजे, अशक्य आहे कीं काय मला तें, एं ? असा थोडा चेहरा

सुतक्या सारखा करून स्वस्थ बसलं कीं झालं, बनलों गंभीर ! खरें कीं नाहीं मास्तर ? ' वामनराव मास्तरांकडे पहात म्हणाले.

' वा, वामनराव ! खासा दिलात कीं ! ' मास्तर हंसत उद्गारले. नलीच्या चेहऱ्याकडे निरखून पहात होते ते. थोडी अधीक थकल्यासारखी दिसत होती ती त्यांना आज.

' अहो पण नलुताई, प्रश्नाचें उत्तर राहिलेंच कीं. कसला विचार चालला होता ? ' वामनरावानीं परत विचारलें.

' कसला नाहीं हो मोठासा. कांहीं तुमचें तें राजकारण नाहीं कीं वेदांत नाहीं. त्या भैरवनाथाच्या बायकोची आठवण झाली होती. '

' कां बुवा ? '

' सहजच ! कशी बिचारी दिवस कंठते आहे त्याच्याजवळ, मोठें नवल वाटतें मला. मेला राक्षस आहे नुसता ! छळून छळून खात असतो तिला नेहमीं. त्याच्याशीं बोलतांना सुद्धां कांपत असते बिचारी. कुठें घराबाहेर पडणं नाहीं कीं कुणीकडे जरा जाणं नाहीं. सक्त नजर–कैदच जन्माची. पण आपण मात्र मेला कुठं तरी गटारं हुंगीत हुंदाडत असायचा नेहमीं ! आणि घरांत असला कीं अगदीं सारखा गुरगुरत असायचा. जरा कुठें कमी जास्त झालं कीं आलाच एकम वस्कन आंगावर कुत्र्यासारखा. कितीही जीव तोडून केलं बिचारीनें तरी, केव्हां लहर फिरेल बुवाची नी लागेल अचकट शिव्या द्यायला कांहीं नेम नाहीं. कठीण आहे अशा बायकांचा जन्म हो खरंच ! कुत्र्याचं जिणंसुद्धां बरं या परीस. " नली म्हणाली.

' अग, तुमची बायकांची म्हणच आहे ना मुळीं कीं, साप म्हणूं नये बापडा, नी नवरा म्हणूं नये आपला म्हणून. केव्हां बुवाजी फुस्स करतील कांहीं नेम नाहीं. ' मास्तर म्हणाले.

' खरें आहे थोडें फार तुम्ही म्हणतां तें मास्तर. पण अर्धसत्य आहे हें; पूर्ण नव्हे. ' वामनराव सांगूं लागले. ' बायकाही कांहीं कमी असतात असं नाहीं; जिजाईच्याही वर ताण असते त्यांची. आणि सगळयांनाच कुठचे शांतिब्रह्म तुकाराम मिळायचे ? सामान्य माणसं असायचींच कीं आमच्यासारखीं, नी त्यांचे हाल मग कुत्राही खात नाहीं. त्याला बिचाऱ्याला तर आणखी अब्रू सांभाळायची असते. '

‘ श्रीधरपंत सत्यभामाबाईसारखे जोडे असतातच कीं, त्या “ यशवंतराव खरे ” मधल्यासारखे. सारखा बिचारा फुसकुल्या सोडीत चिडवीत असायचा तिला तो, आणि तीहि यायची मग फणफणत आंगावर, ’ मास्तर मध्येंच म्हणाले.

‘ हेः ! त्यांत काय. पुण्यास होतों मी कॉलेजांत तेव्हांची गोष्ट. नारायण पेठेंत रहात असें मी. मालक बिचारे गरीब, अबोल नी शांत असे गृहस्थ होते. पण मालकीण नुसती गर्गशा ! पहाल तेव्हां झणकारत असायची यजमानांवर. बाईचा आवाजही फार लहान ! एक फर्लांगावरून अगदीं सहज ऐकावा. नवरा बिचारा आपल्याकडून शक्य तितकी बाईसाहेबांना मदत करायचा. चार पोरं होतीं पदरांत त्यांच्या. सध्याकाळीं घरीं आले कीं पडलींच पोरं त्यांच्या गळ्यांत. तरीही निजण्या बसण्याच्या खोल्यांचे केर, आंथरूणं पांघरूणं घालायचीं, पोरांनीं केलेला केर काढून टाकायचा, त्यांचे कपडे सुद्धां धुवायचा बिचारा. पण बाईसाहेबांना कांहीं गप्पांच्या पुढें रोज पोरांना आंघोळी घालायला सुद्धां वेळ नाहीं मिळायचा. मग इतर गोष्टी राहोतच. काय दोन वेळां अन्न उकडून जेवायला घालायचं सगळ्यांना तेवढंच. बाकीचा वेळ शेजारीं पाजारीं भ्रमंती आणि गप्पा. नवऱ्याला जेवतांना वाढतां वाढतांना सुद्धां बाईचा वाड्यांतल्या दुसऱ्या बिऱ्हाडांत दौरा जायचा नी तिथें जरा बातचीत करूनच यायच्या त्या. दिवे लागायची वेळ झाली कीं मग या बाहेर पडायच्या. नवऱ्याचा धाक मुळीं माहीतच नव्हता बिचारीला. एवढा एका कॉलेजांतला प्रोफेसर, पण त्या बाईपुढें बोलण्याची कांहीं छाती नव्हती बिचाऱ्याची. थोडें कांहीं बोलायला गेलेच कीं “ बरं, बरं समजलं; बाहेर जा पाहूं तुम्हीं. तुमची अक्कल त्या कालीजांतल्या पोरांपुढें. इकडे तुम्हांला कांऽऽहीं समजत नाहीं, ” म्हणून हातवारे करीत घसरल्याच त्या त्यांच्यावर ! एक विद्वान् अध्यापक म्हणून लौकिक होता त्यांचा. पण बाईंना त्याचं काय ? दुसऱ्या अशाच गोष्टी वेल्हाळ मैत्रिणी व्हायच्या गोळा रोज वाड्यांत. आणि मग ज्या गोष्टी सुरू व्हायच्या-नी त्या सुद्धां अगदीं खड्या आवाजांत बरं का—त्यांच्यापुढें मग कोणी बाहेर पुरुष माणसं आहेत, चांगलं नाहीं दिसत असं एकसारखं गजघंटेसारखं खणखणणं, याची काडीइतकी सुद्धां फिकीर नसायची बाईंना. आमच्या अगदीं परिच-

याचा होता त्यांचा हा ठराविक कार्यक्रम, आणि कींवही यायची आम्हांला प्राध्यापक महाशयांची त्याबद्दल. हें दुसरं अर्धसत्य बरं का मास्तर ! आतां चित्र पुरें झालें.' वामनरावांनीं थांबून श्वास टाकला.

'अहो पण दोन्हींही अर्धवटच ! जसा नवऱ्याचा फार धाक चांगला नाहीं तसाच असला हा नेपथ्यपाठी काचही चांगला नाहीं. दोन्हीही अतिरेकच. संसार ही एक मोठी तडजोड आहे. नुसती बळजबरीची नव्हे; चांगली डोळस नी समजूतदारपणाची. एकमेकानीं मदत तर एकमेकाला केलीच पाहिजे, पण त्यांतही कोणाचे फाजील लाड उपयोगी नाहींत. एकमेकांचा एकमेकांना धाकही हवाच, पण तो प्रेमाचा; अब्रूचा किंवा भीतीचा नव्हे. असं असेल तरच संसारांत सुरेल संगीत झंकारेल नाहींतर कोरड्या विहिरींतील रहाटाचा खडखडाटच डोकें पिकविल्याशिवाय राहाणार नाहीं !' मास्तर —आतां काव्यच बोलूं लागले होते.

'बरं, बरं, चला आतां मास्तर. ते पहा आमचे शास्त्रीबुवा लागले आहेत 'शंखं दध्मौ' करायला आमच्या नांवानें !'

---

# २१

सायंकाळची वेळ असल्यानें रस्त्यानें गाड्याघोड्यांची रहदारी आतां वाढूं लागली होती. निरनिराळ्या कचेऱ्या, पेढ्या, दुकानें वगैरेवरील लोकांची घरीं जाण्याची एकच धांवपळ उडाली होती. वर्तमानपत्रें विकणारीं पोरें, वेण्या गजरेवाले, गावरान शेंग—गंडेरीवाल्यांच्या आरोळ्या, येणारा जाणाऱ्यांच्या कानांत त्यांच्या परवानगीशिवायच घुसत होत्या. म्युनिसिपॅलिटीचे दिवे लावणारे, खांद्यावर शिडी आणि हातांत दिव्यांची बालदी घेऊन पळत पळत चालले होते. राणीही त्या गर्दींत मिसळली. घरांतून बाहेर पडल्यापासून मागें पुढें कुठेंही न पाहतां, ती पाठीशीं अगदीं वाघ लागल्याप्रमाणें पळतच चालली होती. बाबलीबाईच्या तडाक्यांत तर नाहींना आपण पुन्हां सांपडणार ही भीती तिला क्षणोक्षणीं भेडसावीत होती. आणि घरापासून पुष्कळ दूर येईपर्यंत ती श्वास घ्यायलासुद्धां थांबली नाहीं कीं तिनें आपली चाल जरा मंदावली नाहीं.

पण आतां मात्र पुष्कळच दूर आपण आलों असें वाटून तिनें वागळे वकीलांचा तपास करण्यास सुरवात केली. मोठमोठ्या दुकानांतून किंवा कोणा पांढरपेशाजवळ तिनें मुळींच चौकशी केली नाहीं. आपलं असं विचारणं चमत्कारीकच वाटेल कुणाला, अशीच तिला भीति वाटत होती. म्हणून आपल्यासारख्याच गरीब, जाणाऱ्या येणाऱ्याला किंवा भाजी-वाल्यांना विचारीत विचारीत ती वागळ्यांच्या ऑफिसशीं येऊन पोंचली.

पार थकून गेली होती ती हा वेळपर्यंत. ऑफिसांत जाऊनच वागवानांची चौकशी करावी नी जरा दम टाकावा असंच वाटलं तिला. पण स्वतःच्या विचित्र पोशाकाकडे नजर जातांच तिनें तो विचार बदलला, आणि घरा-जवळील एका पायरीवरच तिनें खालीं बैठक मारली नी समाधानाचा एक निश्वास टाकला.

ती अशी जरा बसली असेल नसेल तोंच घोड्याचा एक एक्का, एक दोन,

एक दोन करीत तिच्याकडे येत असलेला तिच्या नजरेस पडला. मोठें तऱ्हेवाईकच दिसलें घोडें तें. पायांत पाय घुटमळवीत नी एकदां इकडे तर एकदां तिकडे असें वक्रगतीनेंच चाललं होतं तें तट्टू. एक्केवाल्यानें वकीलांच्या दाराशीं त्या प्राण्याचा हो, हो, करून उभे करण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या डोक्यात कांहीं तें शिरेना. एक शिवी हांसडून व पाठींत सणसणींत रट्टा हाणून गाडीवानानें त्याला तें पटविण्याचा यत्न केला. तरी त्याला न जुमानतां धिम्मेपणानें त्यानें आपली चाल पुढें चालू ठेवली. अखेरीस गाडीवानानें खालीं उतरून लगामाला हिसके देतच अश्वराजांस मागें खेंचलें व ऑफिसच्या पायरीशीं उभें केलें.

आपल्या मनांतील त्याच्या वरील प्रेम गाडीवान जोरदार भाषेत व्यक्त करीत असतानांच, अनंतराव दार उघडून गळ्यांभोंवती स्कार्फ् गुंडाळीत पायऱ्यांवरून खालीं आले नी त्यानीं गाडींत उडी टाकली. 'कायरे, त्रास दिला काय त्यानें भारी ? आजच काढला आहे पुष्कळ दिवसांनीं त्याला बाहेर. मोठा नाठाळ झाला आहे तो त्याचा किशा गेल्यापासून. नाहींतर गरीब आहे मोठा तो. बरं उद्यां ये हं आजच्याच वेळेला इथें;' असें म्हणून अनंतरावांनीं लगाम ओढून घोड्याला इषारा दिला आणि अश्वराजानींही कांहीं गडबड न करतां आपली हरदासीचाल धरली.

राणी लक्षपूर्वक इतका वेळ अनंतरावांकडे पहात होती. पंतानीं तिला सांगितलेल्या वर्णनावरून हेच ते बागवान साहेब असें तिनें ओळखिलें होतें. पण त्यांना हांक कशी मारावी याच विचारांत पडली होती ती इतका वेळ. पण आतां धीर न करावा तर गाडी दूर निघून चालली—म्हणून शेवटीं मनाचा निश्चय करून गाडी मागून झपाट्यानें चालण्यास तिनें सुरवात केली. पण गाडीनें हा वेळपर्यंत बरेंच अंतर काटलें होतें. अखेर राणीनें धांवतच तो एक्का गांठला नी गाडीच्या पायरीलाच ओंबकळून ती वर बसली.

इतक्या वेळच्या धांवपळीनें अगदीं रडकुंडीसच आली होती ती. श्वाससुद्धां घेववत नव्हता तिच्यानें. म्हणून धांपा टाकीतच स्वस्थ बसली जरा ती. अनंतराव आपल्याच विचारांत गुंग होते. रोजच्या सुखद कार्यक्रमाचींच चित्रें दिसत होतीं त्यांना. त्यामुळें गाडीच्या पायरीवर बसलेल्या त्या विचित्र मूर्तीची दादही नव्हती त्यांना. त्यामुळें दचकलेच चांगले ते 'साहेब!'

अशा राणीच्या हांकेनें, आणि ‘ कोण आहे तें ? ’ असें त्यांनीं घाबरतच विचारलें.

‘ साहेब, असे बघूं नका माझ्याकडे. किती वेळ तरी धांवतें आहे मी तुमच्या मागून. दम बघा किती लागला आहे तो. तुमच्याजवळ काम आहे फार जरूरीचं साहेब. एका माणसाला भेट पाहिजे आहे तुमची. किशाची कांहीं माहिती आहे त्याला. निरपराधी आहे किशा म्हणतो तो, नी अजून त्याला वाचवितां येईल साहेब. ’ राणी बोलली.

‘ काय सांगत्येस काय तूं ? ’ तिच्याकडे आश्चर्यातिशयानें पहात अनंतराव म्हणाले.

‘ अगदीं देवाशपथ खरं आहे, मी काय सांगतें आहे तें साहेब. त्या सुखलाजी स्ट्रीटकडे घ्या गाडी लौकर. कित्ती वेळ झाला मला बाहेर पडल्याला. मी सांडल्यें असंसुद्धां वाटेल त्यांना. ’ राणी बोलली.

अनंतरावांनींही मग अधिक कांहीं न बोलतां आपल्या मनाशींच कांहीं विचार करीत राणीनें दाखविलेल्या घराशीं गाडी उभी केली. आणि त्यांच्या अश्वराजानींही कांहीं विरोध न दाखवितां लगामाच्या इषाऱ्याबरोबर आपली चाल थांबवली.

‘ ती पहा, ती वर दिसते ना दुसऱ्या माळ्यावर, तीच खोली; चला उतरा,’ दुसऱ्या मजल्यावरील अंधुक उजेड दिसत असलेल्या, रस्त्यावरील खिडकीकडे बोट करून राणी म्हणाली.

अनंतरावांना जरा विचारच पडला. स्वभावानें थोडे भित्रेच होते ते. पण किशाविषयींच्या आपुलकीनें त्यांना बाहेर खेंचलेंच. रस्त्यावरच रेंगाळत असलेल्या एका पाटीवाल्याला गाडीकडे जरा बघायला सांगून, राणीच्या मागोमाग एका अरुंद व काळोख्या जिन्यावरून ते वर जाऊं लागले. वाटेनें एकदोनदां ठेचकाळतच एका अंधुक उजेड असलेल्या खोलींत त्यांनीं प्रवेश केला. पलंगावरील मच्छरदाणीच्या आंत कोणी तरी स्वस्थ झोंपी गेलें होतें.

‘ कित्ती शांत झोंप लागली आहे, नाहीं ? ’ पलंगाकडे बोट करून राणी हळूच बोलली. ‘ पण दोन दिवसांपूर्वी कित्ती तळमळ चालली होती ! बाई ग ! ’ राणीनें आंगावर शहारे दिले.

अनंतराव कांहींच बोलले नाहींत किंबहुना पलंगापासून दूरच दाराजवळ

उभे होते ते. राणीनें ओळखलें तें नी जवळच्या मेणबत्तीची वात जरा झटकून तिनें ती पलंगाजवळ थोडी उंच धरली. पंतांच्या तोंडावर आतां स्पष्ट उजेड पडला नी ते दचकून जागे झाले.

अनंतरावांचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. आश्चर्यानेंच ओरडले ते; 'कोण पंत! किती खराब झालां आहांत हो तुम्ही?' नी पुढें होऊन त्यांनीं पंतांचा क्षीण हात आपल्या हातांत घेतला.

'मीच तो, अनंतराव. गच्छंतीचीच आली होती वेळ म्हणाना. चौघांच्या खांद्यावरच्च दिसलों असतों तुम्हांला! पण—इकडे ये राणी जवळ—या राणीमुळेंच वटावलों मी, नी म्हणून बोलतों आहें तुमच्याशीं.' भारावलेल्या आवाजानें पंत म्हणाले. 'या इथें बसा असे, अनंतराव.'

अनंतरावांनीं मोठ्या कौतुकानेंच राणीकडे पाहिलें. तो साधा भोळा जीव अगदीं गोंधळूनच खालीं पहात होता!

'अशासाठीं बोलावलं होतं तुम्हांला अनंतराव,' पंत म्हणाले—'पण राणीनं सांगितलंच असेल तुम्हांला.'

'होय, सांगितलं आहे सगळं. पण गोंधळून गेलों आहें मीं या सर्व प्रकारानें. काहीं सुचत नाहीं मला काय करायचं ते.' अनंतराव म्हणाले.

'कांहीं हरकत नाहीं. सुचेल लौकरच, त्यांत काय!' पंत म्हणाले. 'राणी, इथें बस पाहूं अशी नीट नी सगळं सांग पाहूं यांना, काय काय मला सांगितलंस तें. अगदीं कांहीं सुद्धां गाळूं नको हं. ऐका अनंतराव नीट!'

आणि राणीनेंही मग सगळं कांहीं एक अक्षर सुद्धां न गाळतां सांगितलं अनंतरावांना. ती सागत असतांना पंत अनंतरावांच्या चेहऱ्याकडे लक्ष लाऊन पहात होते. आणि राणी थांबल्याबरोबर ते म्हणाले, 'ऐकलं आहे तुम्ही आतां सगळं अनंतराव. माझं कांहीं बुवा डोकें—डोकें—कसलें म्हणा, मडकेंच तें! काम करीत नाहीं. आपल्या मित्रांचा सल्ला घ्या नी ठरवा काय करायचं ते. आधींच उशीर झाला आहे—अक्षम्यच म्हणा. बरं आहे, नमस्ते अनंतराव.'

अनंतरावही मग 'नमस्ते' करून उठलेच. रात्र बरीच झाली होती.

सकाळीं खोलींत चाललेल्या कुजबुजीनेंच पंत जागे झाले. मच्छरदाणींतून त्यांनीं बाहेर पाहिलें. बागवान पितापुत्र नी नानूजींचा बिऱ्हाडकरू राणीजवळ कांहीं तरी बोलण्यांत गढून गेले होते. त्यांना त्रास

होऊं नये म्हणूनच ते हळुहळू बोलत होतेसे दिसले. मोठ्यानें खोकूनच आपण जागे आहोंत असें त्यांनीं दाखविलें. आणि मग ते चौघेही त्यांच्या पलंगाजवळ आले. श्रीयुत बागवानांनीं त्यांचा हात धरून मोठया आस्थेनेंच त्यांची चौकशी केली.

पण पंतांना उत्तर देण्याचा अवसर न देतां राणी एकदम पुढें झाली नी ' थांबा हं जरा ' असें म्हणून तिनें त्यांचें तोंडधुणें उरकलें. आणि मग ओल्या टॉवेलनें त्यांचे हात तोंड नीट स्वच्छ पुसून त्यांच्या केसांचीही थोडी साफसुफी मोठ्या चपळाईनें उरकली. एकाद्या आजीबाईसारखी चालली होती तिची लगबग नी सराईत परिचारिकेसारखीच सारा उद्योग ती आत्मविश्वासानें उरकीत होती. चहाचा कप व पावाचे तुकडे पंतांच्या पुढें तिनें ठेविले आणि डोळयांनींच तिनें त्यांना खुणावलें.

' करतों, करतों सुरवात. पण बागवान साहेब आधीं मला सांगा, ' बैल गेल्यांतला ' प्रकार नाहींना झाला आपला ? ' पंतांनीं अधीरपणें विचारलें.

' कांहीं काळजी करूं नका पंत, अजून नाहीं वेळ गेली. आतां काय म्हणाल तें करूं आम्हीं, ' बागवान उत्तरले.

' मला काहीं नको आहे हो. आमच्या या राणीला, खरीखुरी राणी करा म्हणून सांगितलं असतं म्हणा ! पण तें जाऊं दे, नी माझंही राहूं दे. त्या बिचाऱ्या पोराकरतां काय करणार आहांत बोला, ' पंत म्हणाले.

' त्या साठींच तर आलों आहोंत आम्हीं इतक्या लौकर; आणि दुसरेही एक गृहस्थ कोणी येणार आहेत तुमच्याकडे जरा वेळानें, ' नानूजींच्या बिऱ्हाडकरूनें सांगितलें.

आणि नंतर त्यानीं सर्व कांहीं पंतांना संगतवार सांगितलें. जनाबाई आणि तिचीं मुलें यांची ते नीट काळजी घेत होते. किशालाही मधून मधून भेटत होते ते नी त्याची शिक्षा कमी करण्याचा प्रयत्न चालविला होता त्यानीं. पण अजूनही त्यांच्या मनाची मोठी ओढाताण चालली होती. गरीब सालस किशा ! पण चोरीचा पुरावाही बिनतोड. त्यांचं सुद्धां मन थोडें डळमळूं लागलं होतं. केवढा भक्कम आधार दिला पण आतां पंतानीं त्यांना ! आतां काळजीच नको. संध्याकाळच्या आंतच होतो आहे किशा मोकळा बघा. केवढी मोठी कामगिरी केलीत तुम्हीं ही, म्हणून त्यांनीं पंतांना परत धन्यवाद दिले.

'अंहं ! अपराधी होईन मी परमेश्वराचा. माझ्या या राणीचा आहे मान तो !' राणीकडे आदरानें पहात घाईघाईनें पंत म्हणाले.

जरा वेळानें अनंतरावांखेरीज बाकी सर्व पंतांचा निरोप घेऊन निघून गेले. अनंतराव मात्र खोलीच्या दाराकडे नी आपल्या घड्याळाकडे वारंवार पहात होते. खोलींत झालेल्या कसल्या तरी आवाजानेंच पंत आपल्या डुलकींतून जागे झाले.

एक भली भक्कम जड पाटी खालीं ठेवल्याचा आवाज होता तो. तो जाडजूड हमाल आपल्या पाटींतील सामान खालीं काढून ठेवीत होता. अनंतरावहि त्याला मधून मधून हात लावीत होते, सबंध दुकान दिसत होतं तिथें रिकामें केलेलें. चहा, कॉफी, बिस्किटांचे डबे, बेदाणा मनुकांच्या पुड्या, साबूदाणा, आरारूट, साखरेच्या पिशव्या, नी संत्री, मुसंबी, द्राक्षें आणि लालबुंद मोहक सफरचंदांची एकच गर्दी उडाली होती तिथें. लव्हेंडर, कोलन वॉटर सारख्या सौगंधिक द्रव्यांच्या सुंदर वेष्टनांच्या बाटल्याही दिसत होत्या त्यांत. राणी तर अगदीं दिङ्-मूढ होऊन नी जीभ बाहेर काढूनच पहात होती या सर्व नवलाईकडे ! आपल्या जन्मांत तिनें कधीं असल्या नाजुक साजुक वस्तू एकदम पाहिल्या नव्हत्या. त्या रसरशीत द्राक्षांच्या घडांकडे पाहून तर तिच्या तोंडाला पाणीच सुटलें ! पंतही या सर्व प्रकारानें चकीत होऊन गेले होते, नी या सर्व सामानाकडे अतृप्त नजरेनं पहात असलेल्या राणीकडेही अधून मधून कौतुकानें दृष्टी टाकीत होते.

अनंतरावानीं आतां समाधानाचा सुस्कारा टाकला. सर्व कांहीं आतां त्यांच्या मनासारखं झालं होतं. 'हं राणीबाई, आपण आहांत मालकीणबाई इथल्या. पंतांच्या नी आपल्याही पोटापाण्याची करा आतां सोय कांहीं. मी जातों आतां, नमस्ते !' असें म्हणून पंतांना कांहीं बोलण्याची सवडही न देतां आपली काठी घेऊन ते बाहेर पडले.

राणीनें आपल्या राज्याचा आतां पूर्ण ताबा घेतला होता. तिनें ते सर्व जिन्नस नीट रीतीनें खोलींतील फळ्यांवर लावले नी कमरेवर हात देऊन आणि मान वांकडी करून एकाद्या कलावंताच्या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहिलें. तिच्या त्या डौलदार मूर्तीकडे आणि त्यांतील सुप्त सौंदर्याकडे पंत मोठ्या रसिकतेनें पहात होते. जणुं काय त्यांच्या कला-दृष्टीला नेटक्या कपड्यांतील तिची भावी गोंडस मूर्तीच आत्तां दिसत होती !

'आहांत काय पंत घरांत,' असें म्हणतच इतक्यांत वागळे वकीलांची हंसतमुख मूर्ती आंत आली. 'वकील या नात्यानें कांहीं सांगायचें आहे मला तुम्हांला जरा बरं वाटत असेल तर.' पंतांच्या शेजारीं बसतच ते म्हणाले.

वकील आणि त्याच्या सभोंवतील कायद्याचं गंभीर वातावरण पंतांना नेहमींच अस्वस्थ करी. त्यांचा चेहरा जरा पडलाच उत्तर देतांना.

'सांगा कीं वकीलसाहेब. कांहीं विशेष भानगड नाहीं ना ?' त्यानीं विचारलें.

'छे छे छे ! भानगड बिनगड कांहीं नाहीं हां पंत ! तसं असतं तर वेळ जरा वेगळी पाहिली असती. पण आधीं मला हें सांगू दे कीं माझ्या त्या मित्रांना यांतला कांहींच पत्ता नाहीं अजून. मोठीं सज्जन माणसं आहेत तीं ! नाहींतर तुमच्या बद्दल हा एवढा जिव्हाळा कां वाटावा त्यांना.' फळ्यांवरील व अजून कांहीं खालींच असलेल्या सामानाच्या पुड्यांकडे हंसत हंसत त्यानीं बोट दाखविलें. 'खरी सहानुभूती नी दया ही अशी निरपेक्ष असत्ये बरं का पंत !'

पंतांना जणूं काय ते आपल्या गत आयुष्यावरच कोरडे उडवीत आहेत असं वाटलं. 'खरं आहे आपण म्हणतां तें वकील साहेब.' ते हळूच म्हणाले.

'पुष्कळ दिवस तुमचा तपास करतों आहे मी पंत. पण या परिस्थितींत तुम्हीं भेटाल अशी माझी कल्पना नव्हती. तुमची चुलती रेवतीबाई सावले हिचे वारस आहांत आज तुम्हीं पंत.' वागळे म्हणाले.

'म्हणजे ? काकू वारली कीं काय ?' पंत उद्गारले.

'होय. रेवतीबाई कांहीं दिवसांपूर्वी वारल्या. आणि तुम्हीं तिचे पुतण्ये जरा सुधे असतां, तर आज पन्नास हजारांचे मालक झालां असतां ! पण— मोठा वाईट शब्द आहे नाहीं ?—पण आतां फक्त पांचशे रुपयेच वार्षिक मिळत जातील तुम्हांला. तरीसुद्धां नशीबवान आहांत असंच म्हणेन मी तरी,' वागळे म्हणाले.

पंतांचें अंतःकरण पश्चात्तापानें आणि आनंदानें अगदीं भरून आलें आणि त्यांच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह सुरू झाला. 'खरंच वकील साहेब, उपकार आहेत काकूंचे मोठे माझ्यावर. खचित लायक नाहीं मी या

देणगीला......पण आतां नको काळजी राणी. सबंध जग आपल्यापुढें पसरलं आहे! आमच्या राणीला चांगली शिकवून शहाणी करणार मी आतां, नी सुंदर सुंदर रेशमी साड्यांत मिरवेल आमची राणी!'

पंताचे डोळे रम्य भविष्यांत वावरत होते त्यावेळीं. सुवसना नी सुशिक्षित राणीच्या सुखद सहवासांतील वैवाहिक आयुष्याच्या रम्य चित्रांवरच तरळत होती त्यांची दृष्टी ! राणी निस्तब्धपणें त्यांचा हात हळुवारपणें दाबीत, स्निग्ध दृष्टीनें त्यांच्या प्रसन्न चेहऱ्याकडे पहात उभी होती!!

---

# २२

किशाचं अंतःकरण आनंदानें नुसतं नाचत होतं त्यावेळीं. थुइ थुइ करीत प्रतिक्षणीं उंच उंच उडणारें स्वच्छ पाण्याचें कारंजेंच जणू कांहीं ! सभोंवतालच्या काळोख्या ! दमट, स्नेहशून्य, दगडाच्या उदास भिंती त्याच्या डोळयांना आतां दिसत नव्हत्या. सुखकारक, उबदार नी झगझगीत दिव्यानीं प्रकाशित झालेल्या बागवानसाहेबांच्या घराच्या खोल्या नाचत होत्या त्याच्या डोळयापुढें. प्रेमळ आप्तांचे नी मालक मालकिणीच्या आवाजाची सुखद गजबज त्याच्या कानांत सुरेलपणें झंकारत होती. किती मौज ! किती गंमत ! आवेगानेंच त्यानें आपली छाती दाबून धरली. आनंदानें ती फुटते कीं काय असंच वाटलं त्याला. पण हें घड्याळ किती रेंगाळत चाललं आहे ! या बेट्याला कांहीं घरदार नाहीं वाटतं ?

दार वाजलें नी तुरुंगाचे शिपाई आंत आले. ‘ चला किसनजी चला, ’ ते म्हणाले.

किशानें लगबगीनेंच आपले कपडे चढविले आणि तो कोठडीच्या दारां-तून बाहेर पडला. नानूजींची स्वारी समोरूनच सरकारी पोशाक आंगावर चढवून नी हाता पायांतील अलंकारांचा ‘ खुळ्ळुं खुळ्ळुं ’ असा आवाज करीत येत होती. बागवान साहेबांनीं सर्व हकीगत त्याला आधीं कळविली होती. पंतानीं दिलेल्या माहितीवरून वागळे वकीलांनीं मोठ्या चपळाईनें नानूजींना कोर्टापुढें खेंचून सरकारी पाहुणचार घ्यायला पाठविलें होतें. बदमाष भैरवनाथ मात्र परागंदा झाल्यामुळें सुटला होता. किशाला हें सर्व माहीत असल्यामुळें नानूजी जवळ येतांच मुद्दामच आश्चर्य दाखवून तो म्हणाला,

‘ कोण, वकीलसाहेब तर नव्हे ? वा वा ! मेहेरबानी आहे मोठी सरकार-वर. मोठी असामी बरं का हवालदारसाहेब; मोठा डोक्याचा माणूस !

स्वस्थपणें घ्या पाहुणचार बरं का, नी ओळखबिळख ठेवा गरीबाची. राम राम ! '

पोलीसदादा फिदिफिदी हंसले आणि निष्फळ रागानें त्यांच्याकडे पहात नानूजी पुढें निसटले.

तुरुंगाचीं तीं भयानक दारें बंद झालीं. बाहेरच्या मोकळ्या, स्वतंत्र वातावरणांत किशा आतां उभा होता. त्या मोकळ्या हवेचा त्यानें एक दीर्घ श्वास घेतला, आणि सभोंवार जरा बावरतच पाहिलें. किती रुंद नी पैस दिसत होते ते रस्ते त्याला आज; नी किती गजबजलेले ! दिवस जरा अभ्राच्छादित आणि उदासच होता. पण त्याच्या डोळ्याना किती उल्लसित व मजेशीर वाटत होता तो !

तुरुंगाच्या आवाराबाहेरच बागवान साहेब आपला छकडा घेऊन उभे होते. किती कृतज्ञता वाटली त्याला ! अगदीं भरल्या डोळ्यानींच लवून राम राम केला त्यानें मालकांना. प्रेमभरानें पाठीवर थापटीत त्यांनीं किशाला थोडा शांत केला नी ' हूं किशा, चल चढ चटकन आंत आणि पिटाळ छकडा घरीं. ' किशालाही मोठं सांगायलाच हवं होतं असं नाहीं. झटकन आंत बसून छकडा पिटाळीतच घरीं आला तो, अगदीं मालकांच्या हुकुमाची अक्षरशः तामिली करीत.

आंत पावलांचा आवाज झाला. घाई घाईनें दार उघडलें गेलें नी जनाबाईनें किशाच्या गळयाला मिठीच मारली. आसपास कोण आहे इकडे सुद्धां त्या माउलीचें लक्ष नव्हतें. कानशिलावर आपल्या हाताचीं बोटें कडकड मोडीत तिनें एकदां किशाकडे नीट पाहिलें आणि ' किती वाळला माझा बाबा , ' असें म्हणून त्याला परत घट्ट धरलें.

' ओहो, ओहो, ' करीत नी आनंदानें टाळ्या पिटीत जगोबा आंत आले आणि त्यांच्या मागोमाग बायजाची आई व बायजा, अनंतराव नी त्यांची आई अशी सर्व आंत आलीं. नानूजींचें ते बिऱ्हाडकरूही दिसत होते सर्वांच्या मागें हंसत उभे असलेले. किती मोठ्या मनाचीं नी मायाळू माणसेंही, किशाला वाटलें.

गडबड जरा शांत झाल्याबरोबर किशा हळूच तबेल्याकडे निसटला. आपल्या जागेवर थयथय नाचत नी मोठ्यानें खिंकाळतच त्या मुक्या प्राण्यानें आपल्या

मित्राचें स्वागत केलें. किशानें त्याच्या मानेवर थोपटीत त्याचें तोंड कुरवाळलें. घोडा फुरफुरत आपलें नाक त्याच्या खांद्यावर घासूं लागला. ' आतां नाहीं सोडून जाणार हं चंद्या तुला, आणि आतां हट्ट पण नाहीं हां करायचा नेहमींसारखा तूं. गंमत गंमत करूं आपण ! ' चंद्याही मान हलवून फुरफुरत त्याला संमती देत होता.

पण तबेल्याच्या दारानें हळूच चहाडी केली नी किशानें वर पाहिलें. बायजाची स्वारी, दातानें पदराचें टोंक चावीत त्याच्याकडे भरल्या डोळ्यांनीं पहात असलेली त्याला दिसली. ' बायजा ! ' असें हळूच ओरडत किशानें मोर्चा वळवला. पण मानेला एक गोड झटका देऊन नी खुदकन् हंसून बायजा आंत पळाली.

रात्रीं सर्वांचीं जेवणें झाल्यावर बागवान साहेबांनीं त्याला वर बोलाविलें. ' कांहीं महत्वाची बातमी सांगायची आहे तुला. असा घाबरूं नको कांहीं. चांगली आहे बातमी. उद्यां आपल्याला थोडें बाहेर गांवीं जायचें आहे. कांहीं हरकत नाहीं ना तुझी ? ' ते त्याला सांगत होते.

' हरकत कसली साहेब. कुठे जायचं ? ' किशानें विचारलें.

' ते पाहुणे, तूं नी मी, असे तिघांनीं जायचें आहे. कशाला आहे माहीत ?'

किशा अधीकच बुचकळ्यांत पडला. त्यानें नकारार्थी मान हलविली.

' आलं आहे लक्षांत तुझ्या थोडंस. बघ परत विचार करून, ' बागवान म्हणाले.

किशा आपल्याशींच अस्वस्थपणें कांहीं तरी पुटपुटत होता. ' नलुताई तर नव्हे ? ' असें त्यानें तीन चार वेळां जरा मोठ्यानेंच आपल्याशीं म्हटलें. पण तें शक्य नाहीं, अशा अर्थानेंच त्यानें परत आपली मान हलविली.

' बरोबर, बरोबर ओळखलंस किशा ! ' त्याचे ते शब्द ऐकून बागवान साहेब म्हणाले. ' अखेर पत्ता लागला आहे आपल्याला त्यांचा नी तिकडेच जायचें आहे आपल्याला उद्यां. '

* * * *

तो सबंध दिवस वारा कसा एकाद्या पिसाटासारखा सुसाट वाहात होता. रात्र मात्र अगदीं निरभ्र स्वच्छ होती. पण वाऱ्याचा जोर कांहीं तिळभरही कमी झाला नव्हता; आणि थंडी म्हणजे मी म्हणत होती. हें असें उघड्यावर

कुडकुडण्यापेक्षां गरम गरम पांघरुणांत गुरगुटून निजलों असतों, तर किती बरं झालं असतं, असं अनेक वार किशाच्या मनांत येत होतें. आणि गाडी जरा विसांव्यासाठीं जेव्हां दस्तुरीशीं थाबली, तेव्हां त्यानें जोरानें धांवतच रस्त्यावर पांच सहा फेऱ्या मारल्या. ' आः ! किती बरं वाटलं आतां. ' दम टाकीतच तो म्हणाला.

गाडीच्या आंतील त्या दोन प्रवाशांना मात्र मुळींच झोंप येत नव्हती. मोठ्या आशेनेंच निघाले होते ते या प्रवासाला नी आपण कसे कसे बेत केले नी काय काय आशा आपल्याला वाटत आहेत याचाच विचार त्याच्या मनांत एकसारखा घोळत होता.

मध्यरात्र बहुतेक आतां उलटून गेली होती, आणि जयरामभाऊ—नानूजींचे बिऱ्हाडकरू—बोलतांना आतां थोडे थोडे घुटमळूं लागले होते. कांहीं तरी विचारांत गढल्या सारखा त्याचा आवाज गंभीर येऊं लागला होता.

त्रयोदशीची मोहक चंद्रकोर आकाशांत प्रकाशूं लागली, आणि त्या अथांग नीलाकाशभर एक प्रकारचा रम्य गोडवा भरल्यासारखा दिसूं लागला. आपल्या विचार तंद्रींतून जागे होऊन जयरामभाऊ म्हणाले, ' बागवानसाहेब, कंटाळा नाहीं ना आला तुम्हांला ? कांहीं सांगायचं आहे मला तुम्हांला. '

' छे छे. कंटाळा बिंटाळा कांहीं नाहीं. श्रोत्याचं काम चांगलं करीन मी, त्यांत काय ? नी नाहीं मजा वाटली कांहीं, तरी सुद्धां मजा वाटते म्हणून दाखवीन कीं,' बागवानसाहेब हंसत हंसत म्हणाले.

' एक जुनी गोष्ट सांगायची आहे तुम्हांला, कथाच म्हणाना आपली. कांहीं मोठी नाहीं फारशी.' जयरामभाऊ म्हणाले.

आणि मग त्यांच्या उत्तराची वाट न पाहतां त्यांचा हात पकडून त्यांनीं सांगायला सुरवात केली.

" दोन भाऊ रहात होते एकदां या विलासपुरांत. फार प्रेम होतं त्यांचं एकमेकांवर; अगदीं रामलक्ष्मणासारखं म्हणाना. एकाच्या पायांत कांटा बोंचला तर दुसऱ्याच्या कळ यायची. एकमेकाच्या सुखाकरतां सुद्धा किती जपायचे ते. दहा बारा वर्षांचं होतं त्यांच्या वयांत अंतर. मोठा, चांगला उमदा नी प्रकृतीनें अगदीं कणखर. पण धाकटा मात्र नाजूक नी बहुतेक आजारीच असायचा. किती काळजी घ्यायचा तो मोठा भाऊ धाकट्याची.

पण लौकरच दुर्दैव ओढवलें आणि तारुण्याच्या भावनोत्कट निशेंत एकाच कुमारीच्या पायावर त्या दोघांनींही हृदयदान केलें !

" धाकट्याच्याच लक्षांत आधीं आली ही गोष्ट. त्याच्या अंतःकरणाला काय काय वाटलं त्यावेळीं नी किती यातना झाल्या हें नाहीं मीं आपल्याला सांगत. पण किती दारुण मनःसंग्राम आपल्यापुढें उभा आहे याची मात्र त्याला पुरी जाणीव झाली. गत आयुष्याचा सबंध चित्रपट त्याच्या डोळ्यांपुढें स्पष्टपणें उभा राहिला. आपल्या दादानें आपल्यासाठीं किती किती गोष्टींचा त्याग, मुळींसुद्धां कुरकुर न करतां केला याची जाणीव त्याला अस्वस्थ करूं लागली. पण परीक्षेची वेळ येतांच, त्या जाणीवेचे मधु पडसादच त्याच्या अंतःकरणाला धीर देऊं लागले नी त्यानें मोठ्या धैर्यानें आपल्या प्रेमाची समाधी बांधली ! एका अक्षरानेंही त्यानें कधीं आपल्या प्रेमाचा उच्चार केला नाहीं, आणि निष्प्रेम, निःशून्य असं आपलं जीवित कंठण्यासाठीं त्यानें देश सोडला.

" मोठा भाऊ लौकरच त्या कुमारिकेशीं विवाहबद्ध झाला. पण थोड्याच वर्षांत त्याच्या मांडीवर आपली लाडकी कन्या निरवून ती बिचारी देवाच्या घरीं निघून गेली !

" तिची आईच जणूं काय त्या मुलीच्या रूपानें आतां घरांत परत वावरूं लागली. हाताला आली आली तोंच सोडून गेली होती त्याला तिची आई; नी म्हणून किती जीव तोडून त्यानें आपल्या लाडक्या मृत पत्नीची ती मधुर स्मृती संभाळली असेल, याची कल्पना येईल करतां तुम्हांला. यौवनांत आणि वैवाहिक आयुष्यांत एकदमच प्रवेश केला त्याच्या कन्येनें. पण दैवाचा दारुण विलास असा कीं, माकडाच्याच हातांत तें रत्न निरवलं गेलं ! माती, माती झाली तिच्या सर्व गुणांची ! !

" मोठ्या धिम्मेपणानें नी मुलांवरील जीवानें तिनें वैधव्याचे कांहीं दिवस काढले, आणि नवऱ्यानंतर महिन्या भरांतच वडीलांच्या हवालीं आपल्या दोन अर्भकांना करून तीही आपल्या आईला भेटाला गेली. या दारुण दैवलीलांनीं अगदीं खचून गेला म्हातारा तो. आधींच मृदु अंतःकरणाचा आणि त्यांत हे दैवाचे कठोर फटकारे. पण पोटाची काळजी नसल्यानें त्या दोन गोड पोरांकडे पहात दिवस कंठित होता तो.

" पण दैवाला तेंही पाहवलें नाहीं ! ललाटींचा लेख कोण पुसणार !—

आणि त्या मुलांचे आजोबाना वाईट दिवस आले. धंद्यांत एक जबरदस्त ठोकर बसून ते जवळ जवळ निष्कांचन बनले होते. पोटासाठीं म्हणून त्यांनीं मग चित्रें विकण्याचा धंदा सुरू केला नी त्याच्याच जोडीला जरेपुराणा मालाचेंही त्यांनीं दुकान घातलें. जुन्या ऐतिहासिक वस्तू, चित्रें वगैरे गोळा करण्याचा त्यांना लहानपणापासूनच नाद होता. तो छंद आतां धंदा झाला त्यांचा. इकडे त्या उनाड नातवानें लौकरच वाईट संगत धरून गूण उधळ-ण्यास सुरवात केली; आणि तो घरांतून निघूनही गेला. धाकटी छोकरी मात्र आपल्या आजोबांजवळच राहिली. आपल्या आईचीच हुबेहुब प्रतिमा होती ती. तिची आई नी आजी दोघीही तिच्याच रूपानें जणुं वावरत होत्या त्या घरांत ! असा चालला होता कालाचा प्रवाह.

" इकडे धाकट्या भावानें देश सोडल्यानंतर पोटासाठीं पुष्कळ ठिकाणीं एकट्यानें भटकंती केली. आयुष्यांत त्याला पाश असा कांहीं नव्हताच. निष्प्रेम, एकाकी, वैराण आयुष्य कंठीत होता तो ! मधून मधून आपल्या भावाचा क्षेम समाचार मात्र घेत असे तो. पण पत्र–व्यवहारावांचून कित्येक महिनेही मध्यंतरी जात. तरी पण आतांपर्यंत सांगितलेली सर्व हकीकत, तुटक तुटक कां होईना पण त्याच्या कानांवर येत होती.

" मग राहवेच ना त्याला तिथें. नी कोणत्या खऱ्या खुऱ्या प्रेमाच्या माण-साला स्वस्थ राहवेल ? कितीही दूर लोटले तरी असे सुटत नाहीं प्रेमाचे पाश ! खरं कीं नाहीं ?

" अतीशय तांतडीनें मग त्यानें आपल्या सर्व व्यवहाराची निरवानिरव केली. आतांपर्यंत निढळाच्या घामावर मिळवलेला सर्व पैसा गोळा केला त्यानें —त्या दोघांना अगदीं पुरून उरला असता तो—आणि आपल्या आवडत्या दादाच्या पडत्या काळांत त्याला धीर देण्याकरितां नी सुखाकरतां मोठ्या आशेनेंच निघाला तो परत यायला. कसल्या गोड सुखस्वप्नांनी तो भारा-वला होता, हें मला शब्दानीं सांगणें अशक्य आहे. वेड्या आशेनें—अगदीं आसुसलेल्या हृदयानेंच—आपल्या भावाच्या दाराशीं एक दिवस संध्याकाळीं येऊन तो उभा राहिला ! " ......

त्यांचा आवाज आतां जड येऊं लागला होता. आपला भावनावेग लप-विण्याकरितां ते जरा थांबलेच.

'पुढची हकीगत माहिती आहे मला जयरामभाऊ.' त्यांचा हात हलुवारपणें दाबीत बागवान म्हणाले.

'होय. खरं आहे! पुढलं माहीत आहे तुम्हांला सगळें.' थोड्या वेळानें जयरामभाऊ म्हणाले. 'मी केलेल्या सर्व तपासांचा फोलपणा तुम्हांला ठाऊकच आहे. त्या यमपुरीवाल्यांचा आपण पत्ता काढला; आणि अखेरीस त्या अंजनीबाईच्या घरापर्यंतही आपण जाऊन पोंचलों पण तिथें सुद्धां फक्त निराशाच पदरांत आली आपल्या. आतां तरी काय मनांत आहे परमेश्वराच्या कोण जाणे? आतां तरी निराशा न होवो एवढीच विनंति आहे त्याला!'

'शक्य नाहीं भाऊ! आतां यश येणारच आपल्याला!' बागवान उल्हासानें उद्गारले.

'तथास्तु!' गद्गद आवाजांत जयरामभाऊ म्हणाले.

---

# २३

दुसरा दिवस उजाडला. त्यांचा प्रवास अजून चालूच होता. आवश्यक विश्रांती नी पोटपूजा यांकरतां सुद्धां त्यांनीं कुठे फार वेळ मोडला नव्हता. टांग्याचे घोडे बदलण्याचे वेळीं काय टप्प्यावर वेळ गेला असेल तेवढाच. दुसऱ्या कुठेंही त्यांना थांबूं देण्यास त्यांची उत्सुकता तयार नव्हती. वाऱ्याचा जोर अजून मोडला नव्हता नी हवाही तशीच वादळी होती. रात्र पडण्याचे आंत कांहीं ते आपल्या मुक्कामाला पोंचूं शकत नव्हते.

सभोंवतालच्या त्या उदासवाण्या वातावरणाच्या संवादी भावनांनींच कीं काय पण आमचे प्रवासीही बोलण्याच्या मनस्थितींत असल्यासारखे दिसत नव्हते. जो तो आपल्याशींच स्वस्थ विचारांत गढला होता. जयरामभाऊंची मनःस्थिती कांहीं विलक्षणच अस्वस्थ बनली होती. बाल्यावस्थेपासून आतांपर्यंतच्या त्यांच्या आयुष्याचा चित्रपट त्यांच्या अंतःकरणांत कांहींतरी चमत्कारिक हुरहूर उत्पन्न करीत होता. त्यांच्या आयुष्यभर पसरलेली दाट संध्या छाया त्यांना आज भिववीत होती नी जीव कासावीस होत होता!

दिवस ढळला, आणि वाऱ्याचा जोर थोडा कमी झालासा दिसला. हवा थोडी धुक्यानें भरलेली दिसूं लागली नी काळोख पडूं लागल्याबरोबर धुक्याच्या घनदाट लटांनीं आसमंतांतला सर्व भूभाग काळपुरुषाच्या धूलिधूसर पासोडींत गुरफटल्यासारखा अदृश्य झाला.

गाडीबाहेरील आपल्या जागेवरून आणि डोळे बारीक करून, धुक्याच्या त्या घनदाट आवरणातून कुठें दूरवर एकाद्या खेड्यांतील दिवे दिसतात कीं काय तें पाहण्याचा किशा मधून मधून प्रयत्न करीत होता. पण फक्त मधूनच एकादी पडकी भिंत किंवा माळावरील गुराख्यांचा माचा, भेसूर भुताप्रमाणें त्याच्या डोळ्यापुढें येऊन दिसेनासा होई.

घोडे बदलण्याचा टप्पा आला नी किशा खालीं उतरला. त्याचे हातपाय

अगदीं बधिर झाले होते. अजून मुक्कामाचें गांव किती दूर आहे म्हणून त्यानें विचारलें. रात्र बरीच झाली होती; पण कोणीतरी उत्तर दिलें, पांच मैल. घोडे बदलण्याला लागलेलीं दहा मिनिटें त्याना ब्रह्मदेवाचींच वाटलीं; पण अखेरीस घोडे आले नी थोड्याच वेळांत त्यांचा टांगा परत चालू झाला.

—दूर कोठें तरी घड्याळांत अकराचे टोले पडले, आणि त्यांचा टांगा थांबला. रस्ता नरम मातीचा असल्यानें घोड्याच्या टापांचा नी चाकांचा फारसा आवाजसुद्धां होत नव्हता; पण आतां टांगा थांबल्याबरोबर तोही आवाज बंद होऊन सभोंवार नितांत शांतता पसरल्यासारखें त्यांना वाटलें. रातकिड्यांचासुद्धां आवाज कानांवर पडत नव्हता कीं पानांची मंद सळसळ ऐकूं येत नव्हती; इतक्या निगूढ, निस्तब्ध शांततेंत सर्व आसमंत पार बुडून गेला होता !

‘आलं आपलं मकाण, दादा,’ गाडीवान खालीं उतरून म्हणाला नी त्यानें जवळच्याच एका ‘टावराना’चें दार ठोठावलें. ‘ओ दादा ! अक्षि मधुरात झाली जणूं. कोन हाय् काय आंत ?’

कोणीच उत्तर दिलें नाहीं आंतून. त्यानें परत दार ठोठावलें पण कसलाच आवाज आंतून ऐकूं येईना. पूर्वी इतकेंच सर्व कांहीं शांत होतें. जरा मागें वळून कुठून तरी घरांतल्या उजेडाची तिरीप दिसते कीं काय तें पाहण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण व्यर्थ; कसलाच उजेड कुठे दिसत नव्हता; जीवंतपणाची कसलीच खूण कुठे दृग्गोचर होत नव्हती.

हळूच त्यांनीं आपसांत कांहीं कुजबुज केली; त्यांच्या दार ठोठावण्यानें उठलेल्या भयाण प्रतिध्वनींना चाळवण्यास जणूं कांहीं तेही नाखूष होते !

‘आपण जाऊं या पुढें देवळाजवळ. इथें थांबण्यांत कांहीं अर्थ नाहीं. चला पुढें चला; मेहेरबानी करून वेळ नका मोडूं आतां !’ अधीरपणें जयरामभाऊ म्हणाले.

ते देवळाच्या दिशेनें चालूं लागले. किशानें आठवणीनें बरोबर आणलेल्या पोपटाचा पिंजरा हातांत घेऊन तो चालूं लागला. किती आनंद होईल ताईना पोपट पाहून, तो म्हणत होता.

धवल धुक्याच्या आच्छादनांत गुरफटलेलें बल्लाळेश्वराचें शिखर त्यांच्या

पुढें आतां खडें होतें. एकाद्या प्रशांत धीर गंभीर ऋषीप्रमाणें धुक्याच्या त्या निगूढ आवरणांत तें पुरातन शिखर शोभत होतें. देवळाच्या प्राकारांतील जुनें छायायंत्र धुक्यांत पार झांकून गेलें होतें. स्वतः काळाच्या गलित-गात्र पुराण्या देहानेंच जणूं काय त्या छाया यंत्राच्या रूपानें ती भयाण रात्र ओलांडण्याचें नाकारून तिथे बैठक मारली होती !

प्राकाराचें दार उघडून ते आंत आले पण कुठल्या बाजूनें आतां जावें याचा त्यांना थोडा विचार पडला.

जवळच घराच्या एका खिडकींतून अंधुक उजेड दिसत होता. किशानें त्या खिडकीकडे धांवच मारली.

त्याच्या पहिल्या हांकेबरोबरच खोकत खोकत एका म्हाताऱ्यानें बाहेर डोकावलें; आणि आपल्या गळ्याभोंवतील उपरणें घट्ट करीत, ' या भलत्या वेळीं कोण हांक मारतो आहे, ' म्हणून विचारलें.

' माफ करा हं आजोबा. पण देवळाशीं उभे असलेले आमचे ते मालक नी मीं आत्तांच आलों आहोंत खूप लांबून. बाबजी मास्तरांचें मकाण शोधतों आहों आम्हीं. कांहीं माहिती नाहीं आम्हांला इथली, आजोबा. सांगाल का आजोबा त्यांचें नी त्या म्हाताऱ्या बाबांचें घर कुठें आहे तें ? ' किशा म्हणाला.

' वा वा ! सांगाल का म्हणजे काय ? चाळीस वर्षें राहतों आहें नाहीं का मी इथें; तें काय उगीच कीं काय ? असे उजव्या हाताला जा देवळाच्या. पण कांहीं वाईट बातमी नाहींना आणलीत त्या म्हातारे बाबांना ? ' त्या वृद्धानें विचारलें.

किशानें तसें कांहीं नाहीं उलट आनंदाचीच बातमी आहे म्हणून त्यांना घाईघाईनें सांगितलें, आणि त्यांना झोंपेंतून उठवल्याबद्दल त्यांची परत त्यानें माफी मागितली.

मोठ्या गर्दीनेंच तो मागें वळला आणि ते सर्व त्या वृद्धानें दाखविलेल्या दिशेनें त्या दोन घरांच्या कुंपणाशीं येऊन पोंचले नी त्यानीं एकवार आपल्या सभोंवार नीट निरखून पाहिलें. त्या पलीकडील जुनाट घरांतून त्या सर्व काळोखांत एकटाच अंधुक उजेड दिसत होता.

' कसला बरं आहे उजेड तो ? ' जयरामभाऊ म्हणाले.

‘ त्यांच्याच घरांतला असला पाहिजे तो. हींच दिसतात तीं दोन जुनी घरें. ’ बागवान म्हणाले.

‘ इतक्या या अपरात्रीं जागींच आहेत कीं काय तीं ? ’ अधीरपणें जयरामभाऊ म्हणाले.

त्यांना तेथेंच जरा वेळ थांबण्यास सांगून आणि त्यांच्या संमतीची वाटही न पाहतां किशा तीरासारखा त्या उजेडाच्या दिशेनें पुढें निघाला. हातांतील पोपटाचा पिंजरा त्यानें घट्ट पकडला होता.

अतीशय सावधगिरीनें आणि पावलांचा आवाजही न करतां किशा चालला होता. भिंतीवरील लोंबती फुलवेल घासलीच त्याच्या आंगाला. श्वास आवरून तो ऐकूं लागला आणि जरा वेळानें त्यानें दारावर थाप मारली. कोणीच प्रत्युत्तर दिलें नाहीं. पण कांहीं चमत्कारिक आवाज येत होता आंतून. कसला होता कोण जाणें. कोणी तरी मंद आवाजांत कण्हल्या-सारखा येत होता तो. पण सारखा न थांबतां होत होता तो आवाज. अजून पर्यंत त्यानें ऐकला नव्हता असला विलक्षण आवाज, नी त्यांत कांहीं तरी घुबडाच्या भीषण घूत्कारासारखा भेसूर, अगदीं आंगावर शहारे आणणारा सूर मिसळला होता असें त्याला वाटलें.

त्याच्या आंगातून भीतीची एक चमक उठली. त्यानें परत एकवार दार वाजवलें. तरीही उत्तर नाहीं, आणि तो आवाज मात्र सारखा घुमत होता. त्यानें दार ढकलून पाहिलें. उघडेंच होतें तें. थोडें कुरकुर करीतच तें दूर झालें. खोलींत जळणाऱ्या शेगडीचा मंद उजेड त्या जुनाट भिंतीवर पडला होता.

खोलींत कसलाच दिवा दिसत नव्हता. तरी किशा तसाच आंत शिरला. दाराकडे पाठ करून कोणी तरी पुढें वांकून बसल्याचें त्याला दिसलें. शेगडीचा मंद उजेड त्याच्यावर पडला होता. दार मागें आपटून झालेल्या आवाजानें किशा दचकलाच. पण शेगडीजवळील त्या आकृतीनें कांहींच हालचाल केली नाहीं. दाराच्या आवाजानें सुद्धां त्याच्या तंद्रीचा भंग झाला नाहीं. एका वृद्धाची आकृती होती ती. त्याच्या डोक्यावरील सारे केस पिकून पांढरे शुभ्र झाले होते नी अगदीं निश्चलपणें शेगडींतील मंद होत जाणाऱ्या निखाऱ्यांकडे तो पहात होता.

किशानें कांहीं बोलण्याचा प्रयत्न केला. पण थोड्या अस्पष्ट आवाजापलीकडे कांहींच उच्चार त्याच्या तोंडांतून बाहेर पडला नाहीं. त्याच्या अंतःकरणांत कसंसंच होत होतं. कसली तरी विलक्षण, अनिर्वचनीय उदास हुरहुर वाटत होती त्याला. कां, कोण जाणे ! आपण काय बोललों याचा त्याला सुद्धां मुळींच बोध झाला नाहीं.

वाऱ्याच्या झुळुकीनें जाळ जरा प्रज्वलित झाला, आणि किशा एकदम दचकलाच. त्याच्या ओळखीची होती ती आकृती. एक दोन पावलें मागें सरून किशानें त्या वृद्धाकडे नीट न्याहाळून पाहिलें. होय ! पुष्कळच बदल झाला होता त्यांच्यांत; पण मालकच आपले ते. किशाला कांहीं शंका उरली नाहीं.

धांवतच त्यांच्याजवळ गेला तो नी गुडघ्यावर खालीं बसून त्यानें हाक मारली, ‘ धनी ! मी किशा ! —’

त्या वृद्धानें त्याच्याकडे वळून क्षीणपणें पाहिलें. ‘ आतां हा आला का ! किती येणार आहेत आज हीं ! ’ तो हळूच पुटपुटला आणि हा कोण प्राणी अशा प्रश्नार्थक मुद्रेनेंच तो परत त्याच्याकडे पहात राहिला.

‘ भूतबीत नाहीं मी कुणी. मी किशा; किशा नव्हे का तुमचा ? ओळखलांत ना मला ? पण नलुताई — नलुताई कुठें आहेत आपल्या ? ’

‘ नलुताई ?...हां हां...झोंपली आहे ती...त्या तिकडे आंत. ’

‘ परमेश्वरा, परमेश्वरा ! मेहेरबानी तुझी बाप्पा ! ’

‘ हं ! मेहेरबानी त्याची. पण थांब...ऐक...तिनेंच हांक मारली काय रे ? ’ आजोबांनीं विचारलें.

‘ नाहीं बा. मला नाहीं कांहीं ऐकूं आलें. ’

‘ काय सांगतो आहेस काय, तुला नाहीं ऐकूं आलें ? ’ ते आपल्या जागेवरून एकदम उठले नी कान देऊन नीट ऐकूं लागले, ‘ आतां तरी ? ’ विजयी मुद्रेनें त्यांनी परत विचारलें, ‘ माझ्या इतका दुसऱ्या कोणाला पाठ आहे तो आवाज ! शुत् ! शुत् ! ’

आणि हातानेंच किशाला गप्प रहायला सांगून ते चोर पावलांनीं त्या पलीकडील खोलींत गेले. कुणाशीं तरी मृदुमंद आवाजांत ते बोलत असल्याचा आवाज आला. आणि थोडयाच वेळांत हातांत दिवा घेऊन ते परत बाहेर आले.

' अजून झोंपलीच आहे ती, ' हलक्या आवाजांत ते म्हणाले. ' तुझंच बरोबर होतं. तिनें नव्हती हांक मारली — झोंपेंतच मारली असली तर असेल कदाचित्. '

आपल्याशींच बोलत असल्यासारखे दिसत होते ते. किशाची त्यांना दादही नव्हती. हातांतील दिवा त्यांनीं खालीं ठेवला. पण परत कांहीं आठवल्याप्रमाणें किंवा कुतूहलानें म्हणा, त्यांनीं तो दिवा वर उचलला आणि किशाच्या अगदीं तोंडाजवळ धरला. आणि मग परत कांहींतरी आठवल्या सारखें करीत, आपण कशाला दिवा उचलला होता हें जणूं काय विसरूनच, ते मागें वळले नी त्यानीं दिवा खालीं ठेवला.

' छान झोंप लागली आहे तिला ! पण कांहीं नवल नाहीं मोठेंसें. आसपासचीं पांखरेंसुद्धां कशीं अगदीं मेल्यासारखीं गुडुप निजलीं आहेत, तिला त्रास होऊं नये म्हणून ! दाणापाणी घालायची रोज त्यांना ती, बरं कां हो. आमच्या जवळून कसे बिचारे भुर्र करून उडून जायचे. तिच्या जवळून नाहीं बरं का पण कधीं उडाले ! अगदीं कशी गट्टी होती तिच्याशीं ! ' ते परत बोलले.

पण मध्येंच बोलायचे थांबून ते पुन्हां नीट ऐकूं लागले. श्वास आवरूनच ते बराच वेळ ऐकत होते. दोन तीन मिनिटांतच ती लहर गेली आणि त्यानीं एक जुनी पुराणी लांकडी पेटी उघडली नी तिच्यांतून कांहीं कपडे अगदीं नाजुक हळुवार हातानीं बाहेर काढले. त्या चिमुकल्या जीवांना अपाय होईल असेंच वाटत होतें जणु त्यांना ! अगदीं पित्याच्या वत्सलतेनेंच त्यांवरून ते हात फिरवीत होते कांहीं वेळ !

' तिचे नेहमींचे बाहेर जाण्याचे कपडे बरं का हे — फार, फार आवडायचे तिला ते. हा अस्मानी झगा किती आवडायचा तिला !' कपड्यांवरून आपले सुरकुतलेले हात अगदीं हळुवारपणें फिरवीत, स्निग्धपणें त्यांच्याकडे पहात ते बोलत होते. ' आत्तां जागी झाली कीं लगेच विचारील ती. अगदीं डोळ्यांसमोर दिसले पाहिजेत तिच्या ते ! कुणी तरी गंमत केली आहे बरं का तिची; पण तिला सांपडणारच ते....मीच देईन मुळीं सांपडून. थट्टेंत सुद्धां नाहीं हां रडवायची तिला; अगदीं कुबेराचं भांडार जरी ओतलं माझ्या पायांवर कुणी, तरी सुद्धां नाहीं माझ्या बाईला दुखवायची ! अं हं ! ह्या

पाहिल्यात का चपला तिच्या...किती झिजल्याहेत बघा; पण तिचा आपला एकच नाद...आठवण म्हणून ठेवल्याहेत हो तिनें त्या...आपल्या भटकंतीची. मला आठवतं आहे आतां चांगलं; माझ्या मागून मागून चालायची ती, लंगडतांना मला दिसूं नये म्हणून. पण माझा हात मात्र सोडायची नाहीं हं मुळीं! हात धरूनच चालवायची जशी कांहीं!!'

अगदीं आवेगानेंच कवटाळल्या त्यांनीं त्या चपला छातीशीं, आणि जपून, किती काळजीपूर्वक ठेवल्या त्या त्यानीं परत. अत्यंत दुःखपूर्ण दिसत होता त्याचा चेहरा. मान हालवीत हळूच परत त्यानीं आपल्याशींच पुटपुटायला सुरवात केली. मधूनच एकादा दृष्टीक्षेप त्या पलीकडील खोलीकडे टाकून नी मोठ्या आशेनेंच तिकडे पहात बसत ते!

'कधीं कधीं नाहीं पडून राहायची अशी आंथरुणांत ती. पण — ठुणठुणीत होती चांगली त्यावेळीं ती! पण धीर धरला पाहिजे थोडा आपल्याला. कोण तें? दार लाव, दार लाव, झटकन्! झोंबतो आहे वारा आंगाला. थंडी नाहीं का लागणार माझ्या बाईला! अगदीं मुळींसुद्धां नाहीं थंडी लागतां कामा बरं का तिला!' ......

बिचारा किशा, अगदींच बावरून गेला होता आपल्या मालकाच्या त्या वेडसर वागण्यानें. त्याच्या साध्या भोळ्या बुद्धिसामर्थ्याच्या पार पलीकडला होता तो प्रकार. असहायपणें त्यानें मागें दाराकडे पाहिलें.

दार खरोखरच आतां उघडलें होतें. जयरामभाऊ नी बागवान उभे होते दारांत. त्यांच्या मागोमागच वामनराव आणि बाबजी मास्तर आंत आले. मास्तरांच्या हातांत दिवा होता. दिव्यातील तेल संपल्यामुळेंच ते घरीं गेले होते. आणि त्याचवेळीं किशा इकडे आला नी त्याला आजोबा एकटेच बसलेले दिसले होते.

मास्तर आणि वामनराव दृष्टीला पडतांच आजोबांचा चेहरा जरा मवाळला आणि आपल्या जागेवर ते परत येऊन बसले. पूर्वीचा भकासपणा त्यांच्या चेहऱ्यावर परत दिसूं लागला आणि क्षीणपणें मान हालवीत त्यांचें आपल्याशींच पुटपुटणेंही परत चालूं झालें.

अगदीं पिळवटलेल्या अंतःकरणानेंच ते सर्व आजोबांकडे पहात होते. बिचारे जयरामभाऊ! किती वर्षांनीं पहात होते ते आपल्या दादांना. केवढा

प्रचंड फरक नी काय विलक्षण प्रसंग! पण—त्या दोन नवागत व्यक्तींकडे मात्र आजोबांचें लक्षही नव्हतें. त्यांना आंत आलेले त्यांनीं पाहिलें होतें. पण—त्यांच्याकडे शून्य मुद्रेनें पाहण्या व्यतिरिक्त त्यांनीं त्यांचेविषयीं कांहींच औत्सुक्य दाखविलें नाहीं. वामनराव त्यांच्या जवळच एक खुर्ची पुढें ओढून बसले. बराच वेळ गेल्यानंतर मृदु आवाजांतच ते आजोबांशीं बोलूं लागले.

‘ आज पण नाहीं का झोंपलां तुम्हीं? दुसरी रात्र आहे आज ही. कबूल केलं होतंत मला तुम्हीं आज झोंपायचें. थोडी विश्रांति कां बरं नाहीं घेत तुम्हीं? बरं नाहीं असं फार जागणं!’

‘ काय करूं? झोंपच येत नाहीं मुळीं. तिच्याकडेच गेली आहे ती!’ आजोबांनीं आंत पहात उत्तर केलें.

‘ पण तिला नाहीं का वाईट वाटणार कळलं तर? तिला कसं बरं आवडेल तुम्ही असे जागलेले. तिला नाहीं ना आपल्याला त्रास द्यायचा?’ वामनराव म्हणाले.

‘ अंहं! पण वाटतं एकादे वेळीं कीं उठवावी तिला आतां! किती वेळ निजली आहे ती अशी...नाहीं पण...गाढवपणाच नाहीं का हा? वेड्यासारखा बरळतो आहें मी! चांगली आहे नाहीं झोंप लागली आहे तें—नाहीं?’

‘ चांगली आहे, चांगली आहे!’ वामनराव म्हणाले.

‘ बरं! बरं!!—पण मग जागी झाली कीं,’—घुटमळतच आजोबांनीं विचारलें.

‘ वा: मग काय! सोन्याहून पिवळें!’

त्या दुसऱ्या खोलींत आतां दिवा परत तेवत होता. आजोबा आपल्या जागेवरून चोर पावलानींच त्या आंतील खोलींत गेले. त्या शांत वातावरणांत त्यांचें हलक्या आवाजांतील बोलणें सर्वांना ऐकूं येत होतें. ‘ अजून स्वस्थ झोंपलीच आहे ती!’ असें पुटपुटतच ते परत खोलींत आले. ‘पण तिनें आंग चाळवल्यासारखें वाटलें मला. हातच मला वाटतं, थोडा...किती? अगदीं किंचित्... पण हालवला मला वाटतं तिनें! माझा हात पहात होती वाटतं धरायला!’

बोलतां बोलतां ते एकदम मटकन् खालीं खुर्चींत बसले नी अतीशय आवेगानें डोक्यावर हात मारून अत्यंत करुण अशी त्यांनीं एक दीर्घ

किंकाळी फोडली. सर्वांचें अंतःकरण अगदीं कापीतच त्या भयाण शांततेंत ती किती वेळ तरी निनादत होती!!

वामनराव आणि बाबजी मास्तर धावतच त्यांच्याजवळ गेले आणि हळूच त्यांचे हात धरून त्यांना जरा शांत करण्याचा ते प्रयत्न करूं लागले. 'इकडे बघा आजोबा, असं काय करतां अगदीं. आमचं नाहीं का ऐकायचं? आमच्याकडे बघा जरा. तिला नाहीं का वाईट वाटेल!'

'हं, हळू. हळूच बोला मास्तर! खरंच जागी होईल नाहींतर ती. पण किती बरं वाटेल मला एकदां डोळे उघडून पाहील माझ्याकडे ती नी जरा हंसेल तर! पण किती वेळ लागेल देवालाच माहीत. स्वस्थ बसूं तोंपर्यंत आपण. मुद्दाम नाहीं उठवायची तिला हं!' आजोबा परत बोलत होते.

'तिच्या मागच्या हंसऱ्या, खेळकर आठवणी सांगा आजोबा, आम्हाला. अगदीं पहिल्या, घर सोडण्यापूर्वीच्या, विलासपुरांत राहत होतांना, त्या आनंदी काळांतल्या सांगा आठवणी.'

'नेहमींच हंसरी—आनंदी—फुलपांखरासारखी बागडत असायची माझी नली!' मास्तरांच्या तोंडाकडे टक लाऊन पहात आजोबा म्हणाले. 'नेहमीं शांत नी नाजुक असायची तिची हालचाल एखाद्या राणीसारखी, अगदीं लहानपणापासून; पण प्रसन्न, हंसतमुख असायची नेहमीं. मला चांगलें आठवतें आहे.'

'आणि तुम्ही सांगत होतेत कीं, थेट आईसारखी होती आपल्या ती, या सर्व बाबतींत, नाहीं का? आठवते का आई तिची चांगली?' मास्तर विचारीत होते.

आजोबानीं कांहींच उत्तर दिलें नाहीं; स्थिर पण भावशून्य नजरेनेंच ते अजून मास्तरांकडे पहात होते.

'त्याच्याही जरा मागें चला आजोबा, पुष्कळ, पुष्कळ मागें...अगदीं तुमच्या तरुणपणची पहा आठवण करून. अं, आठवतं का? अशाच दुसऱ्या एका गोड मुलीशीं खेळत असा तुम्ही...किती आवडत असे तुम्हांला ती! आठवतं? आणि तुम्हांला एक छोटा भाऊ होता, किती लाडका होता तुमचा तो नाहीं?...दूर, दूर गेला होता तो किती तरी दिवस...आठवतं तुम्हांला? अगदीं जीव तोडून धांवतच आला आहे तो आतां तुमच्याजवळ रहायला'—

—' आणि जीवापलीकडे तुम्हांला जपायला ! दादा, दादा ! इकडे पहा, ओळखलात ना मला ?' त्यांचा हात हातांत घेऊन आवेगानेंच जयरामभाऊनीं विचारलें. मोठ्या कष्टानें आतांपर्यंत आवरून धरला होता त्यांनीं आपला आवेग.

किती विलक्षण दिसत होता आजोबांचा चेहरा ! मध्येंच एक क्षण, क्षण-भरच त्यांच्या डोळयांत आनंदाच्या लहरी चमकत. पण परत, तीच असहाय, हतबल, अत्यंत करुण अशी झांक त्यांत स्थिरावे. पण मग एकदम उठलेच ते आणि मंद मंद पावलांनीं मागें सरत सरत नी सर्वांकडे विस्फारलेल्या डोळयांनीं पहात ते आंतल्या खोलीजवळ आले. हळूच त्यांनीं आंत बोट दाखविलें ! किती फिक्कट दिसत होते ते; आणि ओंठ थरथरत होते त्यांचे.

' कट करतां काय मला तिच्यापासून दूर न्यायचा, अं ? शक्य नाहीं—कधींच शक्य नाहीं कोणाला तें ! माझी—माझी आहे नली !! कोणी नाहीं दुसरं मला. अगदीं कोणी नाहीं ! फक्त तिच्याशिवाय, कोणी नाहीं—नव्हतं ही कधीं ! बस्स, एक ती नी मी—आणि अशीच रहायचीं आम्हीं अंतापर्यंत. तेवढंच एक सर्वस्व आहे माझं. कोणाच्याही देवाची प्राज्ञा नाहीं आतां आमची ताटातूट करण्याची !!'

आणि त्या सर्वांना हातानें जणूं काय दूर झटकूनच ते ' नली नली !' अशी अत्यंत मृदु स्वरांत हांक मारीत हलक्या पावलानींच तिच्या खोलींत शिरले. बाकीचेही एकदां हळूच आपसांत कांहीं कुजबुजून त्यांच्या मागोमाग आंत गेले. पायांचा तिळमात्रही आवाज झाला नाहीं त्यांच्या.

...पण तिची जीवनज्योत केव्हांच मालवली होती आणि आंथरुणावर अगदीं शांतपणें तिचा श्रांत देह पसरला होता ! जगांतील सर्व यातना, चिंता, पार मागें टाकून विश्रब्धपणें अखेरची निद्रा उपभोगीत होती ती. नुकत्याच उमललेल्या कोमल कलिकेचा निर्मलपणा, प्रसन्नपणें तिच्या चेहऱ्यावर विलसला होता आणि सर्व कांहीं शांत झालें होतें ! ...

पिंजऱ्यांतील तो दुबळा जीव मात्र ' नलुताई, नलुताई !' म्हणून केविल-वाण्या स्वरांत आपल्या मालकिणीला उठविण्याची निष्फळ धडपड करीत होता; नी त्या निस्तब्ध वातावरणांत किती वेळ तरी त्याचे भेसूर पडसाद उदासवाणे रेंगाळत होते !!

---